# राष्ट्र मीमांसा

व

# हिंदुस्थानचें राष्ट्रस्वरूप



लेखक

" दुर्गातनय "



# राष्ट्रमीमांसा

व

# हिंदुस्थानचें राष्ट्रस्वरूप.

' राष्ट्र शब्दाची तात्त्विक, ऐतिहासिक, व तुलनात्मक दृष्टीनें अर्थनिश्चय करून केलेली शास्त्रीय व्याख्या व खोटया आणि कोत्या राष्ट्रकल्पनेचा निरास करून खऱ्या व योग्य राष्ट्रकल्पनेचें समर्थन व प्रतिपादन करणारा ग्रंथ. '

लेखक

" दुर्गातनय "

प्रथम प्रकाशन शाके १८५६.

[ सन १९३४ ]

मूल्य १। रुपया.



प्रकाशक—

वैद्यरत्न विष्णु गणेश केळकर.

नाशिक.

भाषांतर, पुनर्मुद्रण आदिविषयीं पत्रव्यवहारार्थ

पत्ताः—

ले. 'दुर्गातनय—'

डॉ. नारायण दामोदर सांवरकर यांचेद्वारा.

गणेश पेठ, सावरकर भुवन, लेडी जमशेटजी रोड, दादर मुंबअी.



मुद्रक—

गणेश काशिनाथ गोखले मॅनेजिंग डायरेक्टर,

श्रीगणेश प्रिंटिंग वर्क्स, ४९५–९६ शनवार पेठ, पुणें.

## आभार

पुस्तक लेखनापासून तों पुस्तक छापून प्रकाशित होओपर्यंत ज्या ज्या मित्रांनीं व सुहृदांनीं निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या सूचना देणें, अडचणींचे वेळीं उपाय-सूचन व मार्गदर्शन करणें, सुधारणा सुचविणें, संदर्भग्रंथ पुरविणें आदिक जें साह्य दिलें व ज्या साह्यामुळेंच

हें पुस्तक प्रस्तुत स्वरूपांत आमच्या राष्ट्रबंधूंपुढें ठेवितां आलें त्या आमच्या सुहृन्मित्रांचे कृतज्ञतापूर्वक प्रकटपणें आभार मानण्याची ही सुसंधि मिळाली याचा आम्हांस विशेष आनंद वाटत आहे.

—'दुर्गातनय'

# शुद्धिपत्र.

| पृष्ठांक | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| ४ | ३ | अकेता | अेकता |
| ४ | २० | ethentic | ethnic |
| १६ | २७ | अुद्यामरीतीनें | अुत्तानरीतीनें |
| २२ | २७ | गाहींत'' | नाहींत" |
| २४ | २३ | संस्थेच्या | संख्येच्या |
| २६ | १४ | निपक्ष पातीप्रमाणें | निःपक्षपातीपणानें |
| २७ | १४ | तिलमात्रा | तिलमात्र |
| २७ | १४ | प्रधानातें | प्रधानानें |
| २८ | १५ | हिंदु जातीयां | हिंदूजातियां |
| ३२ | २७ | हिंदुस्थात | हिंदुस्थान |
| ३८ | १७ | ततत्व | तत्व |
| ५७ | १७ | पाप्याचें | 'पापा'चें |
| ९५ | १० | हे | (हा शब्द गाळावा) |
| ७५ | १० | माझ्या शेपटीवर | माझ्या मरणाचे शेपटीवर |
| ७५ | ११ | दश्याने | दृश्यानें |
| ७८ | २२ | ब्रह्महात्येच्या | ब्रह्महत्येच्या |
| ८५ | ११ | राष्ट्रसेवाकार्थ | राष्ट्रसेवाकार्य |
| ८७ | ५ | भारत | भारता- |
| ९० | २१ | श्रीसीताशुध्यार्थ | श्रीसीताशुध्यर्थ |
| ९२ | ८ | करत | करता |
| ९३ | २६ | हिंदुना | हिंदुता |
| ९५ | ५ | वर्माचें | धर्माचें |

# राष्ट्रमीमांसा

## ग्रंथांतील प्रतिपादनानुसारी अनुक्रमणिका



## पूर्वार्ध

### राष्ट्रमीमांसा

# अुत्तरार्ध

## हिंदुस्थानचें राष्ट्रस्वरुप

---


अभ्युदय–निःश्रेयस्–निदर्शक
खड्ग–कुण्डलिनी–चिन्हांकित
हिंदुध्वज

# प्रस्तावना.

संभूतिंच विनाशंच यस्तद्वेदोभयं सह ॥
विनाशेन मृत्युंतीर्त्वासंभूत्याऽमृतमश्नुते ॥ १४ ॥

अीशा० अुप०

अर्थ—जो समाजधर्म आणि व्यक्तिधर्म हे दोन्ही बरोबरच जाणतो ;णजे त्या दोहोंचेंहि महत्त्व ओळखतो, तो व्यक्तिधर्मानें संकटांतून पार ून, समाजधर्मानें अमृत म्हणजे मोक्ष मिळवितो.

सुमारें वर्षदीडवर्षापूर्वी मुंबअीस अेकाअेकी दंग्याचा कहर अुसळला. सलमानांनीं हिंदूंना 'दे माय धरणी ठाय' असें करून सोडलें, ही ातमी अैकल्याबरोबर बाहेर गांवच्या हिंदू लोकांचीं मनें कांहींशीं चिंता- स्त झालीं; आणि जो तो म्हणूं लागला कीं—मूठभर मुसलमान लोक ाराभर असलेल्या हिंदू लोकावर बेछूटपणें कसें आक्रमण करतात! हा अेक मत्कार आहे! पूर्वयुगांत मोठमोठ्या अद्भुत गोष्टी घडत असल्याचें राणांतरीं लिहिलें आहे. अगस्तीनें समुद्र प्राशन केला, विश्वामित्रानें तिसृष्टि केली, श्रीकृष्णानें गोवर्धनपर्वत अुचलला अित्यादि गोष्टी आपण हमीं अैकतो पण कलियुगांत या अद्भुत चमत्कारांची परंपरा बंद झाली ाहे. विधात्यानें कलियुगांत ही अद्भुत चमत्कारांची नाटकें बंद केलीं ासलीं तरी अद्यापि जगाच्या रंगभूमीवर त्याचे अद्भुत चमत्काराचे अेक ाटक चालू आहेच. तें हें कीं, हजार पांचशें मुसलमानांचा किंवा त्सम परकीयांचा जमाव दहावीस हजार वस्तीच्या हिंदूसमाजाला घाबरू- न सोडतो. हा अेक विचित्र अद्भुत चमत्कारच नव्हे काय! अशा वेळीं काय करावें हो! आमच्या हिंदू लोकांत अैक्य नाहीं–संघटना नाहीं– हणून असें होतें.' अशी वरील अद्भुत चमत्काराची कारणमीमांसा खील सर्वत्र अैकूं येतें. मुसलमानांनीं व्यवहारसृष्टींत व अिंग्रजांनीं प्रवहारसृष्टीबरोबरच विचारसृष्टींतहि प्रबळ आक्रमण केलें आहे. त्या- ळें हिंदूसंस्कृति नामशेष होअील कीं काय अशी भीति वाटूं लागली ाहे. रोमच्या तडाख्यांत कार्थेजियन नाहींसे झाले. युरोपीयांच्या वरवंट्या-

खालीं अमेरिकेचे मूळचे तांबडे लोक चिरडून गेले, आणि आफ्रिकेंतील मूळचे निवासी आज त्याच पंथाला लागले आहेत. जगाच्या अितिहासांतील या भेसूर घटना पाहिल्या म्हणजे हिंदूसंस्कृतीचीसुद्धां अशीच वाट लागणार कीं काय असें या प्रश्नाचें स्वरुप विक्राळ वाटूं लागतें. शरीरानें व मनानें हिंदूसमाज अितका दुबळा आहे कीं, परकीयांनीं चढविलेलें व्यावहारिक व बौद्धिक आक्रमण त्याला धीटपणें परतवितां येत नाहीं. आजपर्यंत बाहेरून आलेल्या व यापुढेंही येण्याच्या बेतांत असलेल्या परकी अगांतुकांना मुख्य घटकावयव म्हणूनच तुम्ही आपल्या राष्ट्रांत राष्ट्रघटक रूपानें समाविष्ट केलें पाहिजे अशी अिंग्रजांनीं केलेली अपदेशरूप आज्ञा मनांतून अप्रिय व अश्रेयस्कर वाटली तरी ती या हिंदुसमाजाला झुगारून देववत नाहीं, हीच त्याची बौद्धिक शृंखला होय. अंतर्बाह्य दासानुदास बनलेल्या अशा या हिंदूसमाजाची सर्वांगीण अुन्नति व्हावी म्हणून प्रयत्न करणें हें मुसळाला अंकूर फुटण्यासारखें निराशाजनक आहे; असें वाटलें तरी हिंदूसमाजांत व्यक्तिधर्माच्या रूपानें जीवनशक्ति स्थिर आहे तोंपर्यंत आशेला पुष्कळच जागा आहे. या व्यक्तिधर्माच्या बीजाला योग्य प्रकारें राष्ट्रधर्मभावना ( पुटें ) देअून योग्य जोपासनेचें खत व पाणी मिळेल तर अजून त्यांतून महावृक्ष फोफावेल. आणि हिंदूंच्या या राष्ट्रधर्माचा महावृक्ष या भरतभूमीलाच नव्हे तर सर्व जगाला आपल्या छायेनें त्रिविध तापांतून मुक्त करील. हा पोकळ तर्क आहे किंवा ही अेक भडक भावना आहे असें कोणालाहि म्हणतां यावयाचें नाहीं. कारण अेका काळीं या भारतीय राष्ट्रधर्मानें स्वतःचें राष्ट्र अुन्नतीच्या अुत्कर्षबिंदूवर चढवून अैहिक व पारमार्थिक अुत्कर्षाचा मार्ग दाखविण्याचा जागतिक यशस्वी प्रयोग प्रत्यक्ष करून दाखविला आहे. परकीय ग्रंथकारांच्या हार्दिक मान्यतेनें सिद्ध झालेलें हें अैतिहासिक अखंडनीय सत्य पोकळ संशयाचा धुरळा अुठवून ते कोणालाहि नित्याचें गाडतां येणार नाहीं. हिंदूसमाजांत राष्ट्रीयजीवन अुत्पन्न झालें तर तो समाज आपल्या राष्ट्राचा धनी तर होअीलच पण तो जगताचा जगद्गुरू देखील होअील. हें विद्वान लोकांना कळून चुकलें आहे. राष्ट्रधर्माचें शास्त्र हेंच राष्ट्रीयजीवन अुत्पन्न करण्याचें अद्वितीय साधन होय. आणि या राष्ट्र-

धर्मांच्या शास्त्राची आमच्याकडे फारच अुणीव झाली आहे. ती या ग्रंथानें थोडी तरी भरून निघेल अशी निश्चिति वाटते.

## व्यक्तिधर्मांचें राष्ट्रधर्मरूपांत रूपांतर.

कोणतीहि अेखादी गोष्ट मानवी बुद्धीच्या अगदीं खोल अंतस्तल बिंदूपर्यंत पोचावयाची असली तर त्या गोष्टीला तत्वज्ञानानेंच वाट करून देता येतें. अुपनिषदें, भगवद्गीता अित्यादि ग्रंथ सांस्कृतिक राष्ट्रीय तत्वज्ञान सांगणारे आहेत. या राष्ट्रीय वेदातांच्या अमृतसिंचनानें हिंदूराष्ट्रांत व्यक्तिधर्मांच्या स्वरूपानें असलेली बीजशक्ति पूर्ण विकसित होअील यांत शंका नाहीं. पण राष्ट्र म्हणजे काय याचा चांगलाच अुहापोह व्हावयास पाहिजे होता. तो प्रस्तुत ग्रंथकारानें फारच समर्पकरीत्या केला आहे. सांप्रतकाळीं राष्ट्र शब्दाचा अर्थ जितका व्यापकपणें समजला जातो तशा व्यापक अर्थांचा राष्ट्र शब्द प्राचीन ग्रंथांत लिहिलेला आढळून येतो हें जरी खरें असलें तथापि दुसऱ्याहि कित्येक अर्थांनें राष्ट्र शब्दाचा अुपयोग केल्याचें दिसून येतें. आणखी असें कीं हिंदुस्थानांतील जातिभेद, धर्मभेद, पंथभेद, भाषाभेद अित्यादि अनेक भेद पुढें करून हिंदुस्थान हें अेक राष्ट्र कधीं नव्हतें व आजहि नाहीं, असें ठरविण्याचा परकीय ग्रंथकारांनीं आटोकाट प्रयत्न केला असल्यामुळें हिंदू–समाजांत राष्ट्र शब्दाच्या अर्थाविषयीं बराच भ्रम अुत्पन्न झाला आहे. ही निराधार व अशास्त्रीय समजूत नाहींशी करण्यास राष्ट्र शब्दाच्या अर्थाची शास्त्रशुद्ध अशी मीमांसा करणें अत्यंत अगत्याचें आहे. अशा अेक्या अत्यंत महत्वाच्या व अत्यंत जिव्हाळ्याच्या अशा शास्त्रीयविषयाला प्रस्तुत ग्रंथानें प्रारंभ केला यासाठीं कोणीहि विचारी मनुष्य त्याचें अभिनंदनच करील.

## राष्ट्राचें स्वरूप.

ज्यांनीं राष्ट्राच्या स्वरूपाचा नीटसा खोल विचार केलेला नसतो, राष्ट्राचे घटकावयव कोणते, त्याची मर्मस्थानें कोणती, याचा ज्यांनीं शास्त्रीय दृष्टीनें विचारच केलेला नसतो; अशी माणसें राष्ट्रधर्मांतील कांहीं विद्रूप प्रकार पाहून संतापून, व वैतागून अुठतात आणि कोणी जातिभेदावर घाव घालूं

लागतो तर कोणी धर्मसंस्कृति अित्यादिकांवर पेट्रोल ओतून त्यांना पेट-विण्यास सिद्ध होतो. अशा प्रकारें बोलणाऱ्या या लोकांची स्वदेशावर केवळ भक्ति नसते असें म्हणतां यावयाचें नाहीं. किंबहुना त्यांचा वैताग स्वदेशभक्तीमुळेंच अुत्पन्न झालेला असतो, असेंहि म्हणतां येअील. परंतु चिडलेल्या रोगग्रस्ताप्रमाणें त्यांची स्थिति झालेली असते. मानेवर झालेला रोग कापून काढावयाचा झाला तरी मान संभाळूनच रोग कापून टाका-वयास पाहिजे, येवढी साधी गोष्ट देखील प्रसंगविशेषीं अेकाद्या चिडखोर रोग्याच्या लक्षांत ज्याप्रमाणें येत नाहीं तद्वतच आमच्यांतील कांहीं मंडळींची मनस्थिति वैतागल्यासारखी होते. आणि ते अेखाद्या चिडखोर रोग्याप्रमाणें बेतालपणें बोलूं लागतात. धर्म-संस्कृति अित्यादिकांवर चव-ताळून अुठणाऱ्या या देशभक्तांनीं वा कार्यकर्त्यांनीं राष्ट्राचे घटकावयव कोणते, त्याचीं मर्मस्थानें कोणतीं व त्याचा जीवनबिंदू किंवा आत्मा कोणता, या विषयाचा शांतपणें व सावधपणें विचार ठेवला असता तर आपला घाव राष्ट्राच्या मर्मस्थानावर बसतो किंवा काय हें त्यांना बिनचूकपणें पहातां आलें असतें. सर्व देशभक्तांना किंवा सर्व कार्यकर्त्यांना शास्त्रांचें संशोधन किंवा संग्रह करण्यास सवड असतेच असा नियम नाहीं म्हणून अशा लोकांना संकलित असें राष्ट्रधर्माचें शास्त्र अुपलब्ध झालें तर त्यांचें मोठेंच कार्य होअील. मात्र गतानुगतिकपणानें किंवा स्वार्थी विचारांनीं देश-भक्तीचा आव घालणाऱ्या पोकळ व थोतांडी देशभक्तांना असल्या शास्त्रीय पुस्तकाची अडचणच वाटेल. कारण अुतावीळपणावर किंवा थोतांडावरच शास्त्राचा बिनचूक घाव बसत असतो. परंतु प्रस्तुत ग्रंथासारखे ग्रंथ सत्प्र-वृत्त लोकांकरितांच प्रकट होत असल्यामुळें अज्ञानी किंवा स्वार्थी लोकांच्या गैरसोयीकडे लक्ष देण्याचें मुळींच कारण नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें राष्ट्रधर्माचें शुद्ध स्वरूप लक्षांत घेतल्यावर विशुद्ध जातिसंस्था, धर्म, संस्कृति अित्यादि गोष्टी राष्ट्र जिवंत राखण्यास व त्याचें संवर्धन करण्यास अत्यंत अुपयोगी व अवश्य आहेत असें समजून आलें तर राष्ट्राच्या बिघडलेल्या भागावर शस्त्रक्रिया करतांना त्यांतील कोणता अंश जपून राखावयाचा तें बरोबर ओळखतां येअील. आणि सत्प्रवृत्त अशा लोकांना हिंदू–राष्ट्रांतील सांस्कृतिक जीवनबिंदू ओळखण्याचा मार्ग स्पष्टपणें दाखविणारें असें प्रस्तुत

राष्ट्रमीमांसा हें पहिलेंच पुस्तक होय; या दृष्टीनें प्रस्तुत पुस्तकाचें महत्त्व अत्यंत आहे असें ठरतें.

## समाजसंघटनेचें अंतरंग.

हिंदूराष्ट्र सुसंघटित व्हावयास पाहिजे याविषयीं आतां विचारी लोकांत तरी दुमत राहिलेलें नाहीं, तथापि राष्ट्राची किंवा समाजाची संघटना कशी करावयाची याविषयीं मात्र विचाराला अद्याप निश्चित अशी अेक दिशा लागलेली नाहीं. या गोष्टींत प्रामाणिक असे बरेच मतभेद आज मितीला देशांत वावरत आहेत ही गोष्ट अमान्य करण्यांत अर्थ नाहीं. हे सर्वच मतभेद पोकळ, अयोग्य किंवा त्याज्य आहेत असेंहि अेकाअेकी म्हणतां येणार नाहीं, अुलट हे मतभेद कसेहि असले तरी ते प्रदर्शित करणारे व त्याप्रमाणें वागणारे लोक सत्प्रवृत्त व प्रामाणिक आहेत असें निःसंशय वाटतें. या सर्व मतभेदांत राजकीय पक्ष मुख्य आहे. या पक्षाचें मत आहे कीं हिंदुस्थानांतील सामाजिक किंवा धार्मिक बाबतींत ढवळाढवळ करण्याच्या भानगडींत न पडतां केवळ सत्तापक्षाबरोबर भांडून राजकीय हक्क संपादन करण्याच्या प्रवृत्तीवरच लोकांची अेकी घडवून आणावी. दुसऱ्या कित्येक पक्षांचे म्हणणें असें कीं—" हिंदुस्थानांत असलेल्या सर्व लोकांची—मग ते कोणत्याहि जातीचे वा धर्मांचे असोत "—हिंदुस्थान हीच मातृभूमि आहे, म्हणून स्वदेशाभिमानाच्या भावनेवरच अैक्य घडवून आणावें. तिसरा आणखी अेक नवीन पक्ष हिंदुस्थानांत अुत्पन्न होअूं पहात आहे. त्याचें म्हणणें असें कीं, जाति, धर्म, देश यांसारख्या ' अफूच्या गोळ्या ' चढाविण्याचें यापुढें आतां बंद करावें आणि केवळ आर्थिक पायावरच जागतिक संघटना घडवून आणण्याचा प्रयत्न करावा. आणखीहि कांहीं पक्ष देशांत वावरत आहेत. त्या सर्वांत राजकीय पक्षाचें मत विशेष प्रभावशाली असून प्रसंगाचे दृष्टीनें तें कांहीं अंशी सयुक्तिक असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. मात्र या मताचा पाया नैमित्तिक व म्हणून कच्चा आहे ही गोष्ट विसरतां कामा नये. हिंदू राष्ट्राचा सांस्कृतिक अधःपात झाला आहे त्याला त्यांतून वर काढावयाचें झाल्यास राष्ट्रधर्माचा पाया जितका खोल व चिरस्थायी होअील तितका चांगला असेंच म्हणणें प्राप्त आहे.

## राष्ट्रधर्माचा पाया

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ॥**

अर्थ—'जे जाणल्यानें पुन्हां तुला संशयाला बळी पडावें लागणार नाहीं.' जगांतील कोणत्याही राष्ट्रांना अथवा संस्कृतींना आपल्या राष्ट्रधर्माची अुभारणी करावयाची झाल्यास ती तत्वज्ञानाच्या पायावरच करावयास पाहिजे. जो धर्म तत्त्वज्ञानाचे पायावरच अुभारलेला असतो तोच धर्म या नांवाचा पात्र होअून चिरस्थायी होतो असा जगाचा अनुभव आहे. म्हणून तत्वज्ञानगर्भ धर्म हाच राष्ट्राचा मुख्य पाया होय असें निःसंशय ठरतें. कोणत्याही राष्ट्राच्या धर्माला पाया होण्याला अुपयोगी पडेल असें कोणतें तत्वज्ञान असेल तर तें हिंदूधर्मांतील तत्वज्ञान हेंच होय. दशोपनिषदें, श्रीमद्भगवद्गीता या ग्रंथांत प्रतिपादन केलेला वेदान्त हा आमच्या राष्ट्राचा वेदान्त आहे. या तत्वज्ञानाच्या पायावरच हिंदूंच्या राष्ट्रधर्माची अुभारणी व्हावयास पाहिजे. कारण राष्ट्रधर्माच्या आचरणास आदर्शभूत होअील अशा थोर थोर व्यक्ति मधून मधून तरी समाजापुढें आल्या पाहिजेत. म्हणजे अलोट स्वार्थत्याग, दुर्दमनीय अुत्साह, यशस्वी कर्तृत्व, अचाट बुद्धिमत्ता, लोकोत्तर लोकसंग्राहक शक्ति, सार्वकालिक दक्षता, सार्वजनिक हिताचे ध्येय ( सर्वभूतहित ) इत्यादि अनेक दिव्य राष्ट्रोपयुक्त सद्गुणांचे आदर्शभूत व्यक्तींच्या चारित्र्यांतून समाजाला प्रत्यक्ष दर्शन घडतें व त्याचें सुपरिणाम समाजाचे मनावर प्रतिबिंबित होतात. या सद्गुणांच्या अुपासनेच्या योगानेंच समाजाला राष्ट्रधर्माचें वळण लागतें. ते सद्गुण मोहरहित अशा बुद्धीमध्येंच प्रकट होतात. बुद्धीचा हा निर्मोहपणा ब्रह्मज्ञानावांचून प्राप्त होणें सर्वथैव अशक्य आहे. ग्रीक किंवा ख्रिस्ती समाजांत बऱ्याच विद्वान् लोकांनीं तत्वज्ञानविचारविषयक ग्रंथ निर्माण केले आहेत. त्यांतल्यात्यांत आधुनिक युरोपीय पंडितांचें तत्वज्ञान, दुर्भेद्य कोटिक्रम, सयुक्तिक विवेचन, अनुभवशीर दृष्टांत अित्यादि साधनांनीं चांगलेंच सजलें आहे. परंतु या तत्वज्ञानाचा धर्मशास्त्राशीं मुळींच संबंध नसल्यामुळें सर्व समाजाच्या बुद्धीचा विकास होण्याचे कामीं या तत्वज्ञानाचा कितपत अुपयोग होअील याविषयीं बळकट संशय वाटतो. आणि

म्हणूनच तत्वज्ञान असा मोघम शब्द न देतां ब्रह्मज्ञान असा विशिष्ट शब्द आम्हीं वर दिला आहे. हिंदूंचें तत्वज्ञान धर्म्य असून त्याचा मानवी जिवनाशीं अत्यंत निकट संबंध आहे ( कठ १–२–१३ ). ब्रह्मविद्येच्या अभ्यासानें बुद्धीचे मोहादि दोष नाहींसे होतात व ती पूर्ण स्वतंत्र, सामर्थ्य-संपन्न व सद्गुणशाली होते म्हणजेच तिचा पूर्ण विकास होतो. अशी ब्रह्मज्ञानानें परिपूत झालेली बुद्धि हेंच राष्ट्रधर्मांचें मूल अधिष्ठान होय. हें तत्व थोड्याशा शाब्दिक फरकानें श्रीमद्भगवद्गीतेंतहि आलें आहे. श्रीगीतेंत राष्ट्रधर्म या शब्दाच्या स्थलीं कर्मयोग हा शब्द सदर्भानें घेतला म्हणजे झालें. " व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन " ( २–४१ )

## राष्ट्रधर्मांचे घटकावयव

ज्ञानविज्ञानसंपन्न अशा बुद्धींतून राष्ट्रधर्मांचा प्रादुर्भाव होतो. येथ-पर्यंत राष्ट्रधर्मांची पूर्वपीठिका समजली तरी तेवढ्यानें राष्ट्रधर्मांचें स्वरूप परिपूर्णतया समजलें नाहीं. त्याच्या व्यावहारिक स्वरूपाची रूप-रेखा मांडणें ओघानेंच प्राप्त होते. या रूपरेषेंत घटकावयवांचा मुख्यत्वे-करून विचार व्हावयास पाहिजे. हा विचार प्रस्तुत ग्रंथांत अत्यंत मार्मिक-पणें करण्यांत आला आहे. भाषा, जाति, देश, धर्म व संस्कृति हें राष्ट्रीयत्वाचे पांच घटकावयव होत; असें सिद्ध करून त्यांची व्याप्तिसुद्धां योग्य रितीनें दर्शविली आहे. प्राचीन शास्त्रकारांनीं लक्षणाची व्याख्या ठरवितांना अनुगतधर्म म्हणून अेक कल्पना अत्यंत मार्मिक व समर्पक अशी मांडली आहे. ही कल्पना लक्षांत घेतल्यास लक्षणाची अतिव्याप्ति किंवा अव्याप्ति न होतां तें सर्वांगांनीं कसें लागूं करावयाचें हें बरोबर समजतें. ही अनुगत धर्मांची कसोटी प्रस्तुत ठिकाणीं सुद्धां चांगली लागू करतां येते. जो धर्म किंवा गुण स्वतः घटकावयव नसून प्रत्येक घटका-वयवांत स्पष्ट दिसून येअील तोच अनुगतधर्म होय. अुदाहरणार्थ मनुष्य हें सामान्यनाम अुच्चारल्याबरोबर अेक ठराविक आकृति मनांत येते. या आकृतीचा अंतर्बाह्य असा जो ठराविक सांचा तोच अनुगतधर्म होय. हात, पाय, तोंडावळा, वाणी, बुद्धि अित्यादि प्रत्येक मानवी घटका-वयवामध्यें हा मनुष्यरूपी अनुगतधर्म थोड्याफार प्रमाणांत प्रतीत होतो.

त्याप्रमाणेंच भाषा, जाति, देश, धर्म, संस्कृति या घटकावयवांत हिंदूंचा राष्ट्रधर्म कमीअधिकपणें प्रतीत झाल्यावांचून रहावयाचा नाहीं. सर्व हिंदवी भाषांचा संबंध मातापिता किंवा मातामही या न्यायानें संस्कृत भाषेशींच येत असल्यामुळें संस्कृत भाषा हीच हिंदूंची राष्ट्रभाषा ठरते, असें प्रस्तुत ग्रंथकारानें सिद्ध केलें आहे. हीच गोष्ट प्रत्येक घटकावयवांमध्यें दिसून येत असल्यानें ‘ हिंदूंचें राष्ट्रीयत्व ’ हाच अनुगतधर्म आहे. या विषयाचें आणखी विस्तारानें वर्णन व्हावयाला पाहिजे असें वाटलें तरी तें विस्तार-भयास्तव येथें करतां येत नाहीं. वर जें थोडक्यांत दिग्दर्शन करण्यांत आलें आहे त्यावरून प्रस्तुत ग्रंथांतील राष्ट्रमीमांसा कशी शास्त्रशुद्ध आहे. त्याची वाचकांना बरोबर कल्पना येईल.

## घटकावयवांचा परस्परसंबंध

अनुगतधर्माच्या योगानें लक्षणाची जशी समव्याप्ति होऊन पदार्थ व पदार्थांचें लक्षण यांची बरोबर समजूत पटते. त्याप्रमाणेंच घटकावयवांत असलेला अन्योन्यपोषक संबंध कसा आहे तेंहि कळावयास पाहिजे. घटकावयवांतील हा संबंध कित्येक वेळ अुत्तेजक, पोषक किंवा संवर्धक असा असतो तर कित्येक वेळा तो मर्यादादर्शक असाहि असूं शकतो. ग्रंथकारानें व्यक्तीच्या स्थलीं भाषेचा समावेश केला आहे तें अेक व्यक्तीधर्माचें प्रतीक आहे असेंच समजावयास पाहिजे. ग्रंथकारानें स्वत्व आणि सत्व यांच्या अर्थाची फोड करून त्यांच्या मर्यादाहि बरोबर दाखविल्या आहेत. सत्व हें कितीही श्रेष्ठ किंवा अुच्चतम असलें व त्याचेपेक्षां स्वत्व कितीहीं कमी प्रतीचें ठरलें तथापि तें स्वत्व दुर्दमनीय आहे हें मान्यच करावयाला पाहिजे. विद्या, संपत्ति, सामर्थ्य अित्यादि साधनांनीं श्रेष्ठपदावर चढलेला मनुष्य लोककल्याणाकरतां सर्वस्वाचा त्याग करूं शकतो, पण या सर्वस्वांतून तो आपलें मीपणाचें स्वत्व राखून ठेवतो. हें स्वत्व म्हणजे मीपणा सर्वस्वीं टाकणें सर्वांनाच शक्य नसलें तरी त्या स्वत्वाचा संकुचितपणा नाहींसा करून त्याचा विकास करणें किंवा त्याला पूर्ण विस्तृत स्वरूप देणें शक्य, अिष्ट व अवश्य आहे. या मीपणाचा विकास जाति, देश, धर्म, संस्कृति या पायऱ्या क्रमाक्रमानें चढून तो राष्ट्राशीं अेकरूप होतो असा क्रमाक्रमानें विकास

पावणारा मीपणा म्हणजे अहंकार नव्हे. अहंकार या शब्दानें सदोष अशा गर्विष्ठपणाचा बोध होतो, तो दोष या मीपणामध्यें नाहीं. शास्त्रकारानें या मीपणाला अहंप्रत्यय असें नांव दिलें आहे. याच अर्थानें ग्रंथकारानें स्वत्व या शब्दाची योजना फारच अर्थपूर्ण केली आहे असें वाटतें. स्वत्व किंवा व्यक्तित्व हा धर्म पहिल्या पायरीवरचा मानल्यास त्याचा जाति हा धर्म नियामक ठरतो. स्वाभिमान किंवा स्वभावाभिमान या गोष्टी सदभिरुचीला कितीहि शोभण्यासारख्या असल्या तथापि जातीच्या कल्याणाकरितां त्या मनुष्यानें कांहीं काळ बाजूस ठेवणें अत्यंत अवश्य व योग्य आहे. येथें हिंदुत्व हीच जाति विवक्षित आहे असें समजलें पाहिजे. कारण घटकावयव म्हणून अशा व्यापक जातीचा राष्ट्राशीं जसा प्रत्यक्ष संबंध येतो तसा तो पोटजातींचा येणार नाहीं. ज्याप्रमाणे पूर्णापेक्षा अंशाची योग्यता वा जातीपेक्षां व्यक्तीची योग्यता कमी समजतात त्याचप्रमाणें राष्ट्र ही पूर्ण वस्तु व ते पांच घटक त्या पूर्णवस्तूचे पांच अंश या दृष्टीनें राष्ट्र हें त्याच्या कोणत्याहि अेका घटकापेक्षां अधिक श्रेष्ठ आहे असें तत्वतः ठरतें. राष्ट्र व त्याचे घटकावयव यांमध्यें असा नियम्यनियामक वा श्रेष्ठ कनिष्ठभाव असला तरी त्यापैकीं कोणाचीहि आवश्यकता कमी आहे असें मानणें सर्वथैव चुकीचें ठरेल. शरीर आणि त्याचे अवयव यांत देखील श्रेष्ठकनिष्ठभाव आहेच, तरी कोणत्याहि अवयवाची अनावश्यकता मनुष्याला कधींहि जाणवत नाहीं. अितकेच नाहीं तर त्यांतहि कांहीं भाग असे आहेत कीं त्यापैकीं कोणताहि अेक भाग नष्ट करणें वा नष्ट होअूं देणें म्हणजे शरीरनाशाला आमंत्रण देण्यासारखेंच ठरणारें असतें. राष्ट्राचेंहि तसच आहे. याप्रमाणें राष्ट्र व त्याच्या घटकावयवांचा विचार केल्यास त्यांचा अन्योन्यसंबंध अनेक प्रकारें दिसून येअील. वाचकांनीं सूक्ष्म दृष्टीनें राष्ट्राच्या घटकावयवाचा विचार केल्यास प्रसंगविशेषी त्यापैकीं अेखाद्याला प्रसंगानुरोधें तात्कालिकदृष्ट्या कितीहि महत्त्व आलें असलें तरी त्याची मर्यादा सुटावयाची नाहीं आणि राष्ट्रकार्याला अेककल्ली सांप्रदायिकपणाचा दोष चिकटणार नाहीं. या अेककल्लीपणाच्या भयंकर चुकीनें आजवर राष्ट्रकार्याची हानि अनेक वेळां झाली आहे. म्हणून प्रत्येक कार्यकर्त्यानें या राष्ट्रमीमांसेचें लक्षपूर्वक अवलोकन करणें अत्यंत अगत्याचें आहे.

# राष्ट्राचें स्वामित्व आणि अल्पसंख्याकांचा प्रश्न

राष्ट्रमीमांसेच्या संबंधांत देश या नांवाच्या घटकावयाला तात्विकदृष्ट्या अग्रपूजेचा मान मिळत नसला तरी व्यावहारिकदृष्टीनें प्रसंगविशेषीं देशालाच अग्रपूजेचा मान द्यावा लागतो. मानवी जीवनक्रमांत जड देहाची पायरी अगदी खालची असली तरी अंतर्बाह्य सर्व व्यवहाराचें पर्यवसान अंतीं जड देहावरच घडतें. तद्वतच राष्ट्रमीमांसेंतील तत्वें, राष्ट्राचे घटकावयव, त्याचे गुणधर्म अित्यादिकांनी कितीहि महत्व असलें तरी देश हा त्या सर्वांच्या आविर्भावाचें अधिष्ठान होय. म्हणून त्याचें महत्व कोणत्याहि दृष्टीनें कमी मानतां येत नाहीं. हिंदुस्थान हा देश कोणाचा ? या प्रश्नाचेंच अुत्तर देण्याकरितां दोन जातीचे लोक जोरानें पुढें घुसतात आणि म्हणतात कीं:- आम्ही अल्पसंख्य असले तरी आमची राजकीय किंवा व्यावहारिक कोणत्याहि प्रकारची गैरसोय होता कामा नये. या वर्गांत मुख्य दोन जाति आहेत हें वर सांगितलेलें आहे; त्यांपैकीं मुसलमानांचा वर्ग अल्प-संख्येच्या प्रश्नांच्या संबंधांत हिंदूंचा प्रतिपक्षि बनला आहे. दुसरा वर्ग ख्रिस्त्याचा. त्याचें धोरण प्रतिपक्षीपणाचें नसल्यामुळें—अल्पसंख्येविषयीं केवळ मुसलमानांनींच भांडण चालविलें आहे. राष्ट्रावर आमचा धनीपणा पाहिजे असें म्हणत अल्पसंख्याकांनीं पुढें येणें अेकराष्ट्रीयत्वांत व्यंग आणणारें आहे. पण चमत्कार हा कीं अुटल्या बसल्या हें अल्पसंख्याकांच्या सवत्या सुभ्याचें खूळ पुढें करून मुसलमान आपलें धोरण सतत राष्ट्रहितविरोधक व आक्रमणशील असें ठेवतात. त्यांच्या या धोरणाला भारतीय सत्तापक्ष आणि त्यांचे पुरस्कर्ते अिंग्लंडांतील लोक यांचा भरपूर पाठिंबा असल्यामुळें ते सदासर्वदा चढावाचीच भाषा बोलतात. आम्हीं अिंग्रजांपेक्षां कमी प्रतीचे असलो तरी हिंदुस्थानांत हिंदूंपेक्षां सतत वरच्या पायरीवर राहणार अशी त्यांची दुराकांक्षा आहे. त्यांच्या या गुरगुरण्यानें भेकड पुढारी घाबरून जातात. कित्येक शिष्ट न्यायाधीशाचा आव आणून असें म्हणतात कीं, ‘मुसलमान हा आपला छोटा भाअी आहे. त्याच्या आक्रमणशीलतेचे लाड हिंदूंनीं पुरविलेच पाहिजेत’ शिष्टांच्या या पोकळ तत्वज्ञानानें हिंदूंनी आजपर्यंत अनेकवार आत्मघात करून घेतला आहे. बंधुत्वाचे नात्यानें

मुसलमानांना हिंदुस्थानांत राहाण्याची अिच्छा नसून जेते म्हणूनच त्यांना हिंदुस्थानांत रहावयाचें आहे; अिंग्लीश आतांचे जेते व मुसलमान भूतकाळाचे जेते असा हा जेत्यांचा दुहेरी साखळदंड आपल्या पायांत अडकवून घेअून चिरंतनचें दास्यत्व पत्करावयाचें कीं काय हा हिंदूपुढें प्रश्न आहे. हिंदूंनीं यावेळीं स्वत्त्वास जागलें पाहिजे. या भारतभूमीवरील आपलें स्वामित्व त्यांनीं तिळमात्रहि ढळूं देतां कामा नये. जर अज्ञानमय पोकळ तत्वांच्या चुकल्या अभिमानानें, भेंकडपणानें व मूर्खपणानें या भरतखंडावरील आपलें स्वामित्व त्यांनीं गमावलें तर पारतंत्र्याच्या नरकांतून त्यांना वर येण्याची आशाच करावयाला नको. याकरतांच हिंदूंनीं आपलें स्वत्व तेजस्वीपणें जागाविलें पाहिजे. या कामांत दुसऱ्यावर अन्याय्य आक्रमणहि होत नाहीं किंवा दुसऱ्याच्या स्वत्वाचा अपहारहि होत नाहीं. कारण अल्पसंख्याकांविषयीं राष्ट्रसंघानें केलेले नियम आतां सर्वमान्य झालें आहेत. त्या नियमांना अनुलक्षून हिंदुस्थानांतील अल्पसंख्याक लोकांची व्यवस्था केल्यावर कोणाहि न्यायप्रिय मनुष्याला ती समाधानकारक वाटेल यांत शंका. राष्ट्रसंघाच्या या नियमांचा विचार प्रस्तुत ग्रंथांत चांगला सामग्र्यानें करण्यांत आला आहे. त्याचा चांगला अभ्यास केल्यास या अल्पसंख्याकांच्या कामांत न्यायान्यायाची निवड बिनचूक करतां येअील. हिंदुस्थान हा राष्ट्रसंघाच्या आद्य-घटकांपैकीं अेक आद्यघटकच असल्यामुळें राष्ट्रसंघानें केलेलें अल्पसंख्याकांचें नियम हिंदुस्थानाला लागूं करणें सर्वस्वी न्याय्य आहे. असें असतां कांहीं स्वार्थैकरत व धूर्त अशा लोकांना ही राष्ट्रसंघाची योजना मानवत नाहीं. हिंदुस्थानांतील अल्पसंख्याकांचे व्यवस्थेकरतां हिंदूराष्ट्रविभेदक व विघातक अशी निराळी योजना करण्याचा त्यांनीं डाव टाकला आहे. त्याला न भुलतां—न भितां हिंदुसमाजानें सुसंघटित होअून राष्ट्रसंघानें केलेली व्यवस्थाच व्यवहारांत आणण्याविषयीं चिकाटीनें प्रयत्न केल्यास तो यशस्वी होअील. आणि हिंदूसमाजावर आलेलें हें भयंकर राष्ट्रीय गंडांतर टळेल. राष्ट्रसंघाचे नियम पत्करण्यांत आपल्या विद्वत्तेला कमीपणा येतो, असें आमच्यांतीलच पंडितंमन्य अशा कित्येक लोकांना वाटत आहे. परंतु हा निव्वळ भ्रम आहे. या भ्रमाच्या मुळाशीं अज्ञान, किंवा व्यक्तिमहात्म्य हा दोष चिकटून

राहिला आहे. या गैरसमजुतीनें आत्मवंचना तर होतेच पण हिंदू समाजाच्या हितशत्रूंना आपला कावा साधण्यास तें अेक अुत्तम साधनच मिळतें. याचा अुपयोग मुसलमान, हिंदुस्थानचे सध्यांचे स्टेट सेक्रेटरी व प्रधानमंत्री यांनीं व्यवस्थित करून घेतला आहे आणि कारण नसतांना देखील अल्पसंख्याकांच्या प्रश्नांत त्यांनीं सावळागोंधळ अुडवून दिला आहे. ब्रिटिश अधिकाऱ्यांना राष्ट्रसंघाचा अनुल्लंघ्य निर्बंध कळत नाहीं असें नाहीं. परंतु तो हिंदुस्थानाला लागू करण्यानें त्यांचा स्वार्थ साधत नाहीं आणि ब्रिटिशांना तर आपल्या तोंडानें राष्ट्रसंघाच्या निर्बंधाला नांवें ठेवतां येत नाहींत. म्हणून हिंदुस्थानच्या लोकांना पुढें करून त्यांच्या हातूनच या राष्ट्रसंघाच्या निर्बंधाचा हिंदुस्थानांत अुभा होणारा साप मारण्याचा त्याचा बेत दिसतो. पण अशा वेळीं हिंदुस्थानानें राष्ट्रसंघाचा आधार घेअून या संकटांतून पार पडावें अशाविषयीं प्रस्तुत ग्रंथकारानें फारच कळवळून लोकांना विनंति केली आहे. याप्रमाणें राष्ट्रभक्तीनें प्रेरित होअून राष्ट्रमीमांसा हा ग्रंथ लिहिला असला तथापि ग्रंथकारानें आपली दृष्टि कोठेंहि भावनावश होअूं दिली नाहीं त्यामुळें प्रस्तुत ग्रंथांतील विवेचन अत्यंत शास्त्रशुद्ध असें अुतरलें आहे. शास्त्रदृष्ट्या राष्ट्राच्या मीमांसेला या ग्रंथानें आरंभच केला आहे म्हणजे राष्ट्रमीमांसा–शास्त्राचें हें मंगलाचरणच आहे असें म्हटलें तरी चालेल. प्रस्तुत ग्रंथांतील भाषा किंचित् अवघड अशी वाटली तरी शास्त्रविवेचनाच्या दृष्टीनें क्षम्य आहे असें आम्हांस वाटतें. आणखी हिंदूंच्या राष्ट्रधर्माची मीमांसा करतांना तींत परकीय भाषेंतील शब्द न येअूं देण्याचा ग्रंथकाराचा कटाक्ष लक्षांत घेण्यासारखा आहे. हा ग्रंथ लिहून ग्रंथकारानें राष्ट्राची जी अुज्ज्वल अशी सेवा केली आहे त्यासाठीं ग्रंथकारांचें मनःपूर्वक अभिनंदन करून ही प्रस्तावना पुरी करतो.

**सदाशिवशास्त्री भिडे.**

**संस्थापक–गीताधर्ममंडळ**

**पुणें.**

# विषयप्रयोजन.

जगांत जन्मणारा प्राणी ' मी ' रूप असतो. हें निरनिराळे ' मी ' परस्परानुकूल होणें वा परस्परविरोधक बनणें हें परस्पर हितसंबंधांत अेकमेक अेकमेकाला अनुकूल प्रतिकूल असण्यावर अवलंबून असतें. जेव्हां अेकाचे स्वतःच्या ' मी ' साठीं दुसऱ्याच्या ' मी 'चे सहकार्य लागतें तेव्हां ते दोन ' मी ' अेकत्र होतात व ज्या दोन ' मी ' चे हितसंबंध परस्परविरुद्ध जातात ते दोन ' मी ' अेकमेकांचे विरोधक बनतात. जसजसें हें हितसंबंध व्यापकस्वरूपाचे, अधिक काल व्यापणारे, व महत्त्वाचे होत जातात तसतशी अधिकाधिक ' मी ' ची संख्या अेकत्र येअून मूलसिद्धांतानुरूप अनुकूलप्रतिकूलतानुरोधें त्यांचे निरनिराळे गट पडत असतात. व याच गटांना जाति म्हणतात. वरील नियम सर्व प्राणीवर्गांना—मनुष्य, पशु, पक्षी आदिकांना—स्थूल मानानें लागतो. पशुपक्षिवर्ग आपल्या शरिराची पुष्टि व रक्षण आणि आपल्या ज्ञानेंद्रियाच्या भोगसुखाची परितृप्ति या गोष्टींत सर्व आयुष्यभर गुंग व मग्न असतात. मनुष्यामध्यें मन व बुद्धि यांचा विकास होअून ही अधिक सामर्थ्यसंपन्न झालेलीं असतात. पण शरीर—पुष्टी व रक्षण आणि अिंद्रियभोग—परितृप्ति यांच्यासाठीं साधन, विकास व वाढ यामध्येंच जोपर्यंत या मनबुद्धीच्या विकासित सामर्थ्यसंपन्नतेचा मनुष्यप्राणी विनियोग करीत राहील वा राहतो तोंपर्यंत तो पशुपक्षि यांहून मौलिकतेनें अधिक श्रेष्ठ ठरवितां येणार नाहीं. त्याला फार तर मानवी पशू वा पाशवी मनुष्य असें नामाभिधान देतां येअील. याहून त्याची अधिक योग्यता मानावयाला कांहींच कारण नाहीं. ' आहारनिद्रा भय मैथुनानि सामान्यमेतत् पशुभिर्नराणाम् '—आहार—निद्रा—भय—संभोग हे मनुष्यांचे व पशूंचे समानधर्म आहेत. यासाठीं पशुपक्षी व मनुष्य यांची योग्यता, जोंपर्यंत याच गोष्टींत मानवी मन असतें तोपर्यंत, अेकसारखीच आहे असें म्हटलें पाहिजे.

अधिक सुखाच्या प्रीत्यर्थ कमी सुख बळी देणें व अधिक महत्त्वाच्या वस्तूसाठीं कमी महत्त्वाच्या वस्तूंचा त्याग करणें ही तरतमबुद्धि प्राणि-

तो तत्वज्ञ व हा अिंद्रियसुखभोगी हे दोघेहि अिच्छातृप्त, समाधानी व सुखी झालेले वाटतात. पण त्या दोघांच्या अिच्छातृप्तिसुखांत केवढें महदंतर असतें हें लक्षांत घेणारी व्यक्ति निश्चितपणें त्या अिंद्रियसुखलोलुपाच्या सुखापेक्षां त्या तत्वज्ञानाच्या आनंदाचीच अभिलाषा धरील यांत तिळमात्र शंका नाहीं.ही गोष्ट लक्षांत घेतां नुसत्या अिंद्रियसुखाभिलाषा-परितृप्तीच्या सीमा गांठून तेथेंच विराम घेण्यापेक्षां अिंद्रियसुखाला साध्य करीत तेथेंच विराम न पावतां बौद्धिक अशा चिरंतनपणें टिकूं शकणाऱ्या व श्रेष्ठतेंत अनंत पटीनें अधिक असणाऱ्या आनंदाची प्राप्ति करून घेणारा वा करून घेअूं पहाणारा हा शतपटीनें अभिनंदनीय व सहस्रपटीनें अनुकरणीय समजला पाहिजे.

अेका पाश्चात्य तत्वज्ञानें " अेखाद्या पशूच्या पाशवी अिच्छातृप्तीच्या आनंदापेक्षां तत्वज्ञ मनुष्याचा आनंद अनेकपटीनें अधिक आहे हें तत्वज्ञच जाणूं शकतो. कारण पशूला केवळ आपलीच बाजू माहीत असल्यानें त्याला दुसऱ्या बाजूच्या आनंदांशीं आपल्या सुखाची कल्पना करतां येणें शक्य नाहीं. पण तत्वज्ञ मनुष्याला दोन्ही बाजू माहित असल्यामुळें तो तुलना दृष्टीनें श्रेष्ठकनिष्ठपणा जाणण्यास समर्थ असतो." अशा अर्थाचे अुद्गार काढले आहेत व ते अत्यंत अन्वर्थक आहेत.

" धर्म-संस्कृति आदिक सब झूट आहे. अर्थोत्पत्ती, अर्थप्राप्ति व त्याचे-द्वारा मिळणारें जागतिक सुख हीच काय ती मानवी प्रयत्नशीलतेची केंद्रवर्ती कारणत्रयी आहे. याव्यतिरिक्त बाकी सर्व गोष्टी स्वार्थमूलक हेतु-प्रेरित ढोंगें आहेत. " असें म्हणत व धर्मादिकांना तिलांजुली देत केवळ भौतिकवादी बनावयाचें अशी प्रवृत्ति आज जगांत फैलावत आहे. बौद्धिक जिज्ञासेची खरी परितृप्ति करण्यास सर्वस्वी असमर्थ अशा धर्म-नामधारी मतांच्या कक्षेंत राहणाऱ्या बुद्धिमान मनुष्यसमाजाची धर्मादिक गोष्टी-विषयीं अश्रद्धा अुत्पन्न होणें हें अगदीं साहजिक आहे. तसें होणें हें अपरिहार्य आहे. व म्हणून तसें झालें आहे, यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहीं नाहीं. ज्या मतांकडून बौद्धिक तत्वजिज्ञासेचें समाधान किंचिन्मात्रहि होअूं शकत नाहीं, त्या धर्ममतांकरवीं जनाकांक्षा-बुद्धि होरपळली जाअून मागें मुरडत ' धर्म आदिक सब झूट ' म्हणून जर जागतिक सुखेच्छापूर्ती

करून घेण्यांतच अितिकर्तव्यता मानूं लागली तर तिचा काय दोष ? सोनपितळ हातांत पडलेल्या व सोनें म्हणून फसलेल्यानें त्या पिवळ्या फसव्या पदार्थाला ' सब झूट ' म्हणत फेकून द्यावें हें अगदीं साहजिक, स्वाभाविक व योग्य होअील. पण तें दृश्य बघतांच हातीं सोनें असलेल्यानेंहि ' सब झूट ' म्हणत सोनेसुद्धां फेकून देण्याचें मनांत आणलें तर तो फसल्या मनुष्यासारखा शहाणा न ठरतां मूर्खशिरोमणी ठरेल. धर्मनामधारी मतवाल्यांची तत्वजिज्ञासा तृप्त न होअूं शकल्यानें त्यांनीं धर्ममतें झिडकारतांच ज्यांचा धर्म बौद्धिक जिज्ञासेची परितृप्ति करीत श्रेष्ठतम बौद्धिक आनंद देण्यास समर्थ असेल त्यानींहि ' धर्मादिक सर्व ढोंगें ' म्हणत जर नाचावयाला आरंभ केला तर तें कृत्य बुद्धिमान मनुष्यासारखें न ठरतां टोपी फेकून देणाऱ्या फसल्या मर्कटाप्रमाणें मूर्खासारखें ठरेल.

पाश्चात्य राष्ट्रांत बाह्यात्कारी धर्ममताची आस्था जरी दाखवली जात असली तरी व्यवहारतः तीं जडवादी; केवळभौतिक–वादी बनलेलीं आहेत व त्याच प्रवृत्तीचा परिपाक होअून बोल्शेव्हिक पंथानें धर्ममतादिक गोष्टींना अुघड अुघड तिलांजुली दिली. ते बघून आमचेहि परप्रत्ययनेय व अंधानुकरणप्रिय बनलेले शिक्षित तरुण–हिंदुबंधु त्याच गोष्टीचा अनुवाद करीत नाचूं लागले आहेत. परंतु बोल्शेव्हिझम स्वीकारलेल्या लोकांची त्यांचेजवळ ' धर्म ' म्हणून असलेल्या सोनपितळानें खरोखरीच फसवणूक झालेली आहे हें पहातांच आपल्याजवळ असलेल्या कल्याणकारी धर्मरूप सुवर्णालाहि सोनपितळ समजून अंधानुकरण करीत फेकून देण्यास त्यांनीं सिद्ध व्हावें ही निर्बुद्धता प्रकट करणारी कृति आहे. जगांतील श्रेष्ठ बुद्धिवंतांना जो धर्म आपल्या तत्वज्ञानाच्या दिव्यप्रकाशानें छिन्न संशय करून त्यांचे चित्ताला समाधान व शांति देअूं शकतो त्या सुवर्णमय धर्माला सोनपितळ समजून फेकूं पहाणाऱ्या दुर्दैवी मंडळीची कीव करावी तेवढी थोडी आहे. हिंदुधर्माची श्रेष्ठता व त्यांतील तत्वज्ञानाची अद्वितीय व अवर्णनीय महत्ता स्पष्ट करून दाखविण्याचें हें स्थळ नाहीं. त्याकरितां अखिल जगांतील मननशील, विवेकी व विवेचक तत्वज्ञांचे अुद्गारांच्या साक्षी बघाव्यात व आपल्या हातीं असलेल्या अमूल्य धर्मरूपी ठेव्याचे

यथार्थ स्वरूप त्यांनीं ओळखावें अेवढीच कळकळीची विनंति करणें येथें शक्य आहे.

सर्व जगांतील राष्ट्राच्या स्वरूपांत या नाहीं त्या रूपानें ' धर्मसंस्कृति ' या घटकांचा समावेश अपरिहार्यतेनें रहाणारच. परंतु कदाचित् राष्ट्कल्पनेंतील ' धर्म-संस्कृती 'चे घटक जगांमधून विलुप्त झाले—हें कधींहि सत्य-सृष्टींत घडून न येणारें विधेय घटकाभर शक्य मानलें तरीहि—हिंदुस्थानचे संबंधांत ' धर्म-संस्कृती 'चें घटक राष्ट्रकल्पनेंत अबाधितपणें व अखंडतेनें नित्य राहिलेंच पाहिजे. कारण ती ' धर्म-संस्कृति ' जगत्कल्याणकारी आहे. तिच्या नाशांत आपल्या हिंदुतेच्या श्रेष्ठतमतेचाच केवळ नाश नसून जगाचेंहि अकल्याण होणारें आहे. तेव्हां 'धर्म-संस्कृति' हे या सनातन व दिव्य हिंदू—राष्ट्राचे अविच्छेद्य घटक आहेत व ते तसेच राहिले पाहिजेत. ही गोष्ट हिंदूराष्ट्राच्या प्रत्येक घटकानें—या भारतभूच्या प्रत्येक सुपुत्रानें—लक्षांत ठेअून त्यांचे संरक्षणार्थ अुद्यतायुधतेनें सतत सिद्ध असलें पाहिजे.

हिंदुस्थान हा हिंदूंचा देश आहे. हिंदूजातीचें हें जन्मस्थान व निवासस्थान आहे. कांहीं आपलपोट्या स्वार्थी परकीयांनीं हिंदू हें हिंदुस्थानांत बाहेरून आलें व येथील निवासियांवर आपली धर्म-संस्कृति त्यांनीं लादली अशी विधानें अुठल्या सुटल्या साधेल तेथें करण्याचें सुरू ठेवलें व आपण हिंदूंनीं त्याच विधानाला खरें मानून आपली बुद्धि विपर्यस्त करून घेतली आहे. या विधानाच्या विषबीजाचा आपल्या हिंदूसमाजावर विषारी परिणाम कसा झाला आहे हें पुढें पुस्तकांत ओघानें अुल्लेखलें आहेच. हिंदुस्थानांत हिंदू अति प्राचीन कालापासून रहात आलें आहेत ही गोष्ट घटकाभर अेका बाजूस ठेअून निर्विवाद अशा ज्ञात अितिहासाच्या पुराव्यावरूनहि हिंदुस्थानांत हिंदू किती वर्षांपासून निवसत आहेत हें आपण बघूं.

सध्यां हिंदुस्थानांत हिंदूजातीच प्रमुख्यानें निवसत आहे व मुसलमानांच्या आक्रमक प्रवेशकालीं सर्व हिंदुस्थान हिंदूमयच होता. या दोन गोष्टी निर्विवादपणें सिद्ध असून कोणालाहि अमान्य करतां येणार नाहींत. हिंदुस्थानची ही हिंदूमयता किती जुनी आहे हें जरी आपणांला अनेक

मतामतांतराच्या गडबडींत अति प्राचीनपणाच्या दृष्टीनें निश्चितपणें सांगतां येत नसलें तथापि मुसलमानापूर्वी ४।५ हजार वर्षें तरी हिंदुस्थानांत हिंदू अेकमेवतेनें नांदत होते याविषयींची शंका घेण्याला कारण नाहीं. अि. स. पूर्वी ५०० म्हणजे मुसलमानांपूर्वी १५०० वर्षांच्या सुमारास बुद्धाचा अुदय झाला होता. बुद्ध काळापूर्वी महाभारत युद्धाचा काल कमीत कमी २००० वर्षांपूर्वीचा होता; असें पुरातत्वविवाद सांगतात. आणि महाभारताच्या वेळीं हिंदुस्थानांत हिंदूसंस्कृतीच्या तेजस्वीतेचा व अुत्कर्षाचा माध्यन्हकाळ होता. (हिंदूसंस्कृतीच्या माध्यान्हापूर्वीच्या कालाचा विचार केला तर तो काल किती तरी मागें न्यावा लागेल ). या माध्यान्हापूर्वीचा काल गणनांत न घेतांहि हिंदुस्थानांत मुसलमान प्रवेशापूर्वी ३॥-४ हजार वर्षें तरी हिंदूसंस्कृति व जाति निश्चितपणें अेकरसतेनें नांदत होतीं. मुसलमानांपूर्वी कमी अधिक मानानें दिसून आलेल्या ४००० वर्षांच्या काळांत महाभारत-कालीन माध्यान्हपूर्वीचा कंजूषपणानें अनुमानात्मक कमींत कमी काल मिळविला तरीहि किमानपक्षीं ६।७ हजार वर्षें तरी हिंदुस्थान हिंदूमयच आहे यांत संशय घ्यावयास कोणालाहि जागा नाहीं.

हिंदुस्थानांत मुसलमान प्रवेश होण्यापूर्वी हिंदुस्थानांत हिंदूधर्म-संस्कृति -भाषा व हिंदुजाती यांसह हिंदुराष्ट्र ६।७ हजार वर्षें तरी वैभवसंपन्नतेनें नांदत होतें हें स्पष्ट आहे. अि.स.च्या १० वें शतकापूर्वीपासून मुसलमानी आक्रमणें सुरू होअून हिंदुस्थानच्या अेकरसीपणांत भिन्नतेचें मारक विष शिरूं लागलें. शरीरांत प्रविष्ट होणारें पदार्थ शरीराला अुपकारक व शरीराशीं समरस होणारे नसल्यास ज्याप्रमाणें शरीरहानि करण्यास कारणीभूत होतात त्याचप्रमाणें राष्ट्रशरीराला हानिकारी व विरोधी पदार्थांचे प्रमाण राष्ट्रशरीर सामर्थ्याहून अधिक बलवत्तर झाल्यास मारकहि झाल्यावांचून रहात नाहींत. हिंदुस्थानच्या शरीरांत मुसलमानी संस्कृतीचा विषारी सुरा खुपसला जाअून त्या विषानें हिंदूराष्ट्र-शरीराचा बराचसा भाग विषाक्त करून ठेवलेला आहे. पुढें पाश्चात्य खिश्चन संस्कृतीचें मारक अस्त्रहि या हिंदुराष्ट्राच्या शरीरांत घुसून तें शरीर ग्रासूं लागलें आहे. आणि तरीहि या राष्ट्रशरीराची प्रबल जीवनशक्ति अद्याप सर्वतोपरी हीनसत्व व स्वसंरक्ष-

णास असमर्थ झाली नाहीं. याच वेळीं जर हिंदुस्थानचा हिंदू-राष्ट्रपुरुष जागा झाला आणि मरणीं मारूं पहाणाऱ्या मारक अशा विषपरिणामी गोष्टींची मारकता कमीतकमी निःसत्व व मारकशक्तिहीन करून टाकूं शकला तर अद्याप हा हिंदुराष्ट्रपुरुष पुन्हां नवजीवनानें तेजस्वी बनून आपलें सनातनत्व सनातनपणें टिकवूं शकेल. शरीरांत शिरलेल्या गोळ्या, शस्त्राशल्यें वा आंत शिरलेल्या क्षयाचे विषानें निर्माण झालेल्या क्षयाच्या गांठी जरी पूर्णपणें काढून टाकणें कधीं कधीं अशक्य झालें तरी पीडित शरीरांत नवजीवनद रसायनानें नवशक्ति संचरून तें शरीर पुन्हां त्या मारक अशा विषारी वस्तूंना निर्वीर्य व मारकशक्तिशून्य बनवूं शकतें त्याचप्रमाणें राष्टशरीरहि आत्मगत विषारी मारक द्रव्यांना आहेत कीं नाहींत अशा स्थितीला निरुपद्रवी स्थीतीला निश्चितपणें पोचवून टाकूं शकेल.

ही गोष्ट घडून यावी, हजारो वर्षांपासून या हिंदुस्थानांत चिरंतनपणें नांदत आलेले हिंदुराष्ट्र यापुढेंहि अखंडपणें नांदत राहावें, आज हजार वर्षांपासून आघातावर आघात होत असल्यामुळें दिङ्मूढ होऊन गेलेलें हें हिंदूराष्ट्रमत परत शुद्धीवर यावें व आपल्यांतील चिरजीवनद जीवनरसानें पुन्हां समर्थ व बलशाली बनून या जगावर वैभवदीप्तीनें व श्रेष्ठपणानें जगच्छीर्षस्थानीं शोभावें यासाठीं त्याची आत्मविस्मृति नाहींशी करून स्वतःच्या खऱ्या राष्ट्रस्वरूपाची जाणीव उत्पन्न करणें अवश्य-अत्यंत अवश्य-आहे. आत्मविस्मृतीसारखें दुसरें मारक वीष नाहीं. तें नष्ट करून टाकण्यासाटीं हिंदुस्थानला ' मी कोण ' ! याची खरी ओळख झाली पाहिजे. आणि यासाटींच या पुस्तकाचा प्रपंच केला आहे.

हिंदुराष्ट्रपुरुषरूपी पार्थाची दिङ्मूढता नष्ट होवो व त्याला पार्थसारथी भगवंताचें सारथ्य लाभून तो आपल्या परमोत्कर्षाचा वैभवमार्ग आक्रमूं लागो !

**दुर्गातनय.**

# राष्ट्रमीमांसा

आणि

# हिंदुस्थानचें राष्ट्रस्वरूप

## [ पूर्वार्ध ]

### " राष्ट्राचे देश, जाती, धर्म, संस्कृति व भाषा हे प्रमुख घटक होत. "

राष्ट्र हा शब्द भारतीय वाङ्मयांत अत्यंत प्राचीनतम कालापासून सांपडतो. राष्ट्रकल्पनेचा उगम व वर्धन पाश्चात्य देशांत जरी सुमारें कांहीं शतकांपूर्वींपासूनच झालें असलें व ती त्यांना नवीनशी कल्पना वाटत असली तरी हिंदुस्तानाला ती कल्पना नवीन नाहीं. संस्कृत वाङ्मयांतील प्रत्येक शब्द त्या त्या उल्लेखनीय वस्तूच्या गुणविशेषाचा अर्थबोधक असतो. तेव्हां ' राष्ट्र ' हाही शब्द कांहीं विशेष अर्थबोधक असलाच पाहिजे. परंतु आधीं ' राष्ट्र ' शब्दार्थवाची म्हणून पश्चिमीय भाषेंतील ' नेशन ' हा शब्द घेऊन त्याची व्याख्या व अर्थ तद्देशीय लोक काय घेतात हें पाहणें अनेक कारणांनीं आवश्यक वाटून, ' नेशन ' ह्या शब्दाचा अर्थ ते लोक काय

करतात व त्या शब्दाची व्याख्या ते काय समजतात हें प्रथमतः आम्ही पुढें देत आहोंत.

' नेशन ' हा अिंग्रजी शब्द व तदर्थकच थोडयाशा रूपांतरानें योजलेले अितर पश्चिमीय शब्द, आपण ' राष्ट्र ' ह्या शब्दानें जो अर्थ समजतो त्याच अर्थी वापरलेले असतात; व म्हणून वारंवार त्या भाषेंतील शब्दांचा अुपयोग न करितां त्यांची व आमची कल्पना अुल्लेखण्यासाठीं ' राष्ट्र ' हाच शब्द ह्यापुढें अुपयोजिला आहे. राष्ट्र ह्या शब्दाच्या विशेष व्यापक व सर्वग्राही व्याख्या आरंभीं न देतां त्या व्याख्यांचें रूपरेखात्मक संक्षिप्त स्वरूप ध्यानांत येण्यापुरतें निरनिराळ्या अिंग्लिश कोशकारांनीं जे अर्थ सांगितले ते पहिल्यानें येथें दिले आहेत.

वेब्स्टरच्या कोशांत ' राष्ट्र ' शब्दाचा अर्थ—( A class of people distinguished by common descent, customs, and language ) " वंश, रीतिभाति व भाषा या योगें इतरांपासून विभिन्नता व विशिष्टतागुणानें निराळे असलेले लोक म्हणजे 'राष्ट्र' "—असा दिला आहे. त्याच अर्थासारखे आणि तत्त्वत: अेकमताचे असे अितरही अिंग्लिश कोशकारांनीं ' राष्ट्र ' ह्या शब्दाचे अर्थ दिले आहेत. फाअुलर आपल्या कोशांत म्हणतो—

( Nation means a people or race distinguished by community of descent, language, history or political institutions ).

" वंश, भाषा, अितिहास व राजकीय संस्था, आदीक गोष्टींनीं अितराहून विभिन्नत्वानें निराळे दिसणारे लोक म्हणजे ' राष्ट्र ' होय " अितरही अिंग्लिश कोशकार अशाचप्रकारें व हाच अर्थ असणाऱ्या अशा ' राष्ट्र ' शब्दाच्या व्याख्या देतात.

या कोशकारांनीं दिलेले अर्थ जरी त्या राष्ट्रकल्पनेच्या यथार्थतेकडे अंगुलीनिर्देश करून त्या शब्दकल्पनेचें यथार्थत्व दाखवूं पहात असले तरी राष्ट्र ह्या शब्दाचें खरें पूर्णस्वरूप लक्षांत येण्यासारखी सशास्त्र व निर्दोष व्याख्या देअूं शकत नाहींत. व म्हणून ह्या शब्दाची यथार्थ व्याख्या करूं पाहाणाऱ्या राजकारणशास्त्रकारांकडे धांव घेतली पाहिजे. पश्चिमीय देशांत

अनेक राजकारणशास्त्री आपापल्या परीनें पूर्णार्थदायी व्याख्या देऊन चुकले आहेत. त्यांतील मुख्य शास्त्रीमंडळींच्या व्याख्या बघून ‘ राष्ट्र ’ शब्दाचा अेकरूप अर्थच त्यांना मान्य आहे कीं नाहीं हें बघणें आहे.

१ प्रो. होल्कोंबे म्हणतो—

( It (nationality) is a corporate sentiment, a kind of fellow feeling or mutual sympathy retating to a definite home-country. It springs from a common heritage of memories whether of great achievements and glory or of disaster and suffering. ")—

" स्वदेशाविषयीं ममत्व भावना व स्वदेशियांविषयीं संयुक्तारूपी अेकत्व भावना ही राष्ट्रीयता होय ! पूर्व गौरव व वैभव अथवा पूर्व संकटें व सुखभोग ह्यांच्या परंपरागत स्मृतिपासून ही भावना अुद्भवते. "

२ बर्गस् म्हणतो:—

( People or nation means population having a common language and literature, common customs and a common consciousness of rights and wrongs, inhabiting a territory of a geographical unity. )

" अेकरूप भाषा आणि वाङ्मयासारख्या चालीरीति व नीतिअनीतीच्या समान कल्पना असणारे आणि भौगोलिक दृष्टीनें अविभक्त असलेल्या अेक्या देशांत राहणारे लोक यांच्या समवायाला राष्ट्र वा जनपद म्हणावें."

३ गमप्लाविक्झ् हा राष्ट्र शब्दाचा व्याख्याकार फारच थोडया शब्दांत पण पूर्ण अर्थगर्भतेनें ‘ राष्ट्र ’ शब्दाची व्याख्या ( Community of civilization–" सांस्कृतिक अेकता " याप्रमाणें देतो.

४. ब्लुंटस्ली नांवाचा अेक प्रख्यात जर्मन राजकारणशास्त्री म्हणतो:—

( It is a a union of masses of men of different occupations and social state in a heriditory society of common spirit. Feeling and race, bound together especially by language and customs in a *common civilization* which gives them a sense of unity and distinction from all foreigners quite apart from the bond of the state. )

" अेकजातीयता, भ्रूत्यैकता आणि भावनासाम्य यांच्या आनुवंशीक

प्रवाहानें व विशेषतः भाषा व रीति ह्यांच्या द्वारा बनलेली **संस्कृति-समानता** ह्यांच्या योगें समाजांतील निरनिराळ्या थरांचे आणि व्यवसायांचे लोक अकेता सूत्रानें बद्ध होतात; त्या अेकरूप झालेल्या मनुष्यसमूहाला 'राष्ट्र' असें म्हणतात. ही राष्ट्रीयता राज्यशासनसंस्थेची अपेक्षा न ठेवतांही अितर परकीयांपासून त्या मनुष्यसमूहाला स्पष्टतेनें व वेगळेपणानें विशिष्ट रूप देऊं शकते."

५. गेटेल् ह्या ग्रन्थकारानें आपल्या-'अिंट्रोडक्शन् टु पोलिटिकल सायन्स' नांवाच्या पुस्तकांत असें सांगितलें आहे कीं :—( Nationality is to denote a population having common bonds of race, language, religion, tradition and history. These influences create the consciousness of unity that binds individuals into a nationality. )

"जाति, भाषा, धर्म, परम्परा आणि अितिहास ह्यांच्या अेकता संबन्धामुळें लोकसमाजाला जी अेकता मिळालेली असते तिला राष्ट्रीयता म्हणतात. हे घटक ह्या समाजांतील प्रत्येक व्यक्तीला अेकराष्ट्रीयतेच्या भावनेशीं निगडित करून ठेवतात."

६. 'भारतीय राज्यशासन'-(अिण्डिअन अॅड्मिनिस्ट्रेशन्) नांवाच्या श्री. काळे ह्यांनीं लिहिलेल्या पुस्तकांत ते लिहितात—('A nation is a community, members of which are bound to one another by racial, ethentic, religious, and linguistic ties.')-

"जातीय, दैशिक, धार्मिक, भाषाविषयक एकतेनें निबद्ध असलेल्या व्यक्तींच्या समुदायाला वा समाजाला 'राष्ट्र' असें म्हणतात."

याप्रमाणें अनेक राज्यकारणशास्त्रलेखकांचीं मतें येथें देतां येतील. या सर्वांचा निष्कर्ष द्यावयाचा असल्यास सर्वांच्या म्हणण्याची सारभूत व्याख्या पुढील शब्दांनीं करावी लागेल. 'अेक देश, भाषा, धर्म व वाङ्मय, अितिहास, परंपरा, चालीरीति' अेकजातियता, हितसंबंधांची अेकता, राजकीय अेकता इ० गोष्टींच्या समानतेचें बन्धनानें व अेकरूपतेनें अेक-राष्ट्रीयता निर्माण होते. देश, जाति, धर्म, संस्कृति व भाषा हीं राष्ट्रीयतेचीं

मुख्य पांच अंगें आहेत. ह्याच पांच घटकांपैकीं कोणत्याही अेका घटकाचा नाश झाला असतां राष्ट्रीयता भंग पावते. ह्या पांचाव्यतिरिक्त अितर घटक असल्यास राष्ट्रीयता परिपुष्ट होअील. व नसल्यास राष्ट्रीयतेला थोडे-बहुत प्रमाणांत व्यङ्गता व निर्बलता येअील; परन्तु वरील पांचांपैकीं मात्र कोणत्याही अेका घटकाचा नाश झाला कीं बाकीचे घटक निर्जीव होअून पडतात; आणि राष्ट्र मृत्यूच्या जबड्यांत सांपडून नष्ट होतें. आतां या पांच घटकांपैकीं अेक अेक घटक घेअून अन्वयव्यतिरेकानें त्या त्या घटकाची राष्ट्र–जीवनाला कशी अपरिहार्य आवश्यकता आहे हें पाहिलें असतां हे पांच घटक किती अत्यावश्यक आहेत याची यथार्थ कल्पना येअील. प्रथमतः त्या पांच घटकांपैकीं पहिला घटक ‘ देश ’ हा विचारार्थ घेअूं.

१ देशः—कोणत्याही समाजाला आपली अुन्नति करून घ्यावयाला व आपला अभ्युदय साधून स्थिर राष्ट्रजीवन निश्चित राहण्यासाठीं चिरन्तन रूपानें ‘ आपला ’ असें निर्भयपणें म्हणतां येईल, जेथें निर्वेधपणें राहातां येईल आणि शक्य त्या प्रकारें भौगोलिक मर्यादेनें आंखलेला असेल असा भूप्रदेश–‘ स्वदेश ’ असला पाहिजे. ज्या ज्या समाजाला असे देश मिळाले तो तो समाज आपापलें राष्ट्र बनवून राष्ट्रस्वरूपानें जिवन्त राहूं लागला. जगांत असें अेकही अुदाहरण नाहीं कीं ज्या समाजाला देशाचा लाभ न घडतां तो समाज राष्ट्ररूपाला पोंहोंचूं शकला. अुलट अशी मात्र अुदाहरणें देतां येतात कीं ज्या राष्ट्रांतील समाज आपल्या देशाला मुकला त्या समाजाचें राष्ट्रीयत्व देशहानीबरोबर नष्ट झालें. अिराण देश हा पारशी लोकांचा स्वदेश होता. संस्कृति–धर्म–जाति–भक्षक अशा मुसलमानांच्या टोळधाडीनें उध्वस्त होणाऱ्या आपल्या स्वदेशांतून आपला पवित्र व पूजनीय अग्नि घेअून आपल्या व आपल्या संस्कृतीच्या रक्षणासाठीं आश्रय शोधनार्थ जेव्हां पारशी लोक देशान्तराला निघाले व त्यांचा स्वदेश त्यांना सुटला त्याच क्षणापासून त्यांची ( क्षीणावस्थेंत आलेली ) जाति, धर्म, संस्कृति व भाषा घेअून जरी बाहेर ते पडले तरी देशाच्या अभावानें त्यांच्या राष्ट्रीयत्वाला ठाव अुरला नाहीं. त्या देशान्तरित पारशी जातीला आश्रय-स्थान झालेल्या हिन्दुस्थान देशांत पारशी लोक आपला धर्म, संस्कृति व कांहीं अंशानें भाषा यासह जाति रूपानें अस्तित्वांत आहेत तरी ‘ जगांत

पारशी राष्ट्र जिवन्त आहे काय !' असा प्रश्न मनापुढें अुभा राहिला असतां–" नाहीं ! " असें स्पष्ट अुत्तर मनाला देणें भाग पडतें. तीच गोष्ट यहूदी वा ज्यू लोकांची ! पॅलेस्टाअीन हा त्यांचा देश. परन्तु आपला देश सोडून जेव्हां त्यांना आपली संस्कृति व धर्मरक्षणार्थ, अथवा आपल्या जीवाच्या भयानें, देशत्याग करावा लागला व यहुदी जाति आपल्या देशाला मुकली–त्याच क्षणापासून–त्यांचें राष्ट्रजीवन संपलें. यहूदी लोक परकीयांच्या अत्याचारांपासून संस्कातिरक्षणहेतूनें हिन्दुस्थानाकडे आले आणि येथें ते जवळ जवळ हजार वर्षें रहात आहेत. अितर देशांतूनही यहूदी लोक पुष्कळ रहातात. ह्या दोनही जातींतील लोक सामान्यतः धनसम्पन्न, सुखी व पुढारलेले आहेत, आणि तरीही स्वदेशाचें अस्तित्व नष्ट झाल्यामुळें स्वतःच्या पारशी वा यहूदी राष्ट्रीयत्वाला ते मुकलेले आहेत. राष्ट्ररूपानें यहूदी वा पारशी राष्ट्र जिवन्त नाहीं. अशा प्रकारचीं अनेक अुदाहरणें जगाच्या हजारों वर्षांचे अितिहासांत सांपडतील. परन्तु आपल्या वरील विधानाच्या सत्यतेला येवढीं दोन अुदाहरणें पुरीं आहेत.

२ **जाति**—जाति नष्ट झाल्यास राष्ट्र नष्ट होतें हें म्हणणें सूर्य मावळला म्हणजे रात्र होते ह्या स्पष्ट दिसणाऱ्या सिद्ध गोष्टीच्या उपपादनाप्रमाणेंच अनवश्यक आहे. आणि तरीही ह्या गोष्टीची थोडीशी स्पष्टता झाली पाहिजे. वरील पारशी व यहुदी जातींचीच गोष्ट घेऊं. ह्या दोनही जाति जगांत ज्या दिसत आहेत त्या त्यांच्या देशांत जर ते पूर्णपणें निर्भयतेनें असल्या तर जितक्या संख्येंत असत्या त्या स्थितींतल्या संख्येच्या मानानें आज फारच थोड्या संख्येंत आहेत. कदाचित् दुर्दैववशातः स्वरक्षणार्थ निसटून जाण्याच्या प्रयत्नांत त्यांना अपयश मिळतें व त्या राक्षसी अत्याचारकांच्या भक्षस्थानीं त्यांना पडावें लागलें असतें तर त्यांचा देश आणि ग्रन्थादिकांतून त्यांचा धर्मआदिक आज आहेत तशीच राहिली असती, तरीही पारशी व यहूदी राष्ट्राच्या अस्तित्वाचा प्रश्नही कोणाच्या मनांत उद्भवला नसता. रूपकानें बोलावयाचें तर 'देश' हा राष्ट्राचें अधिष्ठान असून जाति हा राष्ट्राचा देह आहे. उरलेले धर्म, संस्कृति, भाषा हे तीन घटक हे त्या राष्ट्राचे जीवमनादिक होत असें म्हणतां येईल. देह पतन पावतांच जीव–मनादिक हीं दृश्यापलीकडे जातात व सजीवत्वाचा नाश होतो. त्याच-

प्रमाणें जातीचा नाश होतांच बाकी सर्व आपापल्यारूपाने अस्तित्वांत असतांही राष्ट्रीयता नष्ट होते.

३ **धर्म-संस्कृति-भाषाः**—हीं तिन्हींही अेकरूप म्हणतां येणार नाहींत. तरीपण ह्यापैकीं कोणाही अेकाला अितर दोघांपासून संपूर्ण भिन्नत्वानें व निरपेक्षपणानें स्वतंत्र रूपांत कल्पितांही येणार नाहीं. सामान्यत्वेंकरून बोलावयाचें तर या तिन्हींचाही समवाय सम्बन्ध असतो. जगांत धर्म म्हणून अेकच असूं शकतो, किंवा सध्यां समजूत आहे त्याप्रमाणें जगांत अनेकधर्मता आहे वा असूं शकते ह्या वादाला ह्या स्थळीं उत्थापित न करितां असें म्हणतां येईल कीं जेथें धर्म व त्यांतील मूलभूत तत्त्वज्ञान ह्यांची ताटातूट झालेली नसते तेथें धर्म-संस्कृति व भाषा हीं परस्पर संबद्ध असतात. त्यांतील कोणत्याही अेकाला बाकीच्या दोघांपासून सर्वस्वी विलगरूपानें स्वतंत्रपणें वेगळें करून दाखवितां येणार नाहीं.

हें जरी खरें आहे तरी जेथें तत्वज्ञानाला फाटा देऊन धर्म या नांवानें जेव्हां तत्त्वज्ञानविहीन कांहीं मतें प्रचलीत असतात, त्या वेळीं मात्र संस्कृति व भाषा हीच पूर्णतया समवायानें राहूं शकतात. व धर्ममताला त्यापासून विभक्तता कांहीं अंशीं प्राप्त होते. आणि तरीही सर्वस्वीं विभिन्नता ह्यापैकीं कुणालाही येऊं शकत नाहीं. जगांत सर्व व्यवहार भिन्नतेच्या अन्नावर पोसला जात असतो. धर्म, संस्कृति व भाषा ह्या त्रयींची विभिन्नता जरी सामान्यत्वें करतां येत नाहीं तरी तत्त्वज्ञानापासून संबंध तुटलेल्या धर्ममताच्या स्थितींत मतसामान्यता असूनही सांस्कृतिक व भाषाविषयक भिन्नता राष्ट्रभिन्नतेला पोषक होतात. उदाहरणार्थ युरोप खण्ड बघावें. खिस्ती मत हें सर्व खण्डभर पसरलेलें आहे आणि तरीही प्रत्येक देश इतर देशांपासूनच्या आपल्या राष्ट्रभिन्नतेंत सांस्कृतिक व भाषाविषयक भिन्नतेचा प्रमुख घटक मानीत आहेत. जर्मनीचें कल्टर्, अिंग्रजांचें कल्चर, वा इतर देशांचें तद्दर्शक तत्सम शब्द संस्कृतिभिन्नतेचा त्या त्या देशांतील लोकांचा अभिनिवेश दर्शवतात. भाषाभिन्नता तर न अुल्लेखतांही ध्यानांत येण्यासारखी आहे. तीच गोष्ट मुसलमान देशांची. तेथेंही धर्ममताची अेकता असूनही प्रत्येक देशाची सांस्कृतिक व भाषाविषयक भिन्नता राष्ट्रभिन्नतेला परिपोषक होत आहे. अशी कल्पना करूं कीं

अनेक देशांची जर एक भाषा, एक धर्म व एक संस्कृति करतां आली तर काय होईल ? राष्ट्रभिन्नतेला भाषा, संस्कृति व धर्म हीं प्रवर्धक व परिपोषक होणार नाहींत इतकेंच ! पण जगाचें अन्न जें विभन्नता तें जाति व देशरूपानें अस्तित्वांत राहाणारच व येवढी विभिन्नताही राष्ट्रां-राष्ट्रांमधील अनेकता जिवन्त ठेवण्याला पुरेशी आहे. धर्म-संस्कृति-भाषानाश हा राष्ट्राचें अस्तित्व नष्ट करतो पण जेथें अेक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राचा प्राण घेण्याकरितां धर्म-संस्कृति-भाषा ह्यांच्या साम्यामुळें त्यांच्या नाशाला प्रवृत्त होत नाहीं व म्हणून त्यांच्या नाशामुळें अुत्पन्न होणारें राष्ट्रनाशाचें कारण अस्तित्वांत असूं शकत नाहीं, तेव्हां राष्ट्रनाशाकरितां जाति नष्ट करणें वा जातीचा देश हिरावून घेणें ह्या दोन गोष्टींमुळेंच काय तो राष्ट्रनाश करणें शक्य असूं शकते. परन्तु ह्या वस्तुस्थितीमुळें धर्म-संस्कृति-भाषानाशानें राष्ट्र नष्ट होतें हें पूर्वीं केलेलें विधान अभंग व अतूटच राहाते, त्याचा भंग होत नाहीं.

वरील त्रयींपैकीं सामान्यत्वें कोणत्याही अेकाचा नाश बाकी दोघांच्या नाशास कारणीभूत होतो असें वर म्हटलेलें आहे. पॅलेस्टाअीनमधील यहूदी लोकांचे वंशज व अिराणांमधील पारशी जातींचे वंशज हे त्या त्या देशांत सध्यां ख्रिस्ती व मुसलमान नांवानें जिवन्त आहेत. यहूदी लोकांचें यहूदी धर्ममत व पार्शी लोकांचें पार्शी धर्ममत हीं नष्ट झाल्यानें त्याच पूर्व जातीच्या हाडा-रक्ता-मांसाचे दृष्टीनें त्यांचेच वंशज व त्याच देशांत रहात असतांही ज्यू-राष्ट्र व पार्शी-राष्ट्र जिवन्त आहे असें हट्टी भोन्दू वा एखादा वेडसर मूर्ख यांवाचून दुसरा कोणीही म्हणूं शकणार नाहीं-म्हणूं शकत नाहीं. आणि ह्याचें कारण म्हणजे त्या त्या देशांतील धर्म,संस्कृति,भाषा हीं नष्ट झाल्यामुळें तीं दोन्हींही राष्ट्रें त्यांच्या मूळच्या देशांत अस्तित्वांत नाहींत-नाश पावलीं असेंच म्हटलें पाहिजे; हें कुणालाही नाकारतां येणें शक्य नाहीं. ज्याला सध्या अफगाणिस्तान म्हणून ओळखतात त्या प्रदेशाचें पूर्वीं ‘ गान्धार ’ देश हें नांव होतें हें सर्व विश्रुत आहे. तो हिंदुस्तानचा भाग होता आणि हिंदुस्तान राष्ट्र म्हणतांच अपरिहार्यतेनें त्या भूभागाचाहि समावेश त्यांत होत होता. परंतु आज काय स्थिति आहे ? भौगोलिक परिस्थिति जशी पूर्वीं होती त्यांत आजपर्यंत कांहींहि बदल झाला नाहीं. रक्तमांस व वंश-

दृष्टीनें अफगाणिस्थानांतील सांप्रत पठाण नांवानें ओळखले जाणारे लोक हिंदूच आहेत; आणि तरी सुद्धां आज अफगाणिस्तानाला हा स्वतंत्र देश नाहीं व त्या देशांतील लोक हे हिंदुराष्ट्राचे घटक आहेत असें कधींहि व कोणालाहि म्हणण्याचें धाष्टर्य होणार नाहीं. देश तोच, भौगोलिक मर्यादा त्याच, जाती तीच, पण धर्म-संस्कृती व भाषा यांच्या नाशानें त्या प्रदेशांत त्या प्रदेशापुरती तरी हिंदुराष्ट्रीयता नष्ट झाली आहे. त्या स्थलीच्या राष्ट्रीयता नाशाचें कारण म्हणजे धर्मादित्रयीचा नाश हेंच आहे असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं. बलुचिस्थान हेंहि अेक त्याच जातीचें अुदाहरण आहे. धर्म-संस्कृती व भाषा यांची अेकता असते अशा देशांच्या परस्पर लढ्यांत या त्रयीच्या नाशाचा प्रश्नच नसतो. कारण ते देश परस्परांतील आक्रमणादिकांच्या लढ्यांत अेकमेकांच्या धर्मसंस्कृती-आदिकांचा नाश करण्यास अुद्युक्त होणें शक्य नसतें. आणि म्हणून त्या त्रयीच्या नाशामुळें राष्ट्रहानि व राष्ट्रनाश होण्याचा संभव अुरत नाहीं. अुरतां अुरली देश व जातीभिन्नता आणि तेवढीच भिन्नता राष्ट्रजीवनाच्या व मृत्यूच्या प्रश्नाशीं निगडित झालेली असते. त्यांपैकीं कोणत्याहि अेका घटकाच्या नाशानें त्या राष्ट्राचा नाश झाल्याचें दृश्य पुढें येण्यासारखें असतें. सध्यां राष्ट्रांच्या घटकांपैकीं धर्म-संस्कृति-भाषा या घटकांची-विशेषतः धर्म व संस्कृति-कल्पनांची-अुचलबांगडी करून राष्ट्रघटकांत त्यांचा समावेश करावयाचा नाहीं आणि शक्य तर त्यांचा नायनाटच करावयाचा असा अेक पक्ष निघाला आहे. या पक्षानें ज्या धर्मकल्पनेची अुचलबांगडी करून तिला तिलांजली देण्याचें ठरविलें आहे त्या धर्मकल्पनेनें त्यांनाहि सोडलें नाहीं. “ अीश्वरपरलोक आदिक खुळें कांहीं मूर्खांनीं व भोंदूंनीं काढलीं असून धर्मकल्पनेंत सर्व थोतांड भरलेलें आहे. जो काय आहे तो हा अिहलोकच सत्य आहे व आपण अिहलोकीं आहोंत तोंवर आपण सर्वांनीं सुखोपभोगजीवी कसें व्हावें अेवढेंच बघणें हा आपल्या अिष्ट साधनाचा मार्ग आहे. ” या सारभूत ‘ तत्त्वज्ञाना ’ ची विस्तृत मांडणी करून या पक्षानें आपलें मत सजविलें आहे. या पक्षालाहि धर्मकल्पनेनें सोडलें नाहीं. धर्माचें होकारात्मक वा नकारात्मक प्रतिपादन असलें तरी प्रतिपादन मात्र धर्माचेंच चाललेलें असतें. अस्तिपक्षीं म्हणजे होकारात्मक धर्मपक्षीयांना

ज्याप्रमाणें आपल्या पक्षाचें तत्वज्ञान मनुष्य व्यवहारांतील सर्व क्षेत्रांत प्रतिबिंबित झालेलें पहावेशी अिच्छा असते; त्याचप्रमाणें धर्माचे नास्तिपक्षीं म्हणजे नकारात्मक प्रतिपादन करून आपल्या सर्व अनुयायांना व पक्षीयांना नास्तिकतेच्या रंगांत रंगलेले असे प्रत्येक व्यवहारांत बघावें अशी त्यांनाही अिच्छा असते. या अिच्छानुरूप नास्तिपक्षीय धर्मकल्पनेचेंहि अस्तिपक्षीय धर्मकल्पनेप्रमाणें प्रचंड वाङ्मय निर्माण होअून ती अेक निराळीच संस्कृति अस्तित्वांत येते. नास्तिपक्षांतील धर्मकल्पना, तदनुरूप अुत्पन्न होणाऱ्या विविध प्रकारच्या वाङ्मयशाखा, त्यामुळें अुत्पन्न होणारी तज्जातीय संस्कृती या गोष्टी त्या राष्ट्राच्या विशेष ठरतात. आणि या विशिष्टत्वानें युक्त असेपर्यंत हीं राष्ट्रें आपलें विशिष्ट अस्तित्व राखूं पहातात. अेवंगुणविशिष्टता जोंपर्यंत राहील तोंपर्यंत त्या राष्ट्रांची राष्ट्रीयता असणें नैसर्गिक असते. व तें विशिष्टत्व जातांच तज्जनित राष्ट्रीयतेचाहि अंत होतो. अशा राष्ट्रांची राष्ट्रीयता अितर राष्ट्राच्या अस्तिपक्षी धर्मसंस्कृतीच्या घटकांप्रमाणेंच नास्तिपक्षीय धर्म-कल्पना व तदनुगामी संस्कृति यांच्या नाशानें त्यांची नवनिर्मित राष्ट्रीय-ताहि परंपरासिद्ध राष्ट्रीयतेप्रमाणें नाश पावतें वा पावेल यांत मात्र तिलप्राय संदेह नाहीं.

हें लक्षांत घेतां आपण आरंभीं राष्ट्राचें अविभागनीय म्हणून जे पांच घटक ठरविले आहेत, त्यांची निरपवादिता कशी आहे हें स्पष्ट दिसून येअील. जगांतील निरनिराळ्या देशांची अुदाहरणें घेअून विविध कालीं भिन्न भिन्न परिस्थितींत राष्ट्राचे अुत्कर्ष वा नाश कसे झाले आणि त्या अुत्कर्षाला वा नाशाला आपण येथवर बघितलेल्या राष्ट्रघटकांचें अस्तित्व वा चलबिचल कशी कारणीभूत झाली हें विवेचन करून वरील सत्यच प्रत्ययाला आणून देतां येअील. पण त्यायोगें अनवश्यक विस्तार होअून पुस्तकाचा निष्कारण आकार वाढेल. ज्यांना येथपर्यंतच्या विधानांची सत्यता बघावयाची असेल त्यांनीं अितिहासांतील अनेक अुदाहरणें बघून त्यांची सत्यासत्यता पटवून घ्यावी.

प्राचीन संस्कृत वाङ्मयांत भारतीयांनीं राष्ट्र या कल्पनेकडे लक्ष दिलें होतें कीं नाहीं व तसें तें दिलें असलें तर त्यांनीं राष्ट्र कल्पनेची काय व्याख्या केली आहे, हें आतां पाहिलें पाहिजे. प्राचीनकाळीं म्हणजे ४ते५

हजार वर्षांपूर्वी जवळ जवळ सर्व ज्ञात जगांत भारतीय संस्कृतीचाच फैलाव झालेला होता, अथवा सर्व जगांत भारतीय संस्कृतीच नांदत होती असें म्हटलें असतां चालेल. आज हिंदुस्थानांतील सर्व शिक्षित वर्ग अेकप्रकारें परकीयदत्त कल्पना अुराशीं गृहीत धरून बसलेला आहे. आमचे पूर्वींचे वेद, शास्त्र, पुराणें, काव्यें आदिक ग्रंथ आम्हां भारतीयांचे आरंभकाला-विषयीं अनादित्वाच्या कल्पनेवाचून दुसरी कल्पना स्वप्नांतहि येअूं देत नाहींत. आम्ही बाहेरून येथें आलों आहोंत, आमच्या संस्कृतीचा, धर्मा-रंभाचा व जातिनिर्मितीचा अमुक अेक काळ असावा असा किंचिन्मात्रहि अुल्लेख वा अंगुलिनिर्देश करीत नाहींत. केवळ भारतीय ग्रंथावलोकनच केल्यास भारतवर्ष हेंच आमचें आदिस्थान व ज्याचा आदि कळत नाहीं अशा अनादिकालापासूनची आमची संस्कृती, धर्म व जाति हीं अस्तित्वांत आहेत हा संदेश वाचकांस आमचे ग्रंथ देत असतात.

युरोपादि देशांतील खिस्ती राष्ट्रांच्या सांप्रत स्वरूपाचें आयुष्य सुमारें २००० वर्षांचेंच असल्यामुळें हिंदुजातीय संस्कृती आमच्या मागूनची हें म्हणणें अशक्यवत् असलें तरी त्यांच्याशीं तुलना करून सरासरी सम-कालीन अथवा फारच फार तर हजार पांचशें वर्षांचीच जुनीं असली पाहिजे, याहून प्राचीन असणें शक्यच नाहीं; असा सस्पृहतेनें समज करून घेअून युरोपीय लोक युरोपीयेतर जगाला त्याप्रमाणें सांगूं लागले. युरोपची सर्व जगावर सत्ता चालू आहे. असें असतां त्यांचेचपैकीं अेकाचे हाता-खालीं घातला गेलेला व आज पारतंत्र्याचे खाअींत भाजला जात अस-लेला हिंदुस्थान अत्यंत प्राचीनतमकाळीं अुच्चतम संस्कृतीनें युक्त कसा असूं शकणार! व कदाचित् तसा असला तरी ती गोष्ट हिंदुस्थानच्या लोकांना ते कशी समजूं वा पटूं देणार! आम्ही आमच्या राज्यकर्त्यांपेक्षां अुच्चतम संस्कृतीचे अुत्तराधिकारी असून आमचे संस्कृतीचा आरंभकाल हा कळत नाहीं अितका प्राचीनतम आहे या भावनाबलामुळें आत्मविश्वास, स्वाभि-मान, दिव्य भूतकालची स्मृति व भावी भविष्यकाळासंबंधीं प्रचंड महत्त्वा-कांक्षा अुत्पन्न होअूं देणें व त्या वृत्तिसमुच्चयानें आमच्या अंगांत नवचैतन्य स्फुरूं देणें हें परकीय राज्यकर्त्यांना कधींहि पथ्यकर वाटणें शक्य नाहीं. मनुष्यांचे मनांत कधीं कधीं मनुष्यसुलभ इच्छेच्या प्रेरणेनें न कळतच

परंतु निश्चितपणें स्वार्थी तर्कपरंपरा अपरिहार्यतेनें अुत्पन्न होतात त्याचप्रमाणें युरोपीय लोकांचें व त्याबरोबरच अिंग्लिश लोकांचें झालें असावें हें अगदीं अुघड आहे.

या युरोपीय व विशेषतः अिंग्लिश लेखकांनीं शोधक या नात्यानें जीं पुस्तकें व लिखाणें आरंभीं आरंभीं लिहिलीं त्यांत हिंदुस्थानांतील दिव्य संस्कृती, धर्म व जाती हीं शक्य तितकीं या वा त्या स्थलींच्या युरोपीय संस्कृतींचीं प्रतिबिंबें आहेत असें त्यांनीं म्हटलें. परंतु तें पचेना तेव्हां फार तर ही संस्कृती अडीच तीन हजार वर्षांचीं आहे असें कल्पिलें. हिंदुस्थानांतील आज दिसणारी आर्य संस्कृती आणि त्या संस्कृतीची अुत्तराधिकारी जाती ही हिंदुस्थानांतील नसून ती बाहेरून आली असलीच पाहिजेत ही गोष्ट वारंवार व स्थळोस्थळीं प्रतिपादून गृहीतकृत्यवत् प्रत्येक स्थळीं त्या समजाचाच प्रतिध्वनि काढण्याचा त्यांनीं प्रघात पाडला. हिंदुस्थानांत पारतंत्र्याचा पांढरा पाय शिरल्यापासून हिंदूंच्या मनांतील स्वाभिमानाची व आर्यसंस्कृतीच्या महत्तेची जाणीव ढिली पडूं लागली. युरोपीय सत्तेचा पगडा भारतावर पडल्यापासून त्यांच्या सांप्रतकालीन शस्त्रास्त्रांच्या प्रभावानें, शिस्तीनें व बाह्य डामडौलानें भारतावर त्यांची छाप पडली व त्यांच्या अकल्पित युद्धविद्याप्राविण्यानें, कारस्थानपटुत्वानें व शस्त्रास्त्रविद्येच्या संहारकशक्तीनें सर्व हिंदुस्थान अिंग्लिशांच्या हातीं येण्याला पुष्कळ साह्य झाले. या अननुभूत स्वरूपाच्या नव्या प्रकारानें भारतीय मनावर अेकप्रकारें भूल पाडली. भ्रमशीलतेनें आत्मगौरवाला हिंदू जाती पारखी झाली. अशा भ्रमग्रस्ततेंत अिंग्लिश शिक्षणाचा अुपक्रम होअून आंग्ल शिक्षितांचा अेक वर्ग निर्माण झाला. अिंग्लिश लोकांना येथें राज्य करणें याच शिक्षित वर्गाचें साह्यानें शक्य होतें. अर्थांत राजकारभारांत हा शिक्षित वर्ग पुढें होअून हातीं थोडी बहुत सत्ता व त्यामुळें व्यवहारांत महत्त्व त्यांना मिळतांच तदनुषंगानें ते अिंग्रजी शिक्षण म्हणजेच ज्ञान अशी भाबड्या समाजाची समजून होअून पूर्वसंस्कृतीची व तदनुषंगिक ज्ञानमयतेची महत्ता जनमनांतून अुडून जाअूं लागली. जेथें सत्ता वा वित्त असतें तेथेंच बुद्धिमत्ता—विद्या—ज्ञान आदिकांचा आरोप सामान्यतः केला जातो हें सर्व विश्रुतच आहे. त्याचप्रमाणें येथेंहि घडलें. अिंग्लिश शिक्षित लोकांचे मनाला अिंग्लिश व युरोपीय

शिक्षण म्हणजे ज्ञानद्वारच वाटलें. व त्या शिक्षणाचें द्वारा जें पढविलें जाऊं लागलें तेंच सत्यज्ञान वाटून मोठ्या अभिमानानें ते 'ज्ञानाचे' घुटके जनसमाजाकडून गिळले जाऊं लागले. अशी हिंदू शिक्षितांची स्थिती झाल्यामुळें युरोपीय व अिंग्लिश लेखकांनीं जीं जीं विधानें केलीं तीं जणूं अबाधित सत्यें जाणून त्यांचा निःशंकमनें त्यांचेकरवीं स्वीकार केला गेला; व तीं मतें हिंदु शिक्षितांकडूनहि प्रतिपादिलीं गेलीं. हिंदू वा आर्य बाहेरून आले हें विधानहि त्याचपैकीं आहे. पुढें पुढें ही स्थिति पालटली. लो. टिळकांदिकांसारखें मौलिक व स्वाभिमानी विवेचक व परिशोधक निर्माण झाले. आणि तरीहि केलेल्या कांहीं विधानांचा पगडा सर्वस्वी नाहींसा होणें अशक्यप्राय झालें होतें. हिंदूसमाजांतील परिशोधकांत अद्याप दुमत आहे. अेकपक्ष हिंदु वा आर्य हे हिंदुस्थानांत बाहेरून आले असें म्हणणारा आहे व दुसरा पक्ष हिंदू हे बाहेरून आलेले नसून ते मूळापासूनच भारतांतील आहेत असें प्रतिपादणारा आहे. पहिल्या वर्गांतील बहुतेक परिशोधक युरोपीय शोधकांवर अवलंबून आहेत व दुसरा पक्ष युरोपीय परिशोधकांच्या भाषाशास्त्र, वंशशास्त्र, अुत्खननशास्त्र, भौगोलिक स्थल नामकरणादि शास्त्रादि विविध ज्ञानसंग्रहांतील निरनिराळे पुरावे मिळवून व आपल्या ग्रंथकारांच्या ग्रंथांतील प्रमाणें दाखवून हिंदू हा मूळचाच भारताचा निवासी आहे हें सिद्ध करून दाखवण्याचें कार्य करणारा आहे.

आम्हांस हा दुसरा पक्ष ग्राह्य वाटतो. तें सोडून दिलें तरी निरनिराळ्या खंडांतील नद्यापर्वतांची नांवें, गांवानगरांचीं नांवें, निरनिराळ्या भाषांच्या शब्दसाम्यावरून बनलेल्या भाषाशास्त्रांतील प्रमेयें जवळजवळ सिद्ध करतात कीं पूर्वीं अेका काळीं संस्कृत वा तिच्याशींच थोड्याबहुत प्रमाणांत साम्य असलेल्या भाषा सर्वत्र प्रचलित होत्या. त्याप्रमाणेंच अुत्खननशास्त्राचें योगें व पूर्व ग्रंथसंपत्तीचें आलोडन करतां सर्व पृथ्वीवर आर्यसंस्कृती वा तदुत्पन्न स्वरूपाच्या संस्कृती अस्तित्वांत होत्या असें म्हणणें भाग पडतें. धर्माचें अैक्य वा साम्य हें संस्कृतींचे अैक्य व साम्य दाखवूं शकतें. नाहींतर तसें संस्कृती साम्य असणें शक्य नसतें. भाषा, संस्कृती व धर्मसाम्य हीं अेके काळी सर्व पृथ्वीवर भारतीयांशीं अेकरूप वा तत्समरूपांचीं होतीं; असें वेळोवेळ अुत्खननादिकांच्यावरून मिळालेल्या व मिळणाऱ्या पुराव्यानें

निश्चितार्थानें म्हणतां येअील. ते सर्व पुरावें देअून ती गोष्ट सिद्ध करणें हा या पुस्तकाचा अुद्देश नसल्यामुळें त्या सिद्धवत् स्थितीचा सामान्यतः अुल्लेख करणेंच पुरें आहे.

जवळजवळ सर्व जगभर अेकच धर्म, संस्कृती व भाषा असल्यानें त्या वेळच्या जगांतील राष्ट्रभिन्नतेच्या घटकांत या त्रयीचा समावेश होणें वा करणें अस्वाभाविक होतें. कारण धर्म–संस्कृति–भाषात्रयीच्या भिन्नतेमुळें बनणारें द्वैत अुत्पन्न झालें नव्हतें. जातां जातां या विधानाच्या परिपुष्टयर्थ मनुस्मृतींतील श्लोक देणें आवश्यक वाटतें. त्या ग्रंथाच्या दुसऱ्या अध्यायांतील २० व्या श्लोकांत मनू म्हणतात :—

अेतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः ॥
स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन्पृथिव्यां सर्वमानवाः ॥ २० ॥

"या देशांतील अग्रजन्मीं ब्राह्मणांजवळ पृथ्वीच्या सर्व मानवांनीं आपापलीं कर्तव्यें शिकावींत" अशा अर्थाचा हा श्लोक आहे. सांप्रत सुद्धां हिंदुस्थानांत कोठेंहि धर्मशंका अुपस्थित झाल्यास श्रीकाशी या हिंदु-विद्या व शास्त्राच्या केन्द्रस्थानीं जाअून निर्णय घेण्याचा वा कर्तव्यपाठ घेण्याचा सांप्रदाय आहे. त्याचप्रमाणें पृथ्वीवरील अितर देशाच्या लोकांनाहि सर्वत्र याच धर्म–संस्कृती–भाषा त्रयीच्या कमी अधिक मानाच्या साम्यामुळें वरील दंडक सांगितला आहे, असें म्हणावें लागेल. जावा सुमात्रा जवळील द्वीपपुंजांत वाली नांवाचें बेंट आहे. तेथें हिंदुराज्य आहे. हें हिंदुस्थानच्या बऱ्याच जणांना माहित आहे. सयाममध्येंहि राजा क्षत्रिय असून त्याचा राज्यारोहणविधि तेथील ब्राह्मणांकडून हिंदुधर्म शास्त्रपद्धतीनें होत असतो हेंही पुष्कळांना ठाअूक आहे. परंतु अरबस्थानांत पूर्वीं सर्व हिंदूच होते. हे तर काय पण सांप्रत अद्यापपर्यंत हिंदुराज्य आहे हेंहि हिंदु लोकांच्या स्वप्नींहि नाहीं. परंतु थोड्यादिवसांपूर्वीं अुत्तर हिंदुस्थानांतील अेक हिंदु प्रवासी विविध देशांतील प्रवास करून आल्यावर त्यांनीं ही गोष्ट अुजेडांत आणली आहे; ते प्रवासी म्हणतात, "अरबस्थानांत अद्याप अेक लहानसें हिंदुराज्य आहे. ते लोक फार शूर आहेत. त्यांच्या चालीरीति व धर्मविधि सर्व हिंदूंचे आहेत, हिंदुस्थानांतील कोणी हिंदु भेटल्यास त्याला ते देवाप्रमाणें पूज्य मानतात. भारतांतील अेका प्रचंड महायुद्धानंतर आमचे

पूर्वज येथें आले व अरबस्थानांत वसाहत केली असें ते सांगतात. व तो अरबस्थान प्रवेशाचा दिवस अद्याप ते प्रतिवर्षी 'प्रवेश दिन' म्हणून पाळतात." हे सांगण्याचा मुख्य हेतू म्हणजे प्राचीन काळच्या राष्ट्र शब्दाच्या व्याख्येंत जे घटक सांगितलेले आढळतील त्या घटकांत वरील त्रयीच्या अनुल्लेखाचें कारण लक्षांत यावें, हा आहे. राष्ट्राराष्ट्राच्या कलहांत धर्म-संस्कृती-भाषा यांच्या समानत्वामुळें त्यांच्या नाशाचा प्रश्न युद्धमान वा कलहकारी राष्ट्रांत उद्भवणें शक्य नव्हतें. या त्रयीच्या भिन्नीकरणानंतर राष्ट्रनाशाच्या कारणांत यांच्याहि नाशाचा समावेश होऊं लागणें अवश्य ठरतें, तत्पूर्वी नाहीं. कारण त्या त्या कलहकारी राष्ट्रांच्या धर्मसंस्कृति आदिक अकरूपच असल्यामुळें त्यांचे विरोधाच्या त्या गोष्टी विषयच होऊं शकत नाहींत. धर्मराहित्य वा धर्मसाहित्य ही सर्वत्रच जर फैलावलेली असलीं तर हा प्रश्नच उरत नाहीं. पण जगाच्या निरनिराळ्या भागांत धर्मसंस्कृती आदिकांचें कोणत्याहि कारणानें भिन्नत्व उत्पन्न झालें कीं लागलींच त्या गोष्टींचा निरनिराळ्या राष्ट्रांच्या घटकांत स्पष्टपणें समावेश करणें भाग पडतें.

आपल्या प्राचीन संस्कृत ग्रंथांत राष्ट्र शब्दाची व्याख्या दिली आहे. त्या व्याख्येंत व मागें राष्ट्र शब्दाचें घटक सांगून केलेल्या व्याख्येंत दर्शनीं दिसणारें भिन्नत्व पुढें येणाऱ्या विवरणांत कां दिसावें आणि तसें भिन्नत्व दिसलें तरी तत्त्वतः त्या व्याख्या अकरूपच कशा आहेत हें येथपर्यंत मागील छेदकांत केलेलें विवरण लक्षांत ठेवलें असतां कळून येईल.

## राष्ट्र शब्दाची भारतीय व्याख्या

धर्म, संस्कृती व भाषा भिन्नत्वाच्या प्रामुख्यामुळें राष्ट्र शब्दाचे व्याख्या-करणाच्या वेळीं त्या त्रयीचा समावेश करण्याची आवश्यकता नसत्या काळीं म्हणजे निराळ्या शब्दांत म्हणावयाचें तर सर्वत्र धर्म-संस्कृती-भाषा यांचे बव्हंशांनीं अकत्व असतेवेळीं देश व जाती याच दोन भिन्नतानिर्माण-कर्त्या घटकांवरच भर देत राष्ट्र शब्दाची व्याख्या पूर्वीच्या हिंदू विचार-कांनीं केलेली आहे. जातीची व्याख्या श्रीगौतमन्यायसूत्रांत

"समान प्रसवात्मिका जाति ॥"

अशी दिलेली आहे. अितक्या थोड्या शब्दांत संपूर्णार्थ दाखविणारी यथार्थ व्याख्या दुसऱ्या स्थळीं क्वचितच दिलेली आढळून येअील. सर्वांत समान विशिष्टत्वाचा प्रसव होत राहणाऱ्या समूहाला 'जाति' म्हणावें असा या सूत्राचा अर्थ आहे. अेकाच धर्मसंस्कृतीच्या छत्राखालीं नांदणाऱ्या परंतु निरनिराळ्या भौगोलिक परिस्थितीनें युक्त असलेल्या देशांत त्या त्या देशांतील विशेष परिस्थितीच्या संयुक्त परिणामानेंही त्या त्या देशांतल्या मनुष्यसमूहांत विशेष प्रकारचे गुण प्रकट होतात. व ते ते गुण विशेषसमानत्वानें ज्या मनुष्यसमूहांत प्रकट होतात त्या समूहास जाती म्हणणें ओघानेंच प्राप्त होतें. अशी जाती ज्या देशांत असते तो देश व त्या देशांत असलेली तद्देशीय गुणविशिष्टत्वानें युक्त असलेली जाती हे राष्ट्र शब्दाचे दोनच घटक खालीं अुरतात. राष्ट्र शब्दांमध्यें राजत्वाचाहि समावेश होतो. या प्रबल, समर्थ व अैश्वर्यसंपन्न राजत्वानें शोभिवंत झालेलें राष्ट्र राष्ट्र शब्दाची अन्वर्थकता यथार्थपणें दाखवूं शकतें. पुरुष शब्दाची सामान्य व्याख्या सामान्य पुरुषशरीराच्या लक्षणावरून करीत असतात तरी पण यथार्थ पुरुष म्हणावयाचा तर ज्याप्रमाणें 'पुरुषार्थी असेल तोच पुरुष' अशी विशेष व्याख्या करावी लागते वा करतात त्याचप्रमाणें राष्ट्र शब्दाच्या व्याख्याघटकांत देश व जाति या दोन घटकांचा सामान्य लक्षणार्थी अुल्लेख होतो; तरीही राष्ट्र शब्दाचे यथार्थ राष्ट्रत्व काय या अर्थी सांगावयाचें म्हणजे देश व जाती या दोन घटकांवरच समाधान न मानतां जें राष्ट्र प्रबल, समर्थ व अैश्वर्यसंपन्न राजत्वानें युक्त असतें तेंच खरें राष्ट्र असें म्हणणें भाग पडतें. आणि त्याच दृष्टीनें राष्ट्र शब्दाची यथार्थ विशेषत्वदृष्टीनें पूर्वाचार्य व्याख्या करीत असतात. त्या व्याख्येनें ते सांगतात

"पशुधान्यहिरण्यसंपदा राजते शोभते अिति राष्ट्रं ॥"

मागील लिखाणांत अुल्लेखलेला राष्ट्र शब्दाचा जो व्यापक अर्थ सांगितला आहे तो अर्थ अगदीं स्पष्टतया वरील व्याख्येंत अुद्दामरीतीनें स्पष्ट होत नाहीं. अेतदर्थ ज्याप्रमाणें ही व्याख्या दिली आहे त्याचप्रमाणें राष्ट्रा-

-च्या दुसऱ्या घटकाची जी कल्पना ग्रथित केली आहे तिचा प्रपंच केल्या-वांचून राष्ट्र शब्दाच्या वर दिलेल्या व्याख्येंतील गर्भित अर्थ ध्यानांत येणार नाहीं. राष्ट्राच्या घटकांत देश हा घटक प्रमुखांपैकीं अेक आहे. त्या देशाच्या गुणदोषांचें स्पष्टीकरण सांगतेवेळीं जे **देशदोष** म्हणून सांगितले आहेत ते असे:—

"विषयुक्त प्राणी व वनस्पती, बव्हंशानें गवतांचीच अुत्पत्ति, माळरानें, खडकाळपणा, डोंगराळस्थिति, अुंचसखलतेचें प्राचुर्य आणि विवरें यांनींच व्यापलेली भूमी असणें; अतिवृष्टियुक्तता, विविध विषारी सर्प, पारधी व **म्लेंच्छ* यांची बहुलता**; अल्प धान्योत्पत्ति; फळांचा व धान्यांचा अभाव हे देशाचे मुख्य दोष"

व नंतर **देशगुण** जे सांगितले ते येणेंप्रमाणें:—

"विविध धातूंनीं युक्त खाणींची संपन्नता; फलदायी वृक्षांचें विपुल अस्तित्व; धनवत्तेचें वैपुल्य, प्रवर्धित नगरें व लहान लहान गांवें ( ग्राम ) यांची बहुलता; निरनिराळ्या प्रकारच्या अुत्कृष्ट धान्योत्पत्ति; पर्जन्याच्या अभावीसुद्धां धान्यादि अुत्पत्तिदानसमर्थता, पशु व मनुष्य यांना हितकर; **वैश्य व शूद्र या अुत्पादक व व्यवसायी वर्गांची अधिकता; आणि अन्योन्यरक्षकभावानें युक्त समाज** हे देशाचे मुख्य गुण सांगितले.

---

***टीप:**—म्लेंच्छ हा शब्द सांप्रत ज्याप्रमाणें "ख्रिस्ती धर्मी" "मुसलमान धर्मी" अित्यादि अर्थीं समजतात त्या अर्थीं शब्दाची अुत्पत्ती वा प्रयोग पूर्वी नव्हता. धर्मांची अनेकता पूर्वाचार्यांना केव्हांहि मान्य नाहीं. धर्मदृष्टीनें जगांत दोनच भेद. अेक धर्म वा धर्मी व दुसरा अधर्म वा अधर्मी. आणि म्लेंच्छ हा शब्द या दुसऱ्या अर्थीं अुत्पादिला गेला व अुपयोजिला जात असे. बोधायन म्हणून अेक प्रख्यात शास्त्रकार होअून गेले त्यांनीं म्लेंच्छ शब्दाची व्याख्या दिली आहे, ती अशी:—**गोमांसखादको यस्तु विरुद्धं बहु भाषते। सर्वाचार विहीनश्च म्लेंच्छ अित्यभिधीयते॥** गोमांस खाणारा, पुष्कळ विरुद्ध भाषण करणारा, आचारविहीन असा जो त्याला म्लेंच्छ म्हणतात. याची थोडक्यांत कल्पना यावयाला 'अधर्मी' हा प्रतिशब्द योजणें युक्त होअील.

आणि हे गुण सांगितल्यानंतर अेका विशिष्ट अर्थाचें दिग्दर्शन करणारी देश शब्दाची व्याख्या केली आहे. ते म्हणतात

"भर्तुर्दंडकोश वृद्धि दिशाति ददातीति देशः"

राज्याच्या दंडशक्ति व कोशशक्ति या दोन शक्तींची वृद्धि दाखवतो अर्थात् वृद्धि करतो तो देश. अशी देश शब्दाची व्याख्या देत. मग असा देश ज्या राष्ट्राचा घटक होअूं शकतो तें राष्ट्र "प्रबल, समर्थ व अैश्वर्यसंपन्न राजत्वानें युक्त असतें तेंच" असें सांगणें ओघानेंच प्राप्त होतें. याप्रमाणें मागें वर्णन केलेल्या दोषांनीं रहित व सांगितलेल्या देशगुणांनीं युक्त असा व गुणसमुच्चयांत अुल्लेखलेल्या शूद्रवैश्यादिकांनीं युक्त व म्लेंच्छ-राहित्यानें निर्दोष असणारी हिंदुजाती असलेला, देश. पशुधान्य हिरण्य-संपदादिकांनीं संपन्नता राखीत ज्यांत प्रबलतेनें चमकणारें ( राजते ) व सर्व गुणसमूहानें शोभणारे ( शोभते ) असें राजत्व असतें अशा राजत्वयुक्त जातिदेशसमुच्चयाला राष्ट्र म्हणतात अशी पूर्वाचार्यांची राष्ट्र शब्दाची व्यापक व्याख्या आहे.

जगांमध्यें निरनिराळ्या देशांतील निरनिराळ्या जातींची भिन्नता डोळ्याआड करून सर्वसामान्यतः प्रत्येक देशांत असलेल्या अेकंदर संघटित, परस्परानुरागी आणि परस्परसहाय्यक समाजाला जें संयुक्ततेचें स्वरूप येतें त्याला पूर्वाचार्यांनीं 'जनपद' हा परिभाषिक शब्द अुपयोजला आहे. अिंग्लिशमध्यें 'पीपल' शब्द हा जनपदाचें कांहींसें अर्थ साम्य दाखवूं शकतो. भारतीय नीतिशास्त्रांत ( नीति म्हणजे पॉलिटिक्स ) **जनस्यवर्णाश्रमलक्षणस्य द्रव्योत्पत्तेर्वा पदं स्थानमिति जनपदः ॥**— वर्णाश्रमलक्षणांनीं युक्त असलेल्या व द्रव्योत्पत्ति–साधनांनीं संपन्न अशा समाजाचें संयुक्ततेनें प्रवाहरूपी असणारें जें स्वरूप तें जनपद अशी व्याख्या करतात. अशा जनपदांनीं व देश शब्दांत सांगितलेल्या सामर्थ्यांनीं युक्त असा देश आणि त्या देशांतील विशिष्ट गुण सामान्यत्वांनीं अितरांहून भिन्न असलेली जाती या दोन घटकांनीं राष्ट्र बनणें असा भारतीय व्याख्याकारांच्या व्याख्या समवायानें घेतल्या असतां निर्णय देतात.

येथपर्यंत पाश्चात्य राजनीतिशास्त्रवेत्ते व भारतीय राजनीतिशास्त्रकार

राष्ट्र शब्दाची व्याख्या काय देतात हें पाहिलें असतां जेव्हां धर्म-संस्कृति आदिकांची भिन्नता नाहीं तेव्हां देश व जाती हेंच राष्ट्राचे प्रमुख घटक असतात व जेव्हां धर्म-संस्कृति व भाषा भिन्नत्व असेल तेथें त्या भिन्नत्व असलेल्या घटकांचा समावेश राष्ट्र शब्दांत करणें भाग पडतें असें दिसून आलेलें आहे. पाश्चात्य व भारतीय राजनीतिशास्त्रकारांच्या व्याख्येंत तात्विक व मौलिक अेकता स्पष्ट आहे. तेव्हां जर या सर्व राजनीति शास्त्रकारांना अेकमतानें मान्य होण्यासारखी राष्ट्र शब्दाची व्याख्या करावयाची असेल व जी कोणालाहि अमान्य करतां येणार नाहीं अशी राष्ट्र शब्दाची व्याख्या पुढील प्रमाणें होअील.

## धर्म-संस्कृति-भाषा.

यांची विभिन्नता असल्यास त्या विभिन्न घटकांचा समावेश करून

## देश व जाति.

**यांसह जें बनतें तें राष्ट्र** अशी व्याख्या ठरेल. धर्म-संस्कृति यांचें अेकत्व असूनहि भाषा भिन्नत्त्वाच्या वेळीं देश-जाती-भाषा हे घटक ठरतील. जेथें धर्माचें अभिन्नत्त्व असून संस्कृति व भाषा भिन्नत्त्व असेल तेथें देश-जाती-भाषा व संस्कृति हे चार घटक ठरतील व जेथें कांहींहि गोष्टींत अेकत्त्व नसेल तेथें धर्म-संस्कृति-भाषा याचे समेत देश व जाती मिळून पांच घटकांचें राष्ट्र झालेलें आहे असें म्हणावें लागेल. धर्म-संस्कृति-भाषा या त्रयीच्या अभिन्नतेच्या वेळीं या घटकांचें अस्तित्व लुप्त वा अंतर्हित असतें आणि जेव्हां या तिन्ही वा यांतील कांहीं घटकांचें अभिन्नत्त्व विघडून भिन्नत्त्व अुत्पन्न होअील त्यावेळीं तें अंतर्हित घटक प्रकट व व्यक्त झालेलें असतील, अितकेंच. तेव्हां समान्यत्त्वें आरंभीं

## देश-जाति-धर्म-संस्कृति व भाषा हे
## राष्ट्राचें मुख्य घटक.

म्हणून जें विधान केलें तें कसें अन्वर्थक, निरपवाद, व पाश्चात्य आणि भारतीय राजनीतिशास्त्रकारांना पूर्णतया संमत आहे व तें किती आणि कसें सत्य आहे हें येथवर पाहिलें.

## जगाला ही व्याख्या आज संमत आहे काय ?

अनेकवार तात्त्विक दृष्टीला व शास्त्र–विवेकाला अेखादी गोष्ट पटत असली व स्वीकार्य वाटली असली तरी तिच्या व्यवहार्यतेशीं तिच्या स्वीकृतीच्या शक्याशक्यतेसंबंधाचा प्रश्न निगडित झालेला असतो. राष्ट्र शब्दाच्या व्याख्येसंबंधीं सर्व विचारकांमध्यें व राजनीतिशास्त्रज्ञांत अैकमत्य असलें तरीहि ती कल्पना शक्याशक्यतेच्या लाटांनीं कोनेकोपरे झिजून नंतर व्यवहार्यतेच्या ठेवणांत चपखल बसूं शकते, त्यापूर्वी नाहीं. त्याच-प्रमाणें राष्ट्र शब्दाची व्याख्याहि अशाप्रकारें कोनेकोपरे झिजून जाअून मूल-स्वरूपाहून व्यवहार्यतेकडे पहातां निराळ्या स्वरूपाची झाली आहे किंवा तिचें स्वरूप अभंग व अतूट राहिलें आहे, हें आपणांला पाहिलें पाहिजे. जर्मन महा–युद्धापूर्वी जगांतील सर्व राजकारणी पुरुष अेकत्र येअून राष्ट्राची व्यवहार्य व शक्य तितकी सार्वभौम–सर्व जगाला लागू पडण्या-सारखी–अशी व्याख्या करण्याकरितां अेकत्र बसून त्यांनीं सर्वसंमतीनें केलेली व्याख्या मिळणें शक्य नाहीं. कारण अशी सर्वांनीं मिळून बसून राष्ट्र शब्दाची जागतिक दृष्टीनें सर्वसंमत व्याख्या करण्यासारखा प्रसंगच पडला नाहीं. म्हणून जर्मन युद्धापर्यंत सर्वांमिळून संमत केली नसली तरी सर्वांच्या समजुतींत ती व्याख्या काय होती हें पहाणें आधिक अुपयुक्त होअील.

देश, जाति, राष्ट्रें वा राज्यें यांचे लिहिलेलें अितिहास सर्व जगभर पसरलेले आहेत. राष्ट्र शब्दाची कल्पना सामान्यरीत्या कशा स्वरूपाची मानली जात होती हें बघावयाचें झालें तर अितिहास ग्रंथ वा तत्सम देश व जाती संबंधींच्या गोष्टी लिहिलेलीं पुस्तकें यांत ती यथावत् प्रतिबिंबित झालेली दिसेल. कोणत्याहि देशाचा अितिहास बघितला तर प्रत्येक लेखक तद्देशीय जातीला त्या देशाचे धनी समजूनच आक्रमकांना परके लेखीत असतो. पुढें त्या परक्या जातीच्या सत्तेला, मत्तेला, व स्वामित्वाला जोंपर्यंत त्या देशांत तेथील मूळच्या जातीचें प्रामुख्यानें अस्तित्व असतें तोंपर्यंत परकेपणानेंच मानलें व अुल्लेखलें जातें. कोणत्याहि अितिहासांत या गोष्टीचें प्रत्यंतर दिसून येअील. या विधानाची निर्विवाद सत्यता पटण्या-

साठीं ग्रेटबिटनचें अुदाहरण दिलें म्हणजे पुरें आहे. त्या बेटांत तीन अगदीं परस्पर भिन्न जाति आहेत. अिंग्लिश, स्काच व वेल्श या तीनही जाती सामान्यतः अेकच देशाच्या निवासी, अेकाच राजसत्तेखालीं नांदणाऱ्या, अेकाच साम्राज्याचा धनीपणा अुपभोगणाऱ्या व जवळजवळ सर्व प्रकारचे हितसंबंध अेक असलेल्या अशा दिसत असल्या तरीहि त्यांची जातीय, सांस्कृतीक व भाषाविषयक दृष्टीनें भिन्नता पूर्णपणें नाहींशी झालेली नाहीं. त्यांतील स्कॉटिश व वेल्श जातीला अिंग्लंडचें विजयी वैभव स्वतःच्या पराजित भूतकालाचा विसर पाडूं शकलें नाहीं. आणि आज असलेली भिन्नता ही केवल मानसिक भावनामय असतांहि ती स्वराज्याचे हक्क घेअून, पूर्ण नसलें तरी पुष्कळ अंगानें 'डोमिनियन स्टेटस'मुळें मिळणारें स्वातंत्र्य मिळवूं अिच्छीत आहे. आज त्या तीनही जातींना अेका मोठ्या अफाट सत्तेच्या स्वामित्वाचा, वैभवाचा, संपत्तीचा व मानाचा अुपभोग मिळत असल्यामुळें पारस्परिक भिन्नता तीव्रस्वरूप धारण करीत नाहीं. तरी पण स्वतंत्र राष्ट्रीय अस्तित्व त्यापैकीं अेकहि जाती विसरली नाहीं. विधि-घटनेनें जेव्हां ब्रिटिश साम्राज्याला भूतकालाच्या पोटांत नाहींसें व्हावें लागेल व अितिहासांत ब्रिटिश साम्राज्य म्हणजे अेका भूतकालीन व आज ज्याचा मागमूसहि नाहीं असें अेक नाम—शेष झालेलें साम्राज्य म्हणून अुल्लेखलें जाण्याची वेळ येअील तेव्हां वर निर्दिष्ट केलेल्या तीनही जातीं-तील भिन्नता व पूर्वीचे जितजेतृत्व संबंध तीव्रतेनें प्रकट होअून त्या जाती अेकमेकांपासून बहुधा भांडूनच बिलग व भिन्नभिन्न होतील; असाच मानवी स्वभावानुरूप निश्चित संभव अुत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं. आज बहुतेक अंशीं अेकमेकींत मिसळल्या गेल्यासारख्या दिसत असलेल्या अिंग्लंड, स्काटलंड, व वेल्स या तीन देशाच्या तीन जाती आपापली राष्ट्रीयता निश्चितपणें पृथक् पृथक् मानीत आहेत. हीच स्थिती सर्वत्र दिसून येअील. जी गोष्ट सहजरीत्या समजण्यासारखी आहे ती सिद्ध करीत बसणें कालापव्यय आहे. व तरीहि अेक अुदाहरण सर्व जगांत राष्ट्रदृष्टीनें काय कल्पना असतात हें स्पष्ट कळण्या करतां दिलें, तेवढें पुरेसें आहे. जर्मन युद्धानंतर ('लीग ऑफ नेशन') राष्ट्रसंघ निर्माण होअून जित देशांचे लचके तोडीत जीं जीं नवीन राज्यें झालीं वा जर्मनादींच्या पारतंत्र्यांत

असलेले देश स्वतंत्र केलें गेलें त्यावेळीं राष्ट्रीयतेचें स्वरूप ठरविणें, राष्ट्रीयेतरांची म्हणजे परकीय अल्पसंख्याकांची त्यांत सोय लावणें,जगांत आतापर्यंत मानीत आलेल्या जागतिक कल्पनांचे आधारावर राष्ट्र, राष्ट्रीय व परकीय अल्पसंख्याक यांचें स्वरूप व परस्परसंबंध अित्यादि प्रश्न शक्य तितक्या सर्वमान्य रीतीनें सोडविणें या गोष्टी कराव्या लागल्या. त्यांत राष्ट्र शब्दाच्या तात्त्विक व्याख्येला व्यवहार्यतेंत आणते वेळीं काय स्वरूप दिलें गेलें आहे, त्या जागतिक व्यवहार्यतेच्या जगमान्य व्याख्येनुसार राष्ट्र शब्दाचे स्वरूप काय ठरलें आणि तें स्वरूप व आपली तात्त्विक व्याख्या यांत कांहीं फरक आहे कीं काय हें पहाणें आहे.

## राष्ट्रसंघ ( लीग ऑफ नेशन ) मान्य राष्ट्रस्वरूप

राष्ट्रसंघांत जगांतील ४४ देश समाविष्ट झाले आहेत. त्यांचीं सर्व नांवें दिलीं असतां बहुतेक सर्व जगाचा समावेश त्यांत कसा झाला आहे हें लक्षांत येअील म्हणून पुढें नांवें दिलीं आहेत. त्या संघांत १ बेलज्यम, २ बोलिविया, ३ ब्याझिल, ४ ब्रिटिश अेंपायर ( अिंग्लंड-आयर्लंड-द. आफ्रिका-कानडा-आस्ट्रेलिया ) ९ न्यूझीलंड, १० हिंदुस्थान, ११ चीन, १२ क्यूबा, १३ अिक्वेडार, १४ फ्रान्स, १५ ग्रीस, १६ ग्वाटेमाला, १७ हैटी, १८ हंडूरास, १८ अिटली, २० जपान, २१ लाबेरिया, २२ निकाराग्वे, २३ पनामा, २४ पेरू, २५ पोलंड, २६ पोर्तुगाल, २७ रुमेनिया, २८ सर्व-क्रोट-स्लोव्हेनिक संस्थान, २९ सयाम, ३० झेचोस्लोव्हिया, ३१ यूराग्वे, ३२ अर्जेटाअिन, ३३ कोलंबिया, ३५डेनमार्क, ३६ नेदर्लंड, ३७ नार्वे, ३८ प्याराग्वे, ३९ पर्शिया, ४० साल्व्हाडोर, ४१ स्पेन, ४२ स्वीडन, ४३ स्विट्झर्लंड, ४४ व्हेनेज्युअेला. १९२९ वर्षापावेतों अितकीं राष्ट्रें या राष्ट्रसंघांत होतीं. व त्यानंतर जर्मनी आदीकांचा समावेश त्यांत आणखी झालेला आहे. जगांतील प्रमुख महाराष्ट्रांपैकीं रशिया व अमेरिका हीं दोन राष्ट्रें कायतीं या संघांत आलीं नाहींत. “ अमेरिकेनें जगाच्या भानगडींत हात अडकवावयाचें नाहींत ” या मनरोनें घालून दिलेल्या दंडकावरून या संघांत तें राष्ट्र आपला समावेश करून घेत नाहीं. आणि रशियानें जगांत अेका

नवीन प्रकारच्या सामाजिक व राजकीय स्वरूपाच्या समाज राज्यघटनेचा अुठाव करून ठेवल्यामुळें त्याचा समावेश आधीं झाला नव्हता तरी पुढें त्याला संघांत अेकप्रकारें प्रवेश द्यावा लागला. या संघांत न्यायप्रिय राष्ट्रा-प्रमाणेंच अन्यायप्रवृत्त राष्ट्रेंहि आहेत. आणि तरीहि सार्वत्रिक लागू करा-वयाच्या तंत्त्वासंबंधीं अुघडपणें न्यायी व समतोलनाच्या धोरणाचाच अवलंब करणें त्यांना भाग पडले. संघाच्या कित्येक गोष्टीसंबंधीं अनेक देशाच्या अनेक राजकारणी पुरुषांनीं आपलीं प्रतिकूल मतें व अभिप्राय दर्शविले आहेत. संघाच्या कित्येक कार्यांवर भोंदूपणाचा आरोप करीत त्याची कुलंगडी चव्हाट्यावर आणून त्याचे वाभाडें पुष्कळांनीं काढले आहेत. परंतु राष्ट्रसंघानें अल्पसंख्याकांचे प्रश्नासंबंधीं दिलेल्या निर्णया-विरुद्ध व त्याप्रमाणें जवळ जवळ २० देशांत घडवून आणलेल्या व्यव-स्थेविरुद्ध संघविरोधक असलेल्या संघाच्या शत्रूंना देखील अेक चकार शब्दसुद्धां काढतां आला नाहीं. ही अेकच गोष्ट त्या राष्ट्रसंघानें ‘ अल्प-संख्याक समस्येचा ’ व तद्द्वारा राष्ट्रस्वरूपाचा ज्या पद्धतीनें अुलगडा केला तो अुलगडा, तो निर्णय, व ती दिलेली व्यवस्था जगमान्य—सर्वमान्य आहे हें सिद्ध करावयाला पुरेशी आहे. अिग्लंडमधील चक्री—परिषदेंमध्यें प्रत्येक सुयुक्त मागणीविरुद्ध चर्पटपंजरी करणाऱ्या ब्रिटिश राजकारणी लोकांनासुद्धां दे. भ. डॉ. मुंजे प्रमुख हिंदूराष्ट्रीय नेत्यांनीं ‘ अल्पसंख्यां-कांचा प्रश्न राष्ट्रसंघाकडे देऊन त्या पद्धतीनें सोडवा ’ म्हणून केलेल्या सूचनेविरुद्ध ‘ ब्र ’ हि काढतां आला नाहीं. हिंदुस्थानच्या सर्व राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं विशेषतः गांधीप्रमुख राष्ट्रीयसभेच्या पुढाऱ्यांनीं—दे. भ. डॉ. मुंजे यांची साथ देत जर अेकमुखी मागणीनें राष्ट्रसंघपद्धतीचे अनुसारें अल्पसंख्यांकांचा प्रश्न सोडवला पाहिजे म्हणून आग्रह धरला असता तर अिंग्लिशांना सगळ्या जगाच्या डोळ्यापुढें प्रकाशित रीतीनें ती गोष्ट नाका-रणें शक्य झालें नसतें व त्यायोगें ‘ फोडा व झोडा ’ पद्धतीनें राज्यशकट चालवूं पहाणाऱ्या अिंग्लंड राष्ट्राला मोठा पेच पडला असता. यावरून राष्ट्रसंघाचीं ‘ अल्पसंख्यांक जातीनिर्णय व तदंगभूत राष्ट्र शब्दाची व्याख्या ’ किती अकाट्य व अनुल्लंघनीय अशीं सर्व जगाचें मतें ठरव-लेलीं आहेत हें ध्यानांत येअील. तेव्हां अशा या जगमान्य निर्णयान्वयें

राष्ट्र कोणाचें ठरतें ? राष्ट्र म्हणजे काय ? अल्पसंख्याकांच्या स्वतंत्र हक्कांच्या मर्यादा कोणत्या ? आणि राष्ट्रीय व राजकीय क्षेत्रांत अल्पसंख्याकांनीं कसें वागले पाहिजे ? या गोष्टी पाहणें अत्यंत अवश्यक आहे.

## अल्पसंख्याकांचे हक्क

पहिल्यानें अल्पसंख्याकांचे हक्क हक्क म्हणून जो अेक मोठा बाअू करून ठेवलेला आहे ते हक्क तरी काय आहेत हें पाहिले पाहिजे. ( टेन अियर्स लाअिफ आफ दि लीग आफ नेशन ) 'राष्ट्रसंघाचे १० वर्षांचें जीवनवृत्त' म्हणून अिंग्लिशमध्यें १९२९ या वर्षी जें अेक पुस्तक प्रसिद्ध झालें आहे त्यांत जे हक्क निश्चित म्हणून दिलेले आहेत व जे वर निर्दिष्ठ केलेल्या २० देशांत व अितर कांहीं देशांत ( जेथें अल्पसंख्याक प्रश्न आहे तेथें ) अल्पसंख्यांकांना अुपभोगूं दिले जातात तें येणेंप्रमाणें—

१ स्थायी वस्ती करून र्‍हाणाऱ्या परकीयाला ( स्त्री पुरुष ) नागरिकत्वाचा हक्क मिळाला पाहिजे.

२ अिच्छेप्रमाणें योगक्षेम चालवण्याचा व व्यक्तिस्वातंत्र्याचा हक्क मिळाला पाहिजे.

३ धर्मस्वातंत्र्य असलें पाहिजे.

४ तद्राष्ट्रियांप्रमाणेंच परकीय पण नागरिक झालेल्याला सर्व प्रकारची वैध स्वतंत्रता दिली पाहिजे.

५ आपली मातृभाषा आपसांतील व्यवहारांत अुपयोजण्याचें स्वातंत्र्य असावें.

६ आणि शैक्षणिक, धार्मिक, व दानविषयक राष्ट्रीय निधींतून अल्पसंख्याकांच्या संस्थेच्या मानानें त्यांना त्या त्या कारणासाठीं द्रव्यसाह्य मिळावें. हे ते अल्पसंख्याकांचें मूलभूत, सर्वमान्य व सर्वसंमत हक्क आहेत. या हक्कांत त्यांचें कांहीं कमी पडता कामा यये. या कक्षेबाहेर त्यांनीं पाय पसरतां कामा नये. असा राष्ट्रसंघाचा, सर्व जगाचा, यथार्थ विचारवंतांचा, आणि न्यायाचा दंडक आहे. अमेरिकेचें अध्यक्ष विल्सन

आणि राष्ट्रसंघाचे प्रमुख पुरस्कर्ते म्हणतात कीं "राष्ट्रसंघाच्या चालकांनीं अल्पसंख्यांक लोक सर्वत्र व सर्व देशांत आपापलें धार्मिक व जातीय हक्कांचें मर्यादेंत संरक्षिले जात आहेत व त्या मर्यादा त्यांचेकडून अुल्लंघिल्या जात नाहींत याविषयीं डोळ्यांत तेल घालून जपत राहिले पाहिजे." अितकें म्हणूनच थांबणें शक्य झालें नाहीं. अमेरिकेहून नागरिकांचें वतीनें अेक परिशोधक मंडळ रुमेनियामध्यें जाअून त्यानें अगदीं कडक रीतीनें तेथील परिस्थितीचें निरीक्षण केलें. आणि नंतर तत्रस्थ अल्पसंख्याकांचें योग्य संरक्षण व राष्ट्रसंघानें ठरविलेल्या मर्यादेंतील न्याय्य हक्कांचा अुपभोग हा रुमेनियाचे सरकारनें यथायोग्य रीतीनें अल्पसंख्याकांना देण्यासंबंधीं त्या सरकारला व रुमेनियन राष्ट्राशीं अेकनिष्ठ राहून तत्संबंधींचीं कर्तव्यें पाळण्यासाठीं व आपल्या अधिकार मर्यादांचें अुलंघन न करण्यासाठीं अल्पसंख्याकांना, निक्षून सांगून ते मंडळ परत गेले. जातेवेळीं त्या मंडळानें 'अल्पसंख्याकां'च्या प्रश्नाचे निर्णयाप्रमाणें सर्वत्र व्यवस्था रहातें किंवा नाहीं हें सतत सावधानपणें पहाण्यासाठीं राष्ट्रसंघाला अेक स्थायी मंडळ स्थापण्याची विनंती केली होती.

हा अल्पसंख्याकांचा प्रश्न अमुक प्रकारें सोडवावा असें ठरवल्यावर हा निर्णय जगांतील कांहीं राष्ट्रांना न लावतां सर्व राष्ट्रांना लागू करावा अशी सूचना पुढें आली. त्या वेळीं अमेरिकेच्या प्रतिनिधीनें जें अेक भाषण केलें त्यांत राष्ट्राच्या घटकांचा अुल्लेख अेका विशेष कारणास्तव आलेला आहे. ते म्हणाले:—"त्या खंडांत ( संयुक्त संस्थानें-अमेरिका ) जाति, भाषा, व धर्मदृष्ट्या तद्देशीयांहून निराळेपणानें भिन्न असणारीं अशी जनसंख्या नाहीं. संयुक्तप्रांतांतील प्रत्येक संस्थानांत भाषेची अेकता आहे. धार्मिक परमतसहिष्णुता ( Religious toleration ) तेथें असून नवीन वसाहतवाले पूर्वीच्या वसाहतवाल्यांत पूर्णपणें मिसळून जातात. व म्हणून ज्यांना संरक्षण मिळालें पाहिजे अशा प्रकारें विभिन्न राष्ट्रीय अल्पसंख्यासमस्या आमच्या अमेरिकेंत मुळींच नाहीं." या भाषणांत अमेरिकन प्रतिनिधीनें आमच्या अमेरिकेंत अल्पसंख्याक प्रश्न नाहीं हें सांगतें वेळीं अगदीं सहजपणें सर्वसंमत गोष्ट म्हणून जाति, भाषा, धर्म या राष्ट्रघटकांचा अुल्लेख केला आहे ही गोष्ट राष्ट्राचे कोणते घटक सर्वसामान्यत्वानें अस्तित्वांत

आहेत हें स्पष्ट करीत आहे. अिंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, आदिक मोठ्या राष्ट्रांनीं आपापल्या राष्ट्रांना लागू करण्याच्या या अल्पसंख्याकांच्या प्रश्नामधून स्वतःचें अंग काढून घेतलें. व आपण हा निर्णय आमच्याहि देशांना लागू करावयाचा मान्य केल्यास आमच्या देशांत नसत्या अल्पसंख्यांक प्रश्नाचें भूत अुभें राहून राष्ट्रीय अेकता तुटेल म्हणून त्या निर्णयाचें बंधन आम्हांस लागू नाहीं; असें ठासून सांगितलें.पण ज्या देशावर अल्पसंख्याक संरक्षणाचें दायित्व राष्ट्रसंघानें लादलें त्या देशाचे प्रतिनिधींनीं जोर धरून अेक ठराव संघाकडून मान्य करविलाच. त्या चवथ्या ठरावाचे चवथ्या छेदकांत संघ म्हणतो:—

" राष्ट्रसंघानें ठरविलेल्या वैध निर्णयानें जीं राष्ट्रें आपणांला बांधून घेअूं अिच्छित आहेत तीं राष्ट्रें जातीय, भाषा विषयक व धार्मिक दृष्टीनें त्यांच्या राज्यांत असलेल्या अल्पसंख्याकांना शक्य तोंवर राष्ट्रसंघाचे कार्यसमितीनें कार्यवाहींत आणलेल्या निर्णयानुसार न्यायानें व निपक्ष पातीप्रमाणें वागवितील अशी या समितीला अशा आहे. "

ह्या राष्ट्रसंघाच्या समितीनें अर्थात् अेकापक्षी जागतिक विचारकांनीं केलेला हा ठराव आपल्या विषयाचे दृष्टीनें महत्वाचा आहे. नुकतेंच अमेरिकेच्या प्रतिनिधीचें भाषणांत राष्ट्रांच्या घटकांचा झालेला अुल्लेख महत्वाचा असला तरी अेका राष्ट्राच्या प्रतिनिधीनें केलेला अुल्लेख म्हणून ठरवतां येअील. त्या अुल्लेखानें त्याला जागतिक स्वीकृतीचा छाप मारतां येणार नाहीं. पण या राष्ट्रसंघाच्या प्रातिनिधिक समितीनें केलेल्या ठरवासंबंधीं तसें मुळींच म्हणतां येणार नाहीं. या ठरावांत 'जातीय भाषाविषयक व धार्मिक अल्पसंख्याक' म्हणून केलेल्या अुल्लेखानें जाती, भाषा व धर्म हे राष्ट्राचे अविकल, अखंड व नित्यघटक असल्याचीं जागतिक संमतिच मिळाल्यासारखें होत आहे हे ध्यानांत घेतलें पाहिजे. राष्ट्रसंघाच्या १९३१ च्या झालेल्या बैटकींत ब्रिटिश परराष्ट्रीय कार्यवाह आर्थर हेंडरसन संघाच्या बैठकीच्या अध्यक्षाने नात्यानें असें म्हटल्याचें " राष्ट्रसंघाच्या मासिक बैठकीचा संक्षिप्त वृत्तांत", जानेवारी १९३१ या मासिकांत प्रसिद्ध झालें

आहे कीं "**राष्ट्रसंघानें अल्पसंख्याकांच्या संरक्षणासंबंधीं जो निर्णय करून तदनुसार व्यवस्था कार्यवाहींत आणली आहे, ती व्यवस्था युरोपची व जगताची म्हणून अेक जागतिक–विधि स्थापना** ( Public Law ) **झाली आहे.** " आणि यानंतर लागलीच श्री. आयझ्याक न्यूटन, पार्लमेंटचे अेक सभासद, हिंदुस्थानसाठीं बसविलेल्या वर्तुलपरिषदेंत लिबरलदलाचे, प्रतिनिधि या नात्यानें म्हणाले " राष्ट्रसंघानें ठरविलेल्या पद्धतीनें हिंदुस्थानमधील अल्पसंख्याकांचा प्रश्न सोडवण्याला मला कांहीं अडचण दिसत नाहीं." परंतु वर्तुलपरिषदेमध्यें गेलेल्या हिंदुस्थानच्या भाग्यविधात्यांच्या सुपीक मेंदूत विवेकबुद्धीचे पीक जळून गेलेलें ! मग या राजमार्गाची कल्पना कशी सुचणार ! अेक गोष्ट येथें ध्यानांत ठेवली पाहिजे कीं राष्ट्रसंघाच्या कोणत्याहि घटकानें अल्पसंख्याकांच्या निर्णयांचा ठरविलेल्या विधिप्रमाणें आपआपल्या क्षेत्रांत अल्पसंख्याकांचा निर्णय केला नाहीं आणि तद्विरुद्ध अितर प्रकारें निर्णय दिला तर त्या राष्ट्राचें तें कृत्य जागतिक विधिच्या विरुद्ध व अविधिरूपाचे ठरेल यांत तिलमात्रा संदेह नाहीं. या दृष्टीनें अिंग्लंडच्या प्रधानातें हिंदुस्थानच्या सबंधांत जो अल्पसंख्याक विषयक निर्णय दिला आहे तो राष्ट्रसंघाच्या निर्णयाविरुद्ध व राष्ट्रहानिकर असा असल्यामुळें प्रधान महाशयांचें तें कृत्य जागतिक विधिविरुद्ध ( against the " Public Law " i. e. illegal) व म्हणून निश्चितपणें अविधि स्वरूपाचें झालें आहे. आणि हिंदुस्थान हें राष्ट्रसंघाचे अेक घटक राष्ट्र असल्यामुळें त्यानें तो निर्णय स्वीकारणें हेंहि नुसतें आत्मघातीच नव्हे तर जागतिक नियमाविरुद्ध व जागतिक दृष्टीनें अविधि ( illegal ) कृत्य केल्यासारखें ठरेल हें हिंदुस्थानला कळले पाहिजे. जगन्नियमाविरुद्ध निर्णयकरणें व स्वीकारणें हे अिंग्लंडच्या व हिंदुस्थानच्या हातून घडणारे मोठाले अपराध आहेत.

## अल्पसंख्यांक ( minorities ) कोणाला म्हणावें.

१ अल्यसंख्याकांना संरक्षण द्यावयाचें म्हणतांच विशिष्ट व्यापारीवर्ग, अेखादा व्यवसायीवर्ग, निरनिराळ्या प्रकारचे नोकरवर्ग, विशेष विद्याकलाशास्त्रें आदिकांतील निरनिराळ्या शाखांचा अभ्यासकवर्ग, थोडक्यांत

सांगावयाचें म्हटल्यास ज्या ज्या गोष्टींमुळें, व्यवसायामुळें, गुणामुळें वा प्रकारामुळें मनुष्य समाजांत विभिन्नता होअूं शकतें तितक्या विभिन्नतेचे निरनिराळे गट पडून सर्वत्र अल्पसंख्याकांची रेलचेल व्हावयाची आणि अल्पसंख्याकांचें संरक्षण केलें पाहिजे असें सांगावयास लागणारी जी बहु-संख्या तिचाच अभाव व्हावयाचा ही आपत्ति येअू नये व अल्पसंख्याक वर्गांची अतिव्याप्ति होअूं नये म्हणून राष्ट्रसंघाला अल्पसंख्याक कोणाला म्हणावें याचा स्पष्ट व निश्चित उल्लेख करावा लागला. प्रत्येक देशांत त्या त्या देशाची धनी जाती, त्या जातीचा धर्म, भाषा अित्यादि मिळून झालेल्या राष्ट्रांत अल्पसंख्या तिला समजावयाचें कीं जो "**मनुष्यसमाज जाती, धर्म व भाषा दृष्टीनें त्या देशांतील बहुसंख्याक राष्ट्रीयांपासून विभिन्न प्रकारचा आहे तो अल्पसंख्याक समजावा.**" ( citizen's who differ from the majority of the population in Race, Language and Religion are called minorities. ) ( हिंदुस्थानांत मुसलमानादिक विधर्मीय व परसंस्कृतीचे लोक अल्पसंख्याक ठरूं शकतात. पण अस्पृश्य शीखादिक हिंदु जातीयांमधीलच निरनिराळे गट अल्पसंख्याक ठरूं शकत नाहींत. यांना अल्पसंख्याक ठरवणें म्हणजे जागतिक न्यायाविरुद्ध निर्णय करणें होय. हें लक्षांत येअीलच. )

२ अेखाद्या देशांत नवीन वसाहत करावयास म्हणून जर कोणी आले तर त्यांची लोकसंख्या अल्पसंख्याक गणली जाअूं नये. कारण ते जे देशांत आले ते स्वच्छेनें व त्या नव्या देशांतील सर्व विधिनियमादि मानावे लागतील हें जाणूनच आले असल्यामुळें त्यांना अल्पसंख्याक समजून संरक्षण मागतां येत नाहीं. परंतु जे ( भिन्न जाती, धर्म भाषावाले ) त्याच देशांत पुष्कळ पूर्वीपासून रहात आले आहेत व पुढेंहि स्थायी रहाणारे आहेत. ( permanent ones ) तेच अल्पसंख्याक म्हणून संरक्षण मागूं शकतात. अितरांना मागतां येत नाहीं. ( या नियमान्वयें थोड्याच वर्षांपूर्वीपासून आलेले येथें हिंदुस्थानांत वसाहत करणारे व करूं पहाणारे अँग्लोअिंडियन वा अिंग्लिशादि युरोपियन लोक "आम्हीं अल्प-संख्याक म्हणून आम्हाला संरक्षण पाहिजे." असें म्हणूं शकत नाहींत.

अथवा त्यांनीं तसें म्हटलें तरी ते संरक्षण त्यांना देणें हें जगन्न्यायाला अनुसरून होणारें नाहीं.)

३ राष्ट्रसंघसमिति ( council of the League of Nations ) नें १९२८ जूनमध्यें ता. ६ ला झालेल्या बैठकीत " **देशांतील संख्येंत शेंकडा बरेंच प्रमाण पडेल अशी पुरेशी संख्या असलेले ते अल्पसंख्याक** " म्हणावें असें ठरविलें. हें शकडा बरेंच प्रमाण व पुरेशी संख्या म्हणजे काय याहि गोष्टीला कांहीं निश्चित मर्यादा घालणें भाग पडलें. आणि त्याप्रमाणें अनेक बाजूनें विचार करून **ती पुरेशी संख्या शेंकडा कमींत कमी २० वीस तरी प्रमाणाची ' अल्पसंख्याकांचे हक्क ' मागण्यासाठीं असलीच पाहिजे. याहून कमी प्रमाण असलेल्या लोकांची अल्पसंख्याक म्हणून गणना करतां कामा नये. असें निश्चितपणें राष्ट्रसंघानें ठरवून टाकलेलें** आहे. ( मेरचें " प्रोटेक्शन ऑफ मायनारिटीज [अल्पसंख्याकांचें संरक्षण] पुस्तक ) क्रमांक ( २ ) व ( ३ ) मधील सांगितलेल्या जागतिक नियमाप्रमाणें हिंदुस्थानांत मुसलमांना व्यतिरिक्त ( कारण ते विधर्मी, विजातीय व विभाषीय असून शेंकडा २५ म्हणजे २० च्या वर आहेत म्हणून ते अल्पसंख्याक ) खिस्ती, पार्शी, यहुदी, अँग्लोअिंडियन वा युरोपियन यांपैकीं कोणत्याहि अेका जातीचें प्रमाण पाहिलें तर शेंकडा वीसच्या पुष्कळच खालीं पडतें. या चारही जातीपैकीं अधिक संख्येंत असलेले खिश्चन केवळ २-२॥ कोटी म्हणजे शेंकडा ७¼ पेक्षांहि थोडी कमीच संख्या भरणारे आहेत. अर्थात् अल्पसंख्याक नात्यानें संरक्षण मागण्याचा हक्क खिस्ती लोकांना सुद्धां मागतां येत नाहीं. मग अितरांची गोष्ट कशाला ? पोलंडच्या अेका जिल्ह्यांत जर्मनांची संख्या अुपरोक्त मर्यादेच्या आंत पडल्यामुळें त्यांना पोलीशशाळांतच आपली मुलें पाठवावयाला भाग पाडलें जात आहे. गेल्या शिरगिणतीच्या वेळीं लिथुयानियांमध्यें पोलिश लोकांची संख्या शेंकडा २० पेक्षां कमी पडल्यामुळें पोलिश लोकांचे अल्पसंख्याक हक्क संरक्षण काढून घेतलें गेलें आहे. आस्ट्रियांमध्यें असलेल्या झेच लोकांनीं आम्हांला अल्पसंख्याक संरक्षणाचे हक्क दिले जात नाहींत म्हणून राष्ट्रसंघाकडे

कागाळी नेली. तेव्हां राष्ट्रसंघाच्या विचारणीला " आस्ट्रियांतील कोणत्याहि भागांत अल्पसंख्यांक हक्काची मागणी करतां येअील अशी वैध संख्या अेच लोकांची नसल्यामुळें त्यांची हक्कमागणी पुरी करतां येत नाहीं " असें अुत्तर आस्ट्रियानें दिलें व राष्ट्रसंघाला त्या अुत्तरापुढें मान वाकवावी लागली. ( मेरचें वरील पुस्तक पृ. ९३, १०२, १३० ) यावरून स्पष्ट दिसून येतें कीं **अल्पसंख्याक लोक सर्व देशभर पसरून आपल्या हक्कांचें घोडें दामटूं शकत नाहींत. हक्कासाठीं योजलेली त्यांची ही युक्ति राष्ट्रसंघ त्यांना पचूं देत नाहीं; हें स्पष्ट असल्याचें ध्यानांत ठेवणें महत्त्वाचें आहे.**

## संरक्षण म्हणजे काय ?

### ( व ते अितर देशांत मुसलमानांना किती मिळाले ? )

येथपर्यंत अल्यसंख्याकांचे संरक्षणाचे हक्काची माहिती दिली पण संरक्षण संरक्षण म्हणजे तरी काय आहे ? त्या संरक्षणाची कक्षा राष्ट्रसंघानें काय ठरविली आहे हें मागें क्रमवार दिलेलें आहे. तेव्हां त्याची द्विरुक्ति करण्याचें कारण नाहीं. राष्ट्रसंघानें अल्पसंख्यांकांना म्हणून द्यावयाचें ठरवलेल्या संरक्षण-हक्कानुसार ग्रीस आदीक देशांत मुसलमानांना काय संरक्षण मिळालें हें पहाणें लाभदायी होणारें आहे.सर्व बाल्कन राष्ट्रें थोड्याच कालापूर्वी तुर्की साम्राज्याचे पोटांत रिचवलेलीं होतीं. त्या सर्व देशांवर तुर्की खलीफाची सत्ता होती. मुसलमानांचे राज्यसत्तेखालीं ते देश होते. युरोपांतील तुर्की खलिफाची सत्ता नष्ट करण्यासाठीं अितर युरोपीय राष्ट्रांची जर सक्रिय सहानुभूति मिळाली नसती तर तुर्की खलिफाचे दाढेखालीं हीं सर्व बाल्कन राष्ट्रें आजही रगडलीं जात असल्याचाच देखावा दिसूं शकला असता. पूर्वी मुसलमानी साम्राज्याच्या दडपत्या पंजाखालीं असलेल्या बाल्कन राष्ट्रांपैकीं ज्या कांहीं आज स्वतंत्र झालेल्या देशांत पुरेशा प्रमाणांत मुसलमान आहेत त्या देशांत मुसलमानांना कोणते अल्पसंख्यांकांचे हक्क मिळाले आहेत हें पाहणें पुष्कळच बोधकारक आहे.

ग्रीसमध्यें:—

१ मुसलमान लोकांच्या कौटुंबिक आणि वैयक्तिक घरगुती गोष्टी मुसलमानी चालीरीतिप्रमाणें करूं देण्याचा हक्क मुसलमानांना ग्रीस देशानें दिलेला आहे.

२ मुसलमानी मशिदी, मुसलमानीं प्रेतस्थानें, आणि मुसलमानी धर्ममतीय संस्था याचें संरक्षण केलें जाईल अशी हमी ग्रीसनें मुसलमानांना दिलेली आहे.

३ मुसलमानांच्या धर्ममतीय व मुसलमान दानसंबंधीय आज असलेल्या सर्व संस्थांना मोकळीक व सर्व प्रकारच्या सवलती ग्रीस देत आहे. आणि अितर धर्ममतीयांप्रमाणेंच त्यांच्या धर्ममतसंबंधीं व दानसंबंधीं निघणाऱ्या नव्या संस्थानांसुद्धां त्यांच्या अंतर्गत कार्यापुरती सर्व प्रकारची मोकळीक ग्रीस देईल.

याचप्रमाणें सर्व–क्रोट–स्लोव्हेन या संस्थानानेंहि मुसलमानांना वरील-प्रमाणेंच हक्क दिलेले आहेत. अुत्तर सिलेशियासंबंधीं जर्मन-पोलीश करार राष्ट्रसंघाच्या विध्यनुसार झालेला आहे. त्यांत " धार्मिक संरक्षण म्हणजे धार्मिक विधि, पौरोहित्यस्थलें; व ज्यूंचे समाज यांचे अंतर्गत व्यवहार त्यांच्या स्वभाषेंत चालावेत; त्यांच्या अुपरोक्त धार्मिक संस्थाच्या कार-भारांत धर्म-पुरोहित, धर्मविधि-चालक, त्यांचे सहाय्यक, ब्रह्मचारिणी, आणि तत्संबंधीं नोकरचाकर हे सर्व त्यांचे त्यांनीं नेमावेत; **त्यांचीं धर्म-मतें, धर्मग्रंथ, विधि विधानें, दानकर्मै, आणि देणग्यांचें स्वीकार यासंबंधापुरतेंच त्यांनीं परदेशी राहणाऱ्या आपल्या सहधर्मीयां-बरोबर दळणवळण ठेवावें."** आणि राष्ट्रांमधील धार्मिक व अध्या-त्मिक कार्यप्रीत्यर्थ म्हणून ठेवल्या गेलेल्या द्रव्यनिधींमधून अल्पसंख्याकांच्या अुपरोक्त धार्मिक गोष्टीकरतां यथाप्रमाणानें त्यांना द्रव्यसाह्य मिळावें, हें तें साग्र व सविस्तर संरक्षण–क्षेत्र आहे. यांत कांहीं कमी होता कामा नये." अल्पसंख्याकांच्या भाषाविषयक व शिक्षणविषयक हक्कासंबंधीं पुढीलप्रमाणें नियम आहेत.

१ " अल्पसंख्याक भाषा शिक्षणवर्ग."

(अ) अल्पसंख्याकांचे भाषेंत शिकवणाऱ्या प्राथमिक शाळा.

(आ) राष्ट्रभाषा शिकवण्याकरितां काढलेल्या प्राथमिक वर्गांतून अल्पसंख्याक भाषेचें माध्यम ठेवणें.

(अि) अल्पसंख्याकांकरितां अभ्यासक्रम.

२ "अल्पसंख्याकांचे भाषेंत त्यांना दिलें जाणारें त्यांचें धार्मिक शिक्षण वरीलप्रमाणें शाळांची योजना करून त्यांत द्यावें." या अल्पसंख्याकांच्या शाळा त्यांना राष्ट्रीय सरकारनें कोठें काढून द्याव्यात याचाहि निर्देश राष्ट्रसंघानें स्पष्ट करून ठेवलेला आहे.

(अ) "ज्या गांवीं वा नगरीं अल्पसंख्याक समाजांतून ४० मुलें शिक्षणासाठीं सिद्ध असतील तेथें त्यांचें भाषेंत प्राथमिक शाळा मिळाव्यात."

(आ) "ज्या गांवीं वा नगरीं १८ वा १८ संख्येचे वर अल्पसंख्याक विद्यार्थी असतील तेथें अल्पसंख्याक भाषा शिक्षणवर्ग तेथील राष्ट्रीय शाळेंत स्वतंत्रपणें द्यावा."

(अि) "ज्या गांवीं वा नगरीं १२ वा त्याचे वर संख्या असलेले अल्पसंख्याक विद्यार्थी असतील तेथें त्यांना त्यांचे अल्पसंख्याक धार्मिक शिक्षणवर्ग मागण्याचा हक्क आहे."

अल्पसंख्याकांच्या दुय्यम शिक्षणार्थ स्वतंत्र शाळा हव्या असतील तर त्याकरितां त्यांनीं ३०० वा त्याहून अधिक मुलें पुरवलीं पाहिजेत. आणि अुच्च शिक्षणाच्या शाळांतून स्वतंत्र वर्गांत अल्पसंख्याक भाषेचें माध्यम ठेवून शिक्षण हवें असलें तर त्यांनीं कमीतकमी ३० तरी मुलें सिद्ध केलीं पाहिजेत. **या ज्या शिक्षणसंस्था वा वर्ग अल्पसंख्याकांकरतां काढले जातील ते वर्ग वा त्या संस्था ठरलेल्या संख्येपेक्षां मुलें कमी झालीं म्हणजे ठेवण्याची आवश्यकता नाहीं. त्या शाळा वा वर्ग बंद करतां येतील."** कांहीं देशांतील बहुसंख्याकांचें व हिंदुस्थानांतील बहुसंख्याकांचें शेंकडाप्रमाण लक्षांत ठेवण्यासारखें आहे. पोलंडची राष्ट्रीय बहुसंख्या शेकडा ६०, झेचोस्लोव्हाकियाचे राष्ट्रीयांची बहुसंख्या शेकडा ६४ आणि सर्बक्रोट यांच्या देशांतील राष्ट्रीयसंख्या शेंकडा ७३ आहे. हिंदुस्थात राष्ट्रांतील **राष्ट्रीयांची म्हणजे हिंदूंची** बहुसंख्या शेकडा ७५ आहे. हे तौलनिक आकडे लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. हिंदुस्थानांतील

अल्पसंख्याकांची म्हणजे मुसलमानांची अल्पसंख्या पोलंड, झेचोस्लोव्हाकिया, आदीक देशांतील अल्पसंख्याकांच्या संख्येहूनहि बरीच कमी आहे. अल्पसंख्याकांची संख्या अितर पुष्कळ देशांत हिंदुस्थानच्या तुलनेनेंच नव्हे तर वर दिलेल्या तीन देशांच्या तुलनेहूनही पुष्कळच आधिक आहे. आणि तरीहि अल्पसंख्याकांना राष्ट्रसंघानें अुपरोक्त हक्कांचेच अधिकारी ठरविलें आहे. अितकेंच हक्क त्यांना कां दिलें ? याहून आधिक हक्क त्यांना कां दिलें नाहींत ? याचें अेक विशेष कारण राष्ट्रसंघानें दिलेलें आहे. व ते फार मननीय आहे. तें हें—

**" अेखाद्या देशांत अल्पसंख्याक नात्यानें अेखाद्या जातीला वा भाषावाल्यांना स्वतंत्र अस्तित्व कल्पून संरक्षण देण्यापूर्वीं त्या त्या देशांतील बहुसंख्याकांपासून वा त्या राष्ट्राच्या बहुसंख्य राष्ट्रीयांपासून ती जाती वा भाषावाले लोक भिन्न मनोवैशिष्ट्यानें भिन्न समाज–विशेषत्वानें व अैतिहासिक रीतीनें भिन्नता असणारे असले पाहिजेत. त्यावांचून त्या त्या लोकांना स्वतंत्र अल्पसंख्यांक अस्तित्व दिलें जाअूं नये. ' अल्पसंख्यांक संरक्षण ' प्रश्न हातीं घेअून तो सोडवण्याचा प्रयत्न करणारांचा हेतू अल्पसंख्याकांचा प्रश्न राष्ट्राच्या शरीराच्या बरगडींत सतत विभक्ततेच्या रूपानें खुपसला गेलेला भाला होऊन बसावा असा नव्हता. तसें त्यांच्या स्वप्नींहि नाहीं.**

( राष्ट्रसंघसमितिच्या ९।१२।१९२५ च्या बैठकीचें प्रतिवृत्त. )

**" अेक्या राष्ट्रांत दुसऱ्या राष्ट्राची निर्मिति ( अेक्या म्यान्यांत दोन सुऱ्यासारखें ) होअूं देणें हें हरप्रयत्नानें टाळलेंच पाहिजे. राष्ट्रशरीराशीं हळूहळू अेकजीव होण्याचें स्थळीं अल्पसंख्याकांची अेक विशेष हक्कवाली जाति निर्माण करून राष्ट्रांत दुहीचा पाया शिरकवणें हें केव्हांहि अनिष्ट, अन्याय्य व अयोग्यच ठरल्यावांचून राहणार नाहीं. "** ( अेम. ब्लाच्झिव्हस्की यांची टीप–राष्ट्रसंघ १९२२)

राष्ट्रसंघानें हे विषमय परिणाम टाळण्यासाठीं सावधानतेनें अल्पसंख्याकांच्या हक्कांची किमान मर्यादा ठरवून त्या कक्षेतलेच हक्क मान्य केले आहेत.

ती राष्ट्रसंघाची मर्यादा अुल्लंघून हिंदुस्थानांत मुसलमानांचें हक्कांचा हिंदुस्थानराष्ट्रविघाती विषवृक्ष बनण्याअितके अवाचेसवा हक्कांचे दान त्यांच्या पदरीं टाकणारे, तसें करण्यास संमति देणारे व ती गोष्ट मान्य करणारे हे सर्वच राष्ट्रसंघाच्या भाषेंत अन्यायी, अनिष्टकारी व ( राष्ट्र ) घातक ठरणारे नाहींत काय !

**" अल्पसंख्याकांचा स्वतंत्र गट समजून त्यांना स्वतंत्र संरक्षण देण्याचा अुपक्रम करण्यांत थोडासा धोकाच आहे. राष्ट्रांतील सर्व व्यक्तींना राजकीय व सामाजिक समान स्वतंत्रता देणें हें जर त्या राष्ट्राच्या सुखी व शांतीमय जीवनासाठीं अवश्यक असेल तर स्वतंत्र अस्तित्व मान्य केल्या गेलेल्या गटांत क्रमाक्रमानें स्वतंत्र घटकपणाची जाणीव तदंगभूत परकीय भावांत परिणत होअून सुवर्धित व प्रबलपणें संघटन करून राष्ट्रापासून फुटून निघण्याच्या प्रवृत्तीचें बीजारोपणच हें अल्पसंख्यांक संरक्षणाचें कार्य करील आणि त्यायोगें पुढें राष्ट्राचे तुकडे होण्याचें भय अुत्पन्न होअील. "**

जागतिक सार्वजनीन ( कायदा ) विधि–पुस्तक, 'पालफाचिली.'

[ राष्ट्रसंघानें स्वतःच मान्य केलेल्या किमानपक्षीं अल्पसंख्याक हक्कामध्येंसुद्धां राष्ट्रभंगाच्या भावी भयाचें विषबीज दूरदर्शी राष्ट्रसंघीयांना दिसूं शकले. अशा स्थितींत हिंदुस्थानांत मुसलमानांना सर्वस्वी स्वतंत्र गट बनून विभक्तपणें बहुसंख्यांक राष्ट्रीयांशीं स्पर्धेनें राहतां येण्याअितकें हक्क मिळाल्यास्थितींत ते राष्ट्रभंगाचें संकट आरंभींच अुत्पन्न करून ठेवण्याचा महान अपराध व महापातक हक्कदानी व्यक्तींच्या वा पक्ष्यांच्या हातून घडत आहे याकडे डोळेझाक करून कसें चालेल ? ] आणि हें भय शक्यतितकें कमींत कमी करतां यावें व राष्ट्राच्या अखंडतेला व अभंग अेकत्वाला हानि पोचूं नये म्हणून राष्ट्रसंघानें अल्पसंख्यांक परकीयांचे हक्क शक्यतितक्या लहान संपुष्टांत आणून ठेवलेले आहेत. तरीहि पालफाचिली यांना या लहान संपुष्टी हक्कांतही राष्ट्रांतील अैक्यभंगाच्या विषाचा वास येत आहे. यावरून कोणत्याही राष्ट्रानें व त्यांतील राष्ट्रीयांनीं अल्पसंख्याकांच्या हक्कांची काळजी दाखवावयाचीच असली तर त्या अुदारपणाची, भूत–दयेची, मर्यादा राष्ट्रसंघानें घालून दिलेल्या लक्ष्मणरेषेपुढें जाअूं देणें म्हणजे राष्ट्रभंगरूपी

रावणाच्या दाढेंत राष्ट्रमाता ढकलण्याचें राष्ट्रघाताचें महापातक करण्यासारखें होणार आहे. हें कोणाच्याहि—ज्याचा मेंदू भ्रष्ट झाला नसेल अशा कोणाच्याहि—ध्यानांत येण्यास वेळ लागणार नाहीं.

येथवर दिलेल्या राष्ट्रसंघाच्या माहितींतील अल्पसंख्याकांच्या प्रश्नाची वाटाघाट, त्यांचे हक्क, त्या हक्कांची पराकाष्ठेची मर्यादा, राष्ट्राचे घटक कोणते यासंबंधीं राष्ट्रसंघाची स्पष्ट कल्पना अित्यादि गोष्टींचें पर्यालोचन करतां या पूर्वार्धाचे आरंभीं, कोणकोणत्या घटकाचे समवायानें राष्ट्र बनलेलें असतें, म्हणून जें विधान केलेलें आहे त्या विधानाची आवृत्ति राष्ट्रसंघ करीत आहे हें स्पष्ट कळून येण्यासारखें आहे. पॅलेस्टाअिनमधील ज्यू लोक आज जगांत सर्वत्र पसरलेले आहेत. पण त्यांच्या स्वतःच्या देशाला ते मुकले असून त्यांना स्वतःचा स्वतंत्र म्हणून देश राहिला नसल्यानें यहुदी राष्ट्राचें अस्तित्व अंतर्हित झालेलें आहे, हें सर्वांना माहीत आहे. पॅलेस्टाअिनसह सर्व अरबस्थान आज बहुतेक मुसलमानमय झालेला आहे. अरबस्थान हा देश तुर्की साम्राज्यांत मोडत होता. जर्मन महायुद्धांत तुर्कस्थान हा जर्मनीचे बाजूनें युद्धांत समाविष्ट होतांच कारस्थानी अिंग्लंडनें तुर्कस्थानचें बळ तोडण्यासाठीं व आणखी अेक प्रदेश आपल्या कक्षेंत आणण्यासाठीं अिंग्लिश द्रव्याचा पाण्यासारखा प्रवाह सोडून कर्नल लॉरेन्स नांवाच्या कुख्यात कौटिल्यपटु हेराकरवीं स्वातंत्र्याचें आमिष दाखवीत अरबस्थानला तुर्कस्थानच्या विरुद्ध लढण्याकरतां त्याच्या साम्राज्यांतून फोडून वेगळा केला. जर्मनयुद्ध संपल्यावर अरबस्थानची स्वातंत्र्य कल्पना व आकांक्षा स्वप्नवत् ठरली. अरबस्थानचे तुकडे करून फ्रान्स व अिंग्लंडनें 'पालित देश' नांवानें आपल्या मुखशुद्धीसाठीं चघळण्याकरितां तोंडांत टाकलें. पॅलेस्टाअिनमध्यें सध्यां अरब रहात आहेत. अरबस्थान हा सध्यां मुसलमानमय असल्यानें तें मुसलमानी राष्ट्र समजलें जात आहे. अिंग्लिशांना दीनदुर्बलांचा कळवळा अुत्पन्न होतो व त्यासाठीं ते नसतीं भांडणें अुकरून काढतात हें सर्व जगाला विदित झालेलें आहे. भौगोलिक परिस्थिति लक्षांत आणतां सुअेझ कालवा व तांबडा समुद्र हीं हिंदुस्थानच्या साम्राज्याच्या दृष्टीनें अिंग्लंडचीं मर्मस्थानें आहेत. तीं सर्वोपरी सुरक्षित राहण्यासाठीं सुअेझसहित तांबड्या समुद्राच्या दोन्ही बाजूला अिंग्लीशांच्या सत्ते-

खालीं असलेलें प्रदेश असणें हें अत्यंत आवश्यक आहे. अेका बाजूला अीजिप्त आहे; व तो अिंग्लिशांच्या कैचींत सापडलेला आहे. अिकडे प्यालेस्टाअिन मुसलमानी अरबांच्याच देशाचा असलेला अेक भाग. जर्मन युद्धांपासून मुसलमानांच्या तुर्की साम्राज्यावर व अितर मुसलमानी देशांवर जे अिंग्लिशांचे आक्रमक घाव बसत गेले त्यामुळें मुसलमान देश अिंग्लिशांवर दात ओठ खाणारे बनलेले आहेत. अशा वेळीं मुसलमानी प्रदेशापेक्षां दुसऱ्या अेखाद्या मित्र जातीचा प्रदेश जर तांबड्या समुद्राचे कांठावर अुत्पन्न करतां आला तर ती गोष्ट अधिक सुरक्षित होअील, ही दूरदर्शी गोष्ट लक्षांत आणून आपल्या देशाला मुकलेल्या, दीनदुबळ्या व परागंदा झालेल्या ज्यू लोकांची अिंग्लिशांना दया आली, आणि दीनोद्धरणाकरितां अितर राष्ट्रांच्या साह्यानें हातांतून निघून गेलेला ज्यू लोकांचा स्वदेश त्यांना मिळवून द्यावा व ज्यू राष्ट्राची पुन्हां स्थापना करावी असें अिंग्लिश प्रमुख राष्ट्रांनीं राष्ट्रसंघाद्वारा ठरविलें. सर्व जगभर ज्यू लोक आपला धर्म, भाषा व संस्कृति संभाळून होते व आहेत. पण देशच नव्हता व म्हणून ज्यू लोक राष्ट्रपदाच्या मानापासून च्युत झाले होते, तो देश त्यांना मिळवून देअून त्यांच्या राष्ट्रपदाचा पुनरुद्धार करावा असें ठरलें, व प्यालेस्टाअिनमध्यें पुन्हां ज्यू वस्ती होअूं लागून त्या राष्ट्राची पुन्हां प्राणप्रतिष्ठा होअूं लागली आहे. कित्येकांचे कित्येक स्वार्थ या घटनेला प्रवर्तक झाले असले—असतील पण ती घटना घडवून आणावयास जी जगमान्य राष्ट्र कल्पना हातीं धरतां आली ती अमान्य करतां येणार नाहीं. जाती—धर्म—संस्कृति व भाषा संभाळून असलेल्या पण देश नसलेल्या ज्यू लोकांना देश पुन्हां अुत्पन्न करीत त्यांचें राष्ट्र अुज्जीवित करावयाचें ठरून त्याचा अुपक्रम झाला. अितस्ततः भटकत असलेल्या ज्यू लोकांना आपल्या स्वतःचा देश पुनरपि प्राप्त होअून ज्यू राष्ट्राच्या अस्तित्वाची घटस्थापना झाली. या कृत्यांतही राष्ट्राचे घटक कोणते असतात व ते महत्त्वाचे घटक अेकत्र आणले वा आले म्हणजे अंतर्हित झालेलेंहि राष्ट्र पुन्हां अस्तित्वाचा अुंबरठा कसा चढतें, हें पाहिलें असतां राष्ट्राचे अविभाज्य घटकांचे पंचक कसें अविभाजनीय, व अत्यंतावश्यक आहे हें ध्यानांत येअील प्रत्येक राष्ट्र आपल्या राष्ट्रांतील राष्ट्रीयांची राष्ट्रभ्रष्टता होअूं न देण्याविषयीं कसें

जपत असते. हें पहाणेंहि येथें अनाठायीं होणार नाहीं. मिश्र ( अिजिप्त ) देशांत अमेरिकनांनीं काढलेल्या विश्वविद्यालयांत ख्रिस्ती-मतप्रसार करण्याचा तेथील अमेरिकन प्रोफेसरांनीं अुपक्रम केला होता. ही गोष्ट लक्षांत येतांच मिश्रमधील शिक्षित वर्गांत तीव्र असंतोष पसरला. ख्रिस्ती लोकांनीं शिक्षणाच्या ढोंगाखालीं स्वमतप्रचार करण्याचा अुपक्रम केला आहे तो बंद झाला पाहिजे म्हणून शिक्षित लोकांच्या शिष्टमंडळांनीं शिक्षणमंत्र्याकडे कागाळी नेली. त्या विश्वविद्यालयाला ४०० पौंड साह्य मिश्रसरकारकडून मिळत होतें. तें सहाय्य तत्काल बंद केलें गेलें आणि विश्वविद्यालयाचे कुलपतीला ‘ जर असा परकीय मतप्रचार करूं पहात असाल तर तुमचे विश्वविद्यालयाला मिळालेली सरकारी मान्यता काढून घेअून तुमचें विश्वविद्यालय बंद करावें लागेल.’ अशी सरकारकडून धमकी मिळाली. लागलींच अमेरिकन कुलपती शिक्षणमंत्र्याजवळ जाअून त्यांनीं “ आम्हीं पुन्हां असें करणार नाहीं.” अशी शरणागतीची हमी भरली तेव्हां विश्वविद्यालयाचा त्यांचा व्यवसाय ( धंदा ) टिकूं शकला. युरोपांतील अेका देशांत त्या देशांतील धर्ममत बदलण्याचा जर कोणी परकीय धर्ममतवाला प्रयत्न करील तर त्याला ‘ अराष्ट्रीयता ’ फैलावण्याच्या आरोपाला बळी पडावें लागेल असा राष्ट्रविधि ( कायदा ) आहे. तुर्कस्थानांत कोणत्याहि तुर्की मनुष्यानें युरोपीय बाअीशीं लग्न केल्यास त्याला कोणतीहि सरकारी नोकरी मिळूं नये, असा नवीन अनुल्लंघ्य नियम करण्यांत आलेला आहे. हा नियम करण्यापूर्वीं तुर्कस्थानच्या सर्वाधिकाऱ्यानें-केमालपाशानें-स्वतः लग्न केलेल्या युरोपियन बाअीशीं काडीमोड करून तिला आपल्या जवळून काढून दिलें.

## युरोपीय देशांत धर्म-भाषा-संस्कृति.

युरोपीय देशांत प्रजातंत्रवाद फैलावल्यापासून पूर्वीं परमतसहिष्णुता, नसल्यामुळें जे धार्मिक अत्याचार, रक्तपात, हत्याकांडें होत असत, त्याला सांप्रत आळा पडला. आणि धार्मिक दुराग्रह, छळ जरी कोठें कोठें होत असले तरी जनदृष्टीनें त्या गोष्टीला अपराधी स्वरूप असल्यामुळें तें चोरून छपूनच चालू राहिलें व त्यामुळें अर्थातच त्या गोष्टींचें प्रमाण फार कमी

झालें. मतांधतेचा अुगम यहुदी, खिस्ती लोकांतून झाला व त्या मतांधतेच्या अुन्मत्त रक्तपिपासूनृशंसतेला मुस्लीममतानें पराकाष्ठेला पोंचविलें. श्रीमत् स्वामी विवेकानंद म्हणतात. "अेक देववादी मतानेंच जगांत मतांधता जन्मास येते. त्याचा देव हा स्पृहाशील व मत्सरी ठरून दुसऱ्या देवांच्या भजकांवर तुटून पडणें हेंच त्याचें विशेष वैशिष्ठ्य ठरतें." हें अितिहाससिद्ध तत्व सर्व जगाच्या अनुभवाला आलेलें आहे. परंतु असल्या मनुष्य–संहारक गोष्टीला लवकर वा अुशीरा निसर्गतःच आळा बसणें हें साहजिकच असणार. अहिंसावादी बौद्धपंथाच्या पडछायेच्या म्हणजे बौद्धपंथाच्याच अुपदेशाचे आधारावर पण कल्पना विभिन्नतेच्या स्वरूपांत खिस्तीमताची प्राणप्रतिष्ठा झाली. खिस्तीमत हें अेकदेववादी असल्यामुळें मतांधता त्यांत येणें अपरिहार्य झालें. तथापि त्यांतील अहिंसादिक सद्गुणोपदेशाकडे लक्ष जाणें हें अनिवार्य होतें. व मतांधतेला त्रासलेल्या जनतेचें लक्ष त्या मतांतील सद्गुणोपदेशाकडे वळून त्याचे वळावर मतांधतेला तिलांजली देण्यासाठीं 'प्राटेस्टंट' पोटमत त्यांतूनच अुदय पावलें. पुढें हळूंहळूं त्या पायावर धर्ममत स्वातंत्र्याची कल्पना सर्वत्र फैलावून आजच्या सार्वजनीन व्यवहारांतील तें अेक महत्वाचें व प्रमुखततत्व होअून बसलेलें आहे. जगांतील कोणताहि देश पाहिला असतां विभिन्न धर्ममतांच्या अनुयायांची थोडीबहुत संख्या तेथें असावयाचीच आणि प्रत्येक देशांतील मुख्य धर्मांची वा धर्ममताची बहुसंख्या या अल्पसंख्याविभिन्नमतवाल्यांशीं सहिष्णुतेचें वर्तन ठेवणारी नसावयाची. अशी असलेली परिस्थिती बदलणें अशक्य वाटून परस्परांच्या मतवाल्यामंडळींना अल्पसंख्याकांच्या सुरक्षितीची काळजी वाटावयाला लागूं लागल्यामुळें हें सहिष्णुतेचें तत्व राज्यव्यवस्थेचें अेक सर्वव्यापी धोरण होअून बसणें अत्यंत आवश्यक ठरून, मतसहिष्णुतेच्या तत्वाला प्रात्यक्षिक स्वरूप देण्याचा मार्ग राज्यघटनाद्वाराच होणें शक्य होअूं लागलें. अेकामागून अेक राज्यसंस्था हें सहिष्णुता मत स्वीकारूं लागली. कोणत्याहि राज्यघटनेनें हें अमुक राज्यसंमत धर्ममत म्हटलें कीं, मग त्या व्यतिरिक्त निराळ्या मतांवर असंमतीचा छाप अपरिहार्यतेनें पडतो, व राज्यव्यवथेंत असहिष्णुतेचें बंड शिरण्याची भीति अुत्पन्न होते, म्हणून राज्यघटना म्हटली कीं, ती

धर्ममताच्या प्रश्नापासून अगदीं अलग ठेवावयाची व मग त्या राष्ट्राचा जो राष्ट्रीयधर्म वा धर्ममत असेल त्याला निराळें प्रकारें पाठपुरावा द्यावयाचा असा प्रघात पडून गेला. त्यामुळें जगांतील कांहीं थोड्या देशांना वगळून बाकी सर्व देशांतील राज्यघटनेंत धर्म स्वातंत्र्याचा स्पष्ट अुल्लेख करून राजकारणांत कोणत्याहि प्रकारें धार्मिक असहिष्णुतेचा शिरकाव होअूं द्यावयाचा नाहीं असा दंडक पडला; आणि तरीहि त्या त्या राष्ट्राच्या राष्ट्रीय-धर्माची व राष्ट्रीयभाषासंस्कृतीची ममता त्या त्या राज्यघटनेंत कशीतरी व कोठूनतरी अनुस्यूत केली गेल्यावांचून राहूं शकली नाहीं. यासाठीं युरोपीय राष्ट्रांच्या राज्यघटनेंत धर्म-संस्कृति व भाषा हें घटक राष्ट्रांग म्हणून अपरिहार्यतेनें अस्तित्वांत आहेत हें त्या त्या देशांच्या राज्यघटनेंतील विविध नियमांच्या अर्थात कसें अनुस्यूत झालेलें आहे हें जरा बारकाअीनें व लक्षपूर्वक पाहिलें असतां सांपडल्यावांचून रहाणार नाहीं. यासाठीं कांहीं प्रमुख देशांचे राज्यघटनेंत या गोष्टींची प्रतिबिंबें जेथें स्पष्टास्पष्टपणें पडलेलीं असतील त्या त्या भागाची माहिती आपणांला काय सांगते हें पाहणें प्राप्त झालें आहे.

१ अिंग्लंड—अिंग्लंड हें प्रजातंत्र-वादाचे भोक्ते आहे. तेथें राज्ययंत्र प्रजेच्या संमतीनें चालतें. तरीहि त्यांचे घटनेंतील अेक गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी अ हे. अिंग्लंडचा राजा 'प्राटेस्टंट' मताचाच असला पाहिजे असा नियम आहे, अितकेंच नव्हें तर अेखाद्या दुष्टराजानें प्रास्टेटंट मत टाकून दुसरें मताचा स्वीकार केला तर त्याचा सिंहासनाधिष्ठित होण्याचा हक्क नष्ट होतो. अिंग्लंडमध्यें धर्मस्वातंत्र्य आहे. पण राजधर्म 'प्राटेस्टंट' हाच राहिला पाहिजे. तेंच राष्ट्रीय धर्ममत असें मानलें जातें. अिंग्लिश भाषेविषयीं अिंग्लंड किती अभिमानी आहे हें जगाला चांगलेंच माहीत आहे. आयर्लंडमधील अिंग्लंडच्या अनियंत्रित सत्ताकालीं त्या राष्ट्राची ग्यालिक भाषा मारून अिंग्लिश भाषेचें कलम तेथें लावावयाचें म्हणून त्यांनीं आपल्या सत्ताबळाचा सुद्धां अुपयोग केला. हिंदुस्थानांत आपली भाषा शिकवून त्या भाषेचें वर्चस्व प्रथापित केलें आणि हळूहळूं, नकळत पण पद्धतशीर असें 'अिंग्लिश भाषा' ही हिंदुस्थानची राज्यभाषा—राष्ट्र-भाषा करतां आली तर पहावी म्हणून छपते प्रयत्न सुरू आहेत. हिंदु-

स्थानांत ख्रिस्तीमताचा फैलाव व्हावा म्हणून मुसलमानी बलात्कार-पद्धतीनें नसले तरी भुलथापीनें व फसवाफसवीनें अुपकारांच्या ढोंगाखालीं अिंग्लीश मिशनें प्रयत्न करीत आहेत. अिंग्लिश अधिकारीवर्ग अधिकारी नात्यानें नसला तरी मनाच्या सहजप्रवृत्तीनें म्हणा, पण अिंग्लंडच्या मिशनांना व अितर मिशनांना सहानुभूती दृष्टीनें पाहून निःपक्षपाताच्या कक्षेला धक्का लावलासा दाखवूं न देतां सवलती देत असतात, हें सर्व विश्रुत आहेच. भाषेविषयीं तर अिंग्लिश लोकांची महत्वाकांक्षा अशी आहे कीं, अिंग्लिश भाषा अंतर्राष्ट्रीय व्यवहारांत आलेली अशी जागतिक भाषा व्हावी व याप्रकारें सर्व जगांवर अिंग्लिश भाषेचें प्रभुत्व स्थापन करावें.

२ जर्मनी–१ धर्म, पूर्वीं राज्यसत्ता होती तेव्हां धार्मिक शपथ तर होतीच पण जर्मनीची राज्यघटना प्रजा–तंत्रवादी झाल्यावरसुद्धां अध्य-क्षांच्या प्रतिज्ञेला धार्मिक प्रतिज्ञेची जोड ठेवली आहे. म्हणजे जर्मन राज्यव्यवस्थेंत धर्माचें स्थान अगदीं सूक्ष्मरूपानें पण निश्चितपणें ठेवलेलें आहे. २ सण व सुट्या–"रिचस्टयागनें ठरविलेल्या रविवारच्या व अितर सणाच्या सुट्या ह्या विधि–संरक्षित राहतील. व या सुट्या विश्रांती व अध्यात्मिक प्रगतीसाठीं ठेवलेल्या आहेत" युरोपीयन देशांत बहुतेक ख्रिस्तीधर्माचे लोकच आहेत. क्वचित् मुसलमान व कांहीं यहुदी लोकांची थोडीशी संख्या असते. या सुट्या ख्रिस्तीमतानें ज्या ठरवलेल्या आहेत त्याच ठरवल्या जाअून त्या 'अध्यात्मप्रगतीसाठीं' म्हणून आहेत हें स्पष्ट म्हटलेलें आहे. अर्थात् ख्रिस्ती हें राष्ट्रसंमत धर्ममत आहे हें स्पष्ट होतें. ३ भाषाः—घटनानियम ११३, ज्या भागांत परकीय भाषा बोलणारे अल्पसंख्याक असतील तेथें त्यांच्या आपसांतल्या जातीय व्यवहारांत त्यांच्या अल्पसंख्याक विध्युक्त कक्षेंत त्यांच्या मातृभाषेला जर्मन विधि-समितीकडून व नियामक शक्तीकडून ( administrative power ) प्रतिरोध न व्हावा.

३ आस्ट्रियाः—राज्यघटना भाग १ नियम ८; "जर्मन ही राजभाषा राष्ट्रभाषा राहील. अल्पसंख्यांक परकीयांच्या आपापल्या आपसांतील जातीय-व्यवहारांत मात्र त्यांच्या भाषांच्या अुपयोगाला प्रत्यवाय घेतला जाणार

नाहीं. ” परकीय धर्ममत नसल्यामुळें वा परकीय संस्कृतीचा सुरा तेथें खुपसला जाण्याचा संभव नसल्यामुळें ते नियम निराळे करण्याची अवश्यकता पडली नाहीं.

४ **झेकोस्लोव्हाकिया**:—राज्यघटना-नियम १२८-२ “(परकीय अल्पसंख्याकांच्या आपसांतील व्यवहारांत त्यांच्या भाषेला वाव ठेवून) झेकोस्लोव्हाकिया ही भाषा सर्वांना अनिवार्यतेनें व्यवहारावी लागेल ” हा नियम झाल्यावर कांहीं काळानें आणखी अेक नवीन नियम केला गेला. तो येणेंप्रमाणें—“नियम १२९ च्या अनुरोधें झेकोस्लोव्हाकिया हीच राज्यव्यवहार भाषा ठरविली गेली आहे” नियम १३२ “**कोणत्याहि रीतीनें होअूं शकणारें राष्ट्रभ्रष्टीकरण ( Denationalization ) हें अविधि म्हणजे निषिद्ध ठरविलेलें आहे हा निर्बंध न पाळणाराला शिक्षा दिली जाअील** ” येथें थोडेसें स्पष्टीकरण करणें अवश्यक आहे. त्यांवाचून राष्ट्रभ्रष्टीकरण या शब्दाचा अर्थ कळणार नाहीं. झेकोस्लोव्हाकिया हा देश जर्मनी, आस्ट्रिया, हंगेरी व पोलंड या चार देशांच्या कैचींत आहे. या चारहीं देशांत अधिक भरणा रोमन क्याथोलिकांचा आहे. व तें मत झेकोस्लोव्हाकियांत राष्ट्रीय धर्ममत आहे. तेथें झेकोस्लोव्हाकिया भाषा सर्वांनाच अनिवार्य केल्यामुळें भाषा त्याग करून राष्ट्रभ्रष्टीकरण करणें शक्य नाहीं. देश सोडून अेखादा मनुष्य बाहेर गेला तर त्याला बाहेरच्या देशांत गेला म्हणून राष्ट्रीयता भ्रष्ट झाली असें म्हणतां येणार नाहीं. जातीं बदलण्याला धर्मच बदलावा लागतो. तेव्हां धर्म बदलणें म्हणजेच जाती-धर्म-संस्कृतीच्युत होणें असें मानणें प्राप्त आहे व या प्रकारच्या भ्रष्टतेला राष्ट्रभ्रष्टता म्हटलें आहे, हें अुघड आहे. ही गोष्ट लक्षांत घेतां या नियमांत धर्म-संस्कृती व त्यामुळें जाती याच गोष्टींचा त्याग हा अपराध—राष्ट्रीय अपराध—ठरवला गेला आहे हें स्पष्ट होतें.

५ **जुगोस्लाव्हिया**:—राज्यघटना भाग १ ला:—येथें नियंत्रित-राज्यपद्धती राहील. **सर्बो-क्रोशियन-स्लोव्हेन ही राज्यभाषा राहील.** नियम ११:—“ जातीय व भाषासंबंधीं असलेल्या अल्पसंख्याकांकरतां त्यांची भाषा, त्यांच्या प्राथमिक शिक्षणांत अुपयोजली जाअील. ” येथें

भाषा विशेषानें परकीयत्त्व व्यक्त झालें आहे. बाकी दृष्टीनें परकीयत्त्व व्यक्त होण्याला वावच नाहीं.

६ रशिया:—या देशांत केवळ भौतिकवादच प्रमुख धरून तदनुसार समाजरचना करण्याचा अट्टाहास चालू आहे. याच्या अेक्या विशिष्ट प्रकारच्या मताला बोलशेव्हिझम म्हणतात. खिश्चयानिझम, मार्स्लेमिझम, तसा हा बोलशेव्हिझम हेंहि अेक मत झालें. हें बोलशेव्हिक मत. तें मत परिपुष्ट करून जनसमाजाला सर्व व्यवहारांत तेंच वळण लागणारें वाङ्मयादिरूपानें बोलशेव्हिक संस्कृती व हें मत चालणारें व या संस्कृतींत रंगणारे ते बोलशेव्हिक लोक ही बोलशेव्हिक जाति असा हा धर्म-संस्कृती-जातीचा गट अुभा झालेला आहे. यांनीं यांच्या मताला प्रबल, सुरक्षित व निर्भय करण्याकरितां तद्विपरीत लोकांना दाबून ठेवलेंच पाहिजे हें ओघप्राप्तच कृत्य आहे. आणि त्या अनुसारेंच त्यांची त्यांनीं राज्यघटना बनविली आहे. त्यांच्या राज्यघटनेच्या ६५ वे नियमांत असें आहे कीं, खालीं वर्णन केलेल्या लोकांना मतें देण्याचा व प्रातिनिधि म्हणून अुभें राहण्याचा हक्क नाहीं, त्या व्यक्ती ह्या:—

१ वाढता लाभ मिळविण्यासाठीं जे लोक वेतन देअून नोकर ठेवतात व त्यांचे परिश्रमावर लाभ मिळवितात असें लोक:—

२ ज्या लोकांना काम ( शारीरिकश्रम ) करावें न लागतां व्याजावर निर्वाह वा जमिनीच्या लावणीचे अुत्पन्नावर निर्वाह आदीकरुपानें बैठें अुत्पन्न खावयाला मिळतें ते लोक:—

३ व्यक्तिगत व्यापार करणारे ( तेथें व्यक्तिगत काम करणें हें बोलशेव्हिझमला संमत नाहीं. जो अुद्योग करावयाचा तो समाजासाठीं. त्या अुद्योगार्थ भरणपोषणाला समाज जें देअील तें घेणें हें अेक मूलभूत मत बोलशेव्हिझमचें आहे ) व व्यापारी व अुदमी लोकांचीं अडत करणारे लोक—

४ मंक व क्लर्जी ( धर्ममतोपाध्याय आदीकांसारखे ) मग ते कोणत्याहि धर्ममताचे असोत—ते लोक:—

५ झारच्या राजवटींतील पोलिसांना नोकरीवर घेणारे, त्यासाठीं अडत केलेले लोक, झारच्या जांडरमेरी पथकांतील लोक; झारच्या गुप्तचराचें काम केलेले लोक, आणि राजवंशांतील लोक:—

६ ( आपल्या विषयाशीं संबंध नाहीं म्हणून हा भाग गाळला आहे.)

७ सोव्हियटनें म्हणजे बोलशेव्हिकच्या सरकारनें स्वार्थी व बोलशेव्हिकांना अमान्य असणाऱ्या अपराधासाठीं नागरिकत्वाचे हक्क काढून घेतले असलेले लोकः—

या सात प्रकारच्या लोकांचे मतदानाचे व प्रतिनिधीत्वाचे हक्क सोव्हियट सरकारनें काढून घेतले आहेत. याचा स्पष्ट अर्थ आहे कीं बोलशेव्हिक म्हणून अुत्पन्न केलेल्या मताच्या व संस्कृतींच्याच लोकांना रशियांत खऱ्या रशियनांचें हक्क राहतील. अितरांना नाहींत. अितर देशांत जसें परकीय अल्पसंख्याकांना आपापल्या अंतर्गत व्यवहारांत स्वरक्षणाचें स्वातंत्र्य ठेवून राष्ट्रीयकार्यांत समाविष्ट होतां येतें; त्याप्रमाणें रशियांत अुदार मत नाहीं. रशियांत अेकमतवाद, अेकमतवादीता व अेकमतवादी लोक यानांच काय तें खऱ्या रशियनांप्रमाणें रहाणें शक्य आहे. अितरमतांचे वा विभिन्न पंथाचे लोकांना रशियांत स्वातंत्र्य व सुरक्षितता नाहीं. अितर देशांत बहुसंख्याक राष्ट्रीयांमध्यें अल्पसंख्याकांचे विभिन्नतेला थोडीशी जागा ठेवलेली आहे. पण रशियांत बोलशेव्हिकमती लोक हे अेकंदर रशियन लोकसंख्येच्या प्रमाणानें शेंकडा २० ते २५ पेक्षां जास्त नाहींत. तरीहि सत्ताधारी होअून हे अल्पसंख्य स्वतःला बोलशेव्हिक राष्ट्रीय म्हणवून घेअून त्यांनीं त्या व्यतिरिक्त $\frac{3}{4}$ बहुसंख्याक लोकांना अितर देशांतल्या अल्पसंख्याकांना मिळणाऱ्या राष्ट्रीयत्वालासुद्धां पारखे करून ठेवलेले आहेत.

७ **पोलंडः**—हें प्रजासत्ताक राज्य आहे. तेथील अध्यक्षाला जी शपथ ध्यावी लागते ती येणेंप्रमाणें;—" त्या पवित्रत्रयींमध्यें (Holy Trinity) अेकत्वानें असणाऱ्या सर्व शक्तिमान् परमेश्वराची व पोलंड राष्ट्राची शपथ घेअून.........तो परमेश्वर आणि त्या ( ख्राअिस्ट ) देवपुत्राची पवित्र हुतात्मता मला साह्य करो. " या शपथेकडे पाहिलें असतां ही रोमन-क्याथॉलिक मताची आहे हें स्पष्ट कळण्यासारखें आहे. अितर मताचे लोक ही शपथ कधींहि घेणार नाहींत. व अध्यक्षत्वाची शपथ तर राज्यघटनेनें वरील प्रकारची ठरवली आहे. तेव्हां पोलंडचा अध्यक्ष रोमन क्याथॉलिक होअूं शकतो—अन्य मताचा कोणी होअूं शकत नाहीं असेंच अन्य शब्दांत ठरविल्यासारखें हें आहे. पोलंडच्या रोमन क्याथॉलिक

मतावेगळ्या अितर धर्ममतवाल्यास, तो नागरिक असला तरी, अध्यक्ष होण्याचा हक्क नाहीं. हें यांत विशेष आहे. पोलंडच्या राज्यघटनेंत रोमन क्याथॉलिक धर्ममत राज्यसत्तेनें परिपालित, संरक्षित व स्वीकृत असें आहे, हे निराळें सांगण्याची अवश्यकता नाहीं. अितकेंच नाहीं तर राज्यघटना नियमांमध्यें " या राष्ट्रांत अतिरिक्त बहुसंख्या रोमन क्याथॉलिकांची आहे. यासाठीं हें मत राज्याचें मत म्हणून अनुज्ञा-प्राप्त धर्ममतवाल्यांमध्यें मुख्य जागा व स्थिति धरून आहे व राहील " नियम ११६ मध्यें असें स्पष्ट केलेले आहे कीं, " आज नोंदल्या गेलेल्या धर्ममताव्यतिरिक्त अितर नव्या मताच्या स्थापनेला जनतासंमत नीतिविचार व सार्वजनिक सुव्यवस्था याला बाध येणार नसेल तर राजसत्तानुज्ञा मिळावयाला प्रत्यवाय नसावा. " याचा अर्थ वाटेल त्या मतवादाला राहूं देणें वा अिच्छा नसेल त्याला नाहीं म्हणणें हें रोमन क्याथॉलिकांच्या हातीं आहे. हें येथें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

**पोलंडमध्यें अितके अेकमेव महत्त्व देण्याअितकी बहुसंख्या म्हटली म्हणजेच शेंकडा ६९ प्रमाणांत आहे. म्हणून राज्यसत्ता सर्वस्वी त्या शेंकडा ६९ लोकांच्या हातांत आहे, व तें कृत्य सुधारलेल्या देशांत स्वीकृत व युरोपीय प्रजातंत्राभिमानी सुधारलेल्या राष्ट्रांना मान्य असें आहे. हें विशेष महत्वाचें व म्हणून ध्यानांत ठेवण्यायोग्य आहे.** तर मग ज्या हिंदुस्थानांत जेथें शेंकडा ७५ हिंदु आहेत तेथें हिंदुंचेंच राज्य पाहिजे असें म्हणणें अन्याय्य, रानटी, व स्वार्थसाधु दुष्टपणाचें आहे असें स्वकीय मूर्खशिरोमणी अथवा स्वार्थसाधू परकीय भोंदू यांवांचून दुसरा कोण म्हणूं शकेल बरें !

**८ डयांझिगनगरः**—जर्मन युद्धानंतर ड्यांझिग नगर हे जर्मननगर जर्मनीपासून छिनावून घेअून अंतर्राष्ट्रीय करण्यांत आलें. तेथील व्यवस्था सर्वराष्ट्रीय प्रतिनिधींच्या हातांत आहे. तेथील ध्वजावरील चिन्हें म्हणजे तांबड्या पृष्ठभूवर डाव्या हातांत कांठीशीं समांतर भागांत अेकाखालीं अेक असे दोन पांढरे 'क्रॉस' आहेत ( क्रॉस हें चिन्ह खिस्तीधर्ममताचें आहे हें वाचकांचे ध्यानी येअीलच. ) त्या दोन क्रॉसवर 'सोनेरी मुकुट' चिन्ह आहे. त्या स्थानीं अंतर्राष्ट्रीय सत्ता असली तरीहि त्या स्थलीच्या जर्मनबहुसंख्या-

जर्मन भाषाच राज्य भाषा ठरवून 'पोलिश' अल्पसंख्याकांच्या अंतर्गत
ी व्यवहारापुरती अुरू दिली आहे. नियम१९ अन्वयें रविवार व अितर
ासण 'अधिकृतसण' स्वराज्यसंमत म्हणून ठेवलेले आहेत.

अेस्थोनियाः—राज्यांतील शांतता व शिस्त बिघडणार नाहीं अशा-
 अल्पसंख्याकांनी आपली धर्ममतीय कृत्यें व आपल्या अंतर्गत
य संस्था आदिक चालू द्याव्यात. अल्पसंख्याकांनीं आपल्या घराअू
ारांत आपली भाषा निश्चित मनें ठेवावी. **थोड्या संख्येच्या स्थळीं
ुष्कळ संख्येच्या स्थळीं अल्पसंख्याक जातीच्या लोकांनीं
य व राजकीय व्यवहारांत राष्ट्र-भाषाच अुपयोजिली पाहिजे.
ील अल्पसंख्याक लोक शेंकडा ३०।३५ चे वर आहेत व
ा भागांत ते बहुसंख्येंत आहेत तरीहि राष्ट्रीय व्यवहारांत राष्ट्र
ाच अुपयोजणें त्यांना भाग पडलें** आहे.) व हें सर्व राष्ट्रसंघाच्या
ानुसार चालू आहे. या न्यायानें हिंदुस्थानभर हिंदी राष्ट्रभाषाच
ा पाहिजे. मग बंगाल, पंजाब आदिकमध्यें मुसलमान बहुसंख्य असले
अेकंदर हिंदुस्थान देशदृष्टीनें ते अल्पसंख्य असलेमुळें जेथें तें बहु-
ा आहेत तेथेंहि त्यांना हिंदी-राष्ट्रभाषाच स्वीकारली पाहिजे असाच
तिक-न्याय निर्वाळा देअील यांत तिळमात्र शंका नाहीं

१० फिनलंडः—येथें ख्रिस्तीधर्म मतच आहे. येथील अिव्ह्यांजेलिकल
रियन ख्रिस्ती अुपमताच्या सर्व धार्मिक संस्था व त्यांची धर्ममत-मंदिरें
ादि त्यांच्या धार्मिक विध्यनुसारच चालतील त्यांत राज्यसंस्थेचा हात
शकणार नाहीं अशी योजना आहे.

---

# पूर्वार्धाचा समारोप.

— × —

आतांपर्यंत विवेचन झालेल्या पूर्वार्धांत आपल्या या सर्व विवेचनांमध्यें
ाल्याला काय दिसून आलें तें पहाणें आहे. आरंभीं राष्ट्राचे अविभाज-
घटक कोणते हें सांगून तें विधान कितपत सत्य आहे व त्या विधा-
ा निरनिराळ्या बाजूनें पुष्टि मिळत आहे किंवा तें विधान चुकीचें

ठरत आहे हें पहाण्याकरितां पहिल्यानें अिंग्लिश कोशकारांचे अर्थ देअून नंतर निरनिराळे पाश्चात्य राजकारणशास्त्री राष्टाचे कोणते कोणते घटक ठरवितात. व त्यांच्या सर्वांच्या मताच्या निष्कर्षांचे निकषावर (कसोटीवर) आरंभीचीं दिलेली व्याख्या कशी निरपवाद खरी ठरते हें पाहिलें.

नंतर पौर्वात्य म्हणजे भारतीय राजकारण शास्त्रकारांची राष्ट्र शब्दाची व्याख्या सांपडतें कां हें पाहून त्यांनीं देश, जाती, राष्ट्र या शब्दांच्या दिलेल्या व्याख्यांच्या व तदंगभूत केलेल्या वर्णनात्मक विधानांच्या दृष्टीनें विचार करतां आरंभींची राष्ट्र शब्दाची व्याख्या पौर्वात्य राजकारण शास्त्र-संमत कशी आहे हें ध्यानीं घेतलें.

प्रत्यक्ष व्यवहार्यतेचा विचार करण्यासाठीं बसलेल्या राष्ट्रसंघाच्या मतानें अुपलब्ध झालेले राष्ट्र–घटक व राष्ट्रसंघापूर्वीं जागतिक विचारकांच्या व तदनुषंगें मनुष्य जातीच्या समजाचा विचार करून सर्व सामान्य जागतिक कल्पना–दृष्टया राष्ट्र–घटकांसंबंधींची समजूत, यांच्या परीक्षणानेंहि प्रारंभींच्या राष्ट्रघटक व्याख्येचीच परिपुष्टी झालेली पाहिली.

शेवटीं अिंग्लंडच्या व अल्पसंख्याकांचा प्रश्न असलेल्या जगांतील कांहीं प्रमुख राष्ट्रांच्या राष्ट्रघटनांमधील राष्ट्रकल्पनेंत आपल्या व्याख्येंतील घट-कांचा समावेश राज्यघटनाकाळीं होता हें निश्चयानें ठरवितां येअील, अशीं प्रमाणें मिळून आपली पहिली व्याख्या दृढतम व अमान्यता देण्याला सर्वथैव अशक्य अशी ठरली.

याप्रमाणें युरोपीय कोशकार ( अिंग्लिश कोशाप्रमाणेंच अितर युरोपीय भाषा कोशकारांच्या व्याख्या आहेत,) युरोपीय राजकारणशास्त्री, पौर्वात्य-भारतीय राजकारण–शास्त्रकार, सर्व जगाची समजूत, जागतिक राष्ट्रसंघ मान्यता, व जगांतील सुधारलेले म्हणून गणले गेलेले सर्व देश, राष्ट्र शब्दाची व्याख्या अेकमुखानें, निश्चयानें, व निरपवादरीत्या सांगतात कीं:—

**“ राष्ट्राचे–देश, जाती, धर्म, संस्कृति व भाषा हे प्रमुख घटक आहेत.**

या घटकांच्या विरहित राष्ट्राची कल्पनाच करतां येणें अशक्य आहे.

---

( अुत्तरार्ध )

# हिंदुस्थानचें राष्ट्रस्वरूप.



जगांत मनुष्यांना व्यक्तिशः वा समुदायशः पुढें दिलेल्या दोन केंद्रांपैकीं कोणतेंतरी अेक केंद्र आपल्या भोंवतीं फिरावयाला लावीत असतें. आणि त्यांपैकीं अेक केंद्र असें आहे कीं, जगांतील फार मोठा भाग–किंबहुना बहुतेक भाग–त्याच अेका केंद्राभोंवतीं फिरत असतो. दुसऱ्या केंद्राभोंवतीं प्रदक्षिणा घालण्याचें भाग्य श्रेष्ठ पुरुषानांच लाभूं शकतें. वास्तविकतः विचार करतांना त्या अेका केंद्राच्या दृष्टीनेंच विचार केला पाहिजे. ‘ स्वत्व ’ व ‘ सत्त्व ’ हीं तीं जगताचीं दोन भ्रमण केंद्रें आहेत. जगाच्या आक्रमांत येणारा, सर्व जगताला आकर्षिणारा व दुसऱ्या केंद्राकडे चित्त वेधलें गेलेल्या श्रेष्ठांच्याहि मागचा न सुटणारा असा ‘ स्वत्त्व ’ अेवढाच अेक केंद्र आहे म्हटलें तरी चालेल. श्रेष्ठांना जो केंद्र ओढूं शकतो व सामान्यांना दृष्टीपथांत घ्यावयाला अशक्य असतो असा जो ‘ सत्त्व ’ केंद्र आहे त्यांतसुद्धां श्रेष्ठांचें मन त्या सत्त्वांतच आपलें ‘ स्वत्त्व ’ आहे असें ओळखूं शकतें, तेव्हांच त्या महान् केंद्राकडे त्यांचें तें मन ओढलें जातें. ‘ स्वत्त्व ’ व ‘ सत्त्व ’ या दोन केंद्रांचा अर्थ बहुश्रुत वाचकांच्या तेव्हांच ध्यानांत येअील. पण अगदीं नवीन वाचकासाठीं त्यांचे अर्थ सुस्पष्टपणें मांडणें अवश्यक वाटतें.

जगांत अुत्पन्न होणारा प्रत्येक जीव स्वतःचा ‘मी’ बरोबर घेअून जन्म घेतो. सजीव सृष्टीमध्यें हा ‘ मी ’ सर्वत्र निरपवादरीत्या भरलेला आहे–अेकहि जीव या ‘ मी ’ विना सांपडणें अस्वाभाविक व सृष्टिक्रमाविरुद्ध आहे. त्याचप्रमाणें स्थावर, जंगम सृष्टींतसुद्धां–जडपदार्थांत व वनस्पति–वर्गांतहि–या ‘ मी ’चें अस्तित्व निरपवादपणें सर्वत्र भरलेलें आहे. हें सर्व अवाढव्य विश्व या विश्वव्यापी ‘ मी ’ची व्यक्ती वा प्रकटता आहे. विश्वांतील प्रत्येक पदार्थमात्रांना–मग तो सजीव असो कीं निर्जीव असो, त्या सर्व पदार्थ-

मात्रांत भरलेला हा 'मी' आपल्याभोंवतीं 'मी'च्या कक्षेंत येण्यासारख्या सर्व वस्तूंमधून आपल्याला प्रियकर वा हितकर अशा वस्तूंशीं ममत्वाचा संबंध जोडून 'मी' व 'माझें' या कैचीत पकडलें जाणारें असें क्षेत्र बनवतो व त्याला तो 'स्वत्व' रूपानें चिकटून व चिकटवून घेत आजीव आयुष्यक्रम व्यतीत करीत असतो; या 'स्वत्वा'च्या कचाट्यांतून तो 'मी' सुटत नाहीं. अथवा तो 'मी' त्या 'स्वत्वा'ला आपल्या कचाट्यांतून सुटूं देत नाहीं. कारण 'स्वत्वा'च्या कक्षेंतून बाहेर जाण्याचा प्रयत्न करणें म्हणजे या 'मी'च्या नाशाला प्रवृत्त झाल्यासारखें होतें. 'मी'चा नाश होणें तर निसर्गविरुद्ध, अस्वाभाविक व सर्वथैव अशक्य होय. पण त्या स्वत्वाच्या कचाट्यांतून सुटण्याचा प्रयत्न करण्यांत स्वतः निराधार बनून कष्ट व दुःख भोगाचा असीम डोंगर त्याचेवर कोसळतो. हा 'मी' आपले 'स्वत्व'–क्षेत्र बदलूं शकेल, आज ज्याला 'स्वत्व' मानतो तें सोडून–त्याचा त्याग करून–दुसऱ्या कोठल्यातरी ठिकाणीं 'स्वत्वा'ची प्रतिष्ठापना करील पण 'स्वत्वा' वांचून या 'मी'ला रहाणें या जगांत शक्यच नाहीं. या 'मी' वर 'स्वत्वा'चा अेवढा पगडा आहे कीं, हा 'मी' जें जें चांगलें तेथें तेथें माझें 'स्वत्व' असें न मानतां जें जें 'स्वत्व' तें तें चांगलें असाच सिद्धांत धरून बसतो. जें जें चांगलें, जें कल्याणकारी, जें सत्य तेंच माझें 'स्वत्व' ही ओळखण जीवनाची अुन्नततम अवस्था होअीपर्यंत अथवा दुसऱ्या शब्दांत बोलावयाचें तर 'सत्त्व' यालाच 'स्वत्व' समजणें हें कल्याणकारी, हितकर व आनंददायी आहे हें पटवीपर्यंत वा पटेपर्यंत जीवमात्र 'स्वत्वा'च्या सामान्य कक्षेंतच फिरत असतो, आणि श्रेष्ठत्त्वप्राप्ति होअून 'सत्त्वां'तील 'स्वत्व' ओळखीपर्यंत 'स्वत्वा'च्या कक्षांमधूनच फिरत राहण्यांत त्याची अुन्नती होत असते.

जीवकोटींत मनुष्यप्राणी श्रेष्ठ आहे, हें सिद्ध करण्याकरितां युक्तिवादाचे जुंबाडे बांधावयाला नकोत. तो आपल्या 'स्वत्वा' च्या कक्षेनें केवळ स्थल ( Space ) कल्पनेचा समावेश करूनच थांबून रहात नाहीं. मनुष्येतर सर्व प्राण्यांना ते ज्या भागांत रहात असतील व जेथें त्यांचा निर्वाह होत असेल तेवढयांतील अवश्यकीय भूभागांतच त्यांच्या स्वत्वाच्या कक्षा

ठरतात. त्यापलीकडे त्यांची कल्पना जात नाहीं. पण मनुष्याचें तसें नाहीं. मनुष्य स्थल वा देश, काल व गुण या तीन क्षेत्रांत आपल्या ‘ स्वत्त्वा ’-चा पसारा पसरतो. मनुष्य हा व्यक्तिशः पुरणाऱ्या स्थलापुरतांच न थांबतां मनुष्यवर्गांमध्यें देश-भेदाप्रमाणेंच संस्कृति-भेदानेंहि विभिन्नपणें अुत्पन्न झालेल्या गुणविशेषाच्या जातीपर्यंत तो आपल्या स्वत्त्वाची कक्षा पसरवितो. अशा ‘मी’ च्या समुदायानें बनलेल्या जाती आपल्या देशाप्रमाणेंच आपल्या भूतकालीन संस्कृतीचा अभिमान धरून भविष्यकालीन प्रवर्धनेच्छेनें, वर्तमानकालीं अुद्यमशील होत असतात. प्रत्येक जातींतील मनुष्य-समूह रहात असलेल्या देशांतील प्रत्येकजण गतकालाच्या साभिमान स्मरणासह भविष्यकालीन आकांक्षांच्या प्रेरणेनें सद्यःकालांत–अितक्या या विस्तृत क्षेत्रांतील–‘स्वत्वा’ भोंवतीं फिरत असतो. आपल्या वस्तीचा देश, त्या देशांत जातीय दृष्टीनें राहत आल्यापासून सर्व प्रकारांच्या व गोष्टींच्या संस्कार समुदायानें बनलेल्या संस्कृतीचा भूतकाळ, भविष्यकालीन आशा-प्रतीकें व तदर्थ आंखलेल्या कार्यक्रमांच्या मर्यादा या सर्वांचा समरसतेनें झालेला समावेश त्या मनुष्यसमूहाच्या ‘स्वत्वा’च्या पोटांत झालेला असतो. या महान स्वत्वाची भावना कमी अधिक मानानें स्पष्ट वा अंधुक, प्रबल वा निर्बल, कार्यक्षम वा अक्षम स्थितींत पण निश्चितरूपानें प्रत्येक मनुष्य-समूहातलि घटकांत वास्तव्य करीत असते, यांत तिळमात्र संदेह नाहीं. या गोष्टीचें प्रत्यंतर पदोपदीं येतें. अेखादें सामान्य अुदाहरण दिल्यानें सुद्धां या गोष्टीची सर्वदेशीय व्याप्ति लक्षांत येअील. व्यक्तिगत हीन स्वार्थाला बळी पडून या विस्तृत स्वत्वकक्षेविरुद्ध गेलेला जातिद्रोही–वा देशद्रोही-मनुष्य जर सर्वस्वीं परकीय समाजांत जाअून तेथें त्याच्या जातीची स्तुति अैकूं लागला. तर “ मी त्याच जातीचा आहे ” म्हणून त्या मोठेपणाचा तो वाटा मिळवूं पाहील. अथवा आपल्या जातीची निंदा अैकल्यावर तो कितीहि पतित व लाळघोट्या वृत्तीचा असला तरी त्याला मनाच्या खोल खबदडींत वाअीट वाटल्यावांचुन रहाणार नाहीं. पर-कीयांच्या निंदेंत जमा मनष्य आनंद अुपभोगतो तसा आनंद त्याला

स्वकीयनिंदा अैकून निश्चित होणार नाहीं. हें अेकच अुदाहरण मनुष्य स्वभावाचें मौलिक स्वरूप समजावयाला पुरेसें आहे.

मनुष्य हा समाजप्रिय आहे. तो तसा कां आहे याचा अुहापोह येथें करण्याचें कारण नाहीं. आणि तो तसा आहे यांत कोणास शंकाहि येणें शक्य नाहीं. चोहोंबाजुचें दृश्य तेंच सत्य पटवीत डोळ्यांपुढें सतत अुभें आहे. समाजांतील घटक असलेल्या प्रत्येक व्यक्तीला आपल्या स्वत्वाला चिकटून राहाण्याचा हक्क आहे, स्वत्ववर्धन करण्याला स्वातंत्र्य आहे, स्वत्वावर प्रेम असणें स्वाभाविक आहे. परंतु तो घटक—तो मनुष्य—आपल्या सामान्य स्वत्वावरील प्रेमासाठीं—दुसऱ्याच्या स्वत्वाचें अतिक्रमण करूं लागला. दुसऱ्याचे स्वत्वाला हानि पोचवूं लागला, दुसऱ्याचें स्वत्त्व हिसकावून घेण्यास प्रवृत्त झाला तर मात्र समाजस्थैर्याच्या अनुल्लंघनीय मर्यादा फोडून तो जात आहे असें समजून त्याच्या अपराधाच्या कमी अधिक अपराधाच्या स्वरूपा-प्रमाणें तो सामान्य दंडापासून तों वधदंडापर्यंत पात्र ठरूं शकतो. तोच न्याय व तीच मर्यादा समाजासमाजांच्या परस्परव्यवहाराला सुद्धां लावली पाहिजे. हें जगांमध्यें सर्वमान्य असलेलें तत्व आहे. एखादा परस्वापहारी मनुष्य दुसऱ्याचा अपहार करते वेळीं मी अपहार करीत आहे हें मान्य करावयास जसा सिद्ध नसतो त्याचप्रमाणें अतिक्रम करणारे समाज स्वतः-च्या सुस्पष्ट अपराधांवरसुद्धा चांगल्या व न्याय्य स्वरूपाचें पांघरूण घालूं पहातात. ही अेकच गोष्ट समाजनीति—दृष्ट्या परस्वापहार, मग तो व्यक्तिगत असो वा समाजगत असो, हा अपराध आहे असें आक्रमक निश्चितपणें जाणत असतो, हें पटवून घ्यावयास पर्याप्त आहे. जगांमध्यें अेका धर्ममताचे लोक दुसऱ्या धर्ममतावर, अेका जातीचे लोक दुसऱ्या जातीवर, अेका देशांतील लोक दुसऱ्या देशांतील लोकांवर, जेव्हां आक्रमणें करतात तेव्हां त्याला परस्वापहाराचें नांव कधींहि देत नाहींत. प्रत्येक वेळीं आपल्या आक्रमणाला "धर्मप्रसार" "रानटी जातीमध्यें सुधारणा प्रसार" "लहान राष्ट्रांचें संरक्षण करून 'आक्रमक' देशाला चांगलीच थप्पड देत न्यायप्रसार" इत्यादि गोंडस नांवें देत परकीय धर्म, जातीच्या जाती, देशचे देश, धुळीस मिळविणाऱ्या आक्रमकांचीं अुदाहरणें जगाचे अितिहासाला अगदीं ताज्या आठवणी पर्यंत ओळखीचीं आहेत. हें नुकतेंच वाचलेलें वाक्य वाचतांच "धर्मप्रसार"

नावांखालीं मुसलमानांचें परकीय लोकांवर अतिक्रमण होअुन जातीच्या-जाती, देशाचेदेश, मरण वेदनांनीं आक्रांत करीत असलेले अितिहास दृष्टीला दिसूं लागतील. रानटी जातीवरील आक्रमणाचा अुल्लेख वाचतांच युरोपीयन् लोकांनीं अमेरिका, आफ्रिका भाग, आस्ट्रेलिया आदिकस्थळीं त्यांच्या राक्षसी कपटघाटवांनीं व क्रूरतेनें निर्वंश केलेल्या त्या त्या स्थानाच्या मूल-जातियांचीं संततभुतें डोळ्यांसमोर थैमान घालूं लागतील. जगांत न्याय-प्रसारार्थ म्हणून विशेषतः अिंग्लंडनें घडवून आणलेल्या जर्मन महायुद्धांतील संहारग्रस्त देशभक्तांचीं शवें लाखांनीं पसरलेलीं दिसतील व विविध आप-त्तींनीं गांजलेल्या कोट्यावधींची चोहोकडे दिसून येणारी दुःस्थिती निरी-क्षकांचीं मनें आर्द्र करून सोडील. व्यक्तीव्यक्तींच्या कलहांत प्रत्येक देशांतील राज्ययंत्रें न्यायालयें स्थापून तत्रस्थ अपराधदंडनाची व्यवस्था करीत आहेत. पण जातीजातींच्या वा राष्ट्राराष्ट्रांच्या कलहांत सर्व जगावर स्वामित्व गाजवणारे व सर्व जगाकरितां न्यायालय स्थापून व निरपेक्षपणें न्याय निवडून अन्यायांसाठीं अपराध्याला दंडित करणारे जगन्नियामक राज्य-यंत्र निर्माण झालें नाहीं. कधींहि निर्माण होणें शक्य नाहीं. अशी स्थिति आहे म्हणून प्रत्येक जातीनें वा राष्ट्रानें आपणांवरील अन्यायाचें परिमार्जन करण्यास स्वतःच शस्त्रहस्त, सावधान व तत्पर राहिलें पाहिजे. त्यांवाचून गत्यंतर नाहीं. व्यक्तीला असो वा व्यक्तीसमूहाला असो आपल्या स्वत्वाचें संरक्षण करण्याचा वैश्विक न्यायानें पूर्ण हक्क आहे; अितकेंच नव्हे तर सृष्टी-क्रम, निसर्ग, व सर्व विश्वव्यापी असलेल्या 'मी'चा हा नैसर्गिक धर्म म्हणजे कर्तव्य, अपरिहार्य, अनिवार्य व निरपवाद आहे. परस्वापहार व तदर्थ पराक्रमण हा अत्यंत भयंकर अपराध म्हणून जितका व जसा त्याज्य आहे आणि अितरांकडून दंडनीय आहे, त्याचप्रमाणें स्वत्वसंरक्षणार्थ सतत कटिबद्ध न राहतां त्याविषयीं अुदास, निष्क्रिय, व पराङ्मुख होणें हें अनैसर्गिक व म्हणून सृष्टीनियमानुसार विनाशनीय आणि सर्व जगतांकडून तितकें व तसेंच निंदनीय ठरेल यांत तिलमात्र शंका नाहीं: ही स्वत्वसं-रक्षणाची कर्तव्यपराङ्मुखता म्हणजे आत्महत्या करणें होय आणि आत्महत्या हें सर्व जगताला ठाअुक असलेलें महापातक आहे.

हा सर्व विचार करतां हिंदुस्थानचें राष्ट्र सर्व प्रमुख म्हणून दृष्टीपुढें

अुभें राहतें. हिंदुस्थान हा आपला देश, ही आपणां हिंदूंची मातृभूमि व पुण्य भूमि आहे. अितिहासाला अज्ञात असलेल्या कालापासून—ज्याचा आ म्हणजे आरंभ कळत नाहीं अशा अनादिकालापासून—आपण हिंदु ये निवसत आलो आहोंत. सर्व जगाला थक्क करणारें तत्त्वज्ञान येथें आपल्य पूर्व ऋषींनीं आणि महामुनींनीं मनुष्यजातीच्या कल्याणार्थ या आपल्य हिंदुस्थानांत प्रकाशित केलें. सर्व जगांतील सर्व मानवांना आपापल्या मान सिक अुन्नतीचे अनुसाराच्या स्वाभाविक योग्यतेप्रमाणें आत्मकल्याणाची व अैहिक अभ्युदयाची आनंददायी व सुखदायी छाया देणारा धर्मवृक्ष-कल्पवृक्ष-या आपल्या परमपावन हिंदुस्थानांतच आज हजारो पिढ्यांच्या असंख्य जीवांन छाया देतां झाला; या आपल्या देवप्रिय हिंदु जातीनें सर्व जगतांत अत्यंत सुंदर, सुगठित व संस्कारबद्ध म्हणून 'संस्कृत' असें नांवानें शोभणारी व जिला देवभाषा म्हणावी अशा योग्यतेची अतिश्रेष्ठ भाषा निर्माण केली; स्वरशास्त्राच्या नियमानुसार हिंदू जातियांनीं वर्णमाला—शास्त्रीयपद्धतीवर बसवलेली वर्णमाला—शोधून काढली कीं, ज्या वर्णमालेशीं शास्त्रीयदृष्ट्या शतांशहि बरोबरी करणारी वर्णमाला दुसऱ्या कोणत्याहि जातीनीं आज-पर्यंत निर्माण केलेली नाहीं. संस्कृत व्याकरणशास्त्र जगांतील व्याकरणशास्त्रांत अद्वितीय ठरलें आहे; गायनशास्त्र, नृत्यशास्त्र, वादनशास्त्र, तंतुवाद्यशास्त्र, अित्यादि शास्त्रें आपल्या आर्यावर्तांत—अद्यापहि आश्चर्यानें दिङ्मूढ व्हावें अशी अुत्कृष्टतमतेची सीमा या हिंदूजातीयांच्या हस्तें गांठतीं झाली. अंकगणित—बीजगणित—रेखागणित ही हिंदुजातियांनीं जगाला दिलीं; युद्धकला व अस्त्रविद्येंत ही हिंदभू पराकाष्ठेच्या प्रगतीला गांठणारी टरलेली होती, हें आपल्या अिकडील व परकीय ग्रंथलेखकांच्या ग्रंथांत ग्रथित झालेलें सांपडतें. सर्व जगांत मनुष्यप्राणी श्रेष्ठ आणि मनुष्यांत मनबुद्धि श्रेष्ठ. त्या मनबुद्धीच्या विकसनांत व अुदात्ततमतेंत हिंदुराष्ट्राची अुच्चता अितकी गगनभेदी ठरली कीं, त्या "अुंचीकडे अितर जातीयांनीं आश्चर्यानें मुग्ध होअून बघत रहावें; अुत्कृष्ट शील, सत्यनिष्ठा, औदार्य, प्रामाणिकता, सुधी-रता, सत्त्वशीलता, आदिक मानवी अंतःकरणाच्या व बुद्धीच्या श्रेष्ठवृत्ति व शक्ति कोणत्या देशांत पूर्णावस्थेला पोचल्या आहेत ? सृष्टींतील व संसारांतील अत्यंत महत्त्वाच्या गूढ प्रमेयांचा सूक्ष्म व खोल विचार कोठें झाला आहे ?

प्लेटो, क्यांट, शोपेनहोर, अित्यादि पाश्चात्य तत्त्ववेत्यांच्या ग्रंथांचें परिशीलन केलें असतांहि समाधान न होतां ज्या ग्रंथाच्या परिशीलनानें गूढातिगूढ प्रमेयांचा स्पष्ट अुलगडा व्हावा असें महान् तत्त्वज्ञानाचें श्रेष्ठ ग्रंथ कोठें असतील ? असे प्रश्न मला कोणी विचारील तर मी त्यांस हिंदुस्थान–हिंदुस्थान–हिंदुस्थान ! ! ! असें अेकच अुत्तर देअीन " असें मॅक्समुल्लरला म्हणावें लागलें. येथें अेक अुतारा देण्याचा मोह आवरत नाहीं. कारण तो अुतारा या हिंदुराष्ट्राच्या महत्तेची यथार्थ जाणीव फार सुंदर रीतीनें देणारा आहे. मूल अुताऱ्यांत जेथें जेथें हिंदुजाती असें आहे तेथें तेथें जाति शब्दाचे स्थानीं राष्ट्र शब्द असणें अधिक अन्वर्थक वाटलें म्हणून 'जाती'चे स्थळीं 'राष्ट्र' शब्द देण्याचाच फरक करून तो अुतारा जशाचा तसाच येथें वाचकांसाठीं देत आहोंत.

" सांप्रत पराक्रमानें, बुद्धिवैभवानें, राजनीतिकुशलतेनें व सामर्थ्यानें गर्वोद्धत झालेल्या झाडून साऱ्या जातींचे, वा ज्या जाती अितिहासगम्य पूर्वकालांत या नाहीं त्या गुणानें व श्रेष्ठत्वानें साम्राज्यें भोगून चमकून विझून गेल्या त्या जातींचे पूर्वज, या सनातन हिंदुराष्ट्रानें नागवेअुघडे अंगाला रंग लावून फिरत असतांना पाहिलेले त्याला ताजेपणानें आठवत आहेत; जगांतील कांहीं जातींचें वय शेकड्यांनीं तर कांहींचें अर्ध सहस्रांनीं पण मोजता येतें, परंतु कालाच्या जणूं पितृस्थानीं शोभणाऱ्या या हिंदुराष्ट्रनें कालाचें मोजमाप आपल्या स्वतःच्या वयोगणनेला लंगडें पाडिलें. याच्या संस्कृतीच्या, सामर्थ्याच्या, वैभवाच्या व महत्तमतेच्या कालाचा आरंभ अितिहासास माहीत नाहीं. या राष्ट्राच्या अितिहासाचें पहिलें पान सांपडत नाहीं; याचें आयुष्य मोजण्यासाठीं शतकांचे मानदंड मोडून जातात–हजारांचे मानदंड तोकडे पडतात, या राष्ट्रानें जगांतील सर्व धर्मपंथांना व मतांना जीवन दिलें; याचें तत्त्वज्ञान सर्व जगाच्या तत्त्वज्ञानाला खाकोटीस मारूनहि " अत्यत्तिष्ठत् दशांगुलम् " ( सर्वांनीं जें जें सांगितलें तें सर्व पूर्वीच सांगूनहि जें कोणी सांगितलें नाहीं वा सांगूं शकलें नाहीं तेंहि सांगून टाकून अितरांना सांगावयाला अधिक कांहीं ठेवलें नाहीं.) असें अतिसीमाव्यापी वा अनंतस्वरूपी होअून चकाकत आहे. जगांतील सर्व अुच्च संस्कृतीचे जन्मदानी हें राष्ट्र आहे, यानें अनेक राष्ट्रांचे

जन्ममृत्यु पाहिलें आहेत, हें राष्ट्र अतिप्राचीन असें असून याचे पाय पाताळाच्याहि अधःस्तलावर रोवलेले आहेत व याचें मस्तक सात स्वर्गांच्याहि वर ब्रह्म प्रदेशीं पोचलेलें आहे; रामकृष्णादि दिव्यपुरुष, आणि व्यासवाल्मिकादि महान् ऋषि याच्या मुकुटाला दीप्तिमंत करीत आहेत; कर्णभीमार्जुनासारखे नरमणि याच्या कंठांतील कंठमणि झालेले आहेत; धर्म–नल, अित्यादि प्राचीनकालीन, अशोक–चंद्रगुप्त–समुद्रगुप्तादिक मध्यकालीन सम्राटरत्नें ज्याचे कंठांत रत्नहारासारखे शोभतात; पृथ्वीराज–संग्रामसिंह, महाराणा प्रताप, छत्रपति शिवाजी–राजा छत्रसाल यांच्यासारखे महान् प्रतापी पुरुष जेथें या राष्ट्राचें सिंहासन अढळ व अचल ठेवण्यासाठीं सिद्ध होतात; वीर वैरागी गुरुगोविंदसिंह–छत्रपति संभाजी असल्या ज्ञात वा अज्ञात अशा दिव्य हुतात्म्यांनीं ज्याच्या मानरक्षणार्थ आपल्या प्राणांचे बली देअून त्याच्या नांवाचा प्रबल शत्रूंनासुद्धां धाक बसविला; याच्या पोटीं चाणक्य नानासारखें राज्यकार्यधुरंधर पुरुष कालारंभापासून निर्माण होअून याची राजकारणधुरा वहात आहेत; प्रसंगीं प्रसंगीं वीरभद्र, कार्तिकेय, श्रीराम, धृष्टद्युम्न, अर्जुन, सुग्रीव, विक्रम, शालिवाहन, चामुंडराय, वीर संग्रामसिंह, श्रीशिवराय, धनाजी, संभाजी, बाजीराव, भाअूसाहेब, माधवराव, तात्या टोपे, दुर्गा श्रीलक्ष्मीबाअी आदिक शतशः नव्हे सहस्रशः सेनाधिप सेनाचालना करीत या राष्ट्राचें गौरव व सामर्थ्य दिगंत पसरविण्यासाठीं तनमनधनानें तत्पर आहेत; ज्यांच्या दिव्य व महान तत्वग्राही बुद्धिमत्तेच्या तेजस्वितेकडे पाहतांच जगांतील तत्वज्ञांच्या बुद्धिमत्तेची दृष्टि दिपून जावी असे श्रीशंकराचार्यांसारखे अद्वितीय तत्ववेत्ते अनादिकालापासून सर्व जगाला तत्वज्ञानाचा प्रकाश देत आहेत; अलौकिक प्रेमानें आर्द्र व दैवी दयामयतेनें मूर्तिमंत दयेलाहि लाजविणाऱ्या ज्यांच्या हृदयानें 'आत्मवत्' सर्व भूतें जाणून जगांतील अखिल मानवी जातीलाच नव्हें तर यच्च्यावत् प्राणीमात्रांना आलिंगन देण्याकरितां आपले बाहु अुभारावे असे अतुल प्रेममय व अलौकिक दयाशील गौतमबुद्ध, जैनाचार्य महावीर अित्यादि महात्मे ज्याचे पोटीं अुत्पन्न होअून या हिंदुराष्ट्राचे हृदय विश्वव्यापी प्रेमरसानें कसें ओथंबलेलें व म्हणून सत्वगुणोत्कर्षानें कसें विभूषित झालेलें आहे हें सिद्ध केलें; आणि हें राष्ट्र अशा रीतीनें दिव्य विभूति, महान्ऋषि, पराक्रमीवीर, निर्भय

हुतात्मे, समर्थराजकार्यधुरंधर, तेजस्वी व पराक्रमी सेनाधिप प्रसवते इतकेंच नव्हे तर दैदीप्यमान, अलौकिक व अद्वितीय तत्ववेत्ते व प्रेममय महापुरुष यांना जन्म देते; सर्व शास्त्रांची खनी, कलाकौशल्याचें माहेरघर, सर्व सद्गुणांचें आगर व अखिल विद्यांचें उगमस्थान असें हें सनातन हिंदुराष्ट्र आहे " आणि असें हें हिंदुराष्ट्र आपलें आहे. मनुष्यजन्म दुर्लभ आणि त्यांतहि अशा अद्वितीय श्रेष्ठतासंपन्न राष्ट्रांत तो आपल्याला प्राप्त झालेला आहे हें आपलें महद्भाग्य आहे. पण त्या आपल्या दिव्य राष्ट्राची

## पुढें काय स्थिति झाली ?

हजार वर्षें झालीं; हिंदुस्थानांत जातिसंहारक व संस्कृतिविनाशक अशा मुस्लीममताचा पाय शिरला. हिंदुसंस्कृतीचें केंद्र, संस्कृतविद्येचें माहेरघर व धर्महृदय अशा श्रीकाशी क्षेत्रांतील श्रीकाशी–विश्वेश्वराचें मंदिर उध्वस्त होऊन त्याच मंदिराच्या भागाची बनलेली अवरंगजेबी मशीद; अयोध्येंत मुस्लीम मशिदींनें ग्रासलेलें श्रीराम–जन्मस्थान; शेंकडो स्थानींच्या मशिदींच्या बांधणींत दिसत असलेलीं हिंदु देवालयांची दगड-विटा-माती; मुसलमानी अत्याचारामुळें हजारो हजार ग्रंथसंपत्तीच्या झालेल्या स्वाहाकाराचा ऐतिहासिक उल्लेख; लक्षावधींनीं हिंदूजातीयांच्यां झालेलीं हत्याकांडें, व केवळ हिंदुमय असलेल्या भारतांतील हिंदूरक्तमांस असलेले हिंदूचेच वंशज कोट्यावधींनीं छलबल–अत्याचारादि द्वारा मुसलमान केले गेलेले, हीं दृश्यें हृदयाचें पाणी करून सोडणारीं आहेत!! सर्व जगाला ज्याचा प्राचीन काळीं दरारा वाटत होता व ज्याच्येकडे डोळे उचलून बघण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती, त्या जगच्छीर्षस्थानीं पूर्वीं शोभणाऱ्या या आपल्या हिंदुस्थानाची–हिंदुराष्ट्राची–अशी स्थिती कां झाली याचा ऊहापोह करण्याचें हें स्थल नव्हे व या स्थलीं त्याची आवश्यकताहि नाहीं, केवळ आज स्थिती काय आहे हेंच पहाणें आहे. हिंदुराष्ट्रभक्षी मुस्लीम आक्रमणाला मरणांतक धक्का देऊन हिंदूवीरता पुन्हां आपल्या पायावर उभी राहत या आपल्या हिंदूराष्ट्राला हिंदूसाम्राज्याचा मुकुट घालावयाला सिद्ध झाली तोंच अगदीं अनपेक्षित प्रकारचे व अनपेक्षित जातींचें आक्रमण या भारतावर हळूंहळूं स्वातंत्र्य भक्षक राहूची छाया पसरवूं लागलें होतें.

हिंदुराष्ट्राच्या स्वातंत्र्यहरणाचा प्रयत्न कुटिलनीतिविशारद व भेदकार्य-कुशल तीन युरोपीय राष्ट्रांनीं केला. व त्यांत अिंग्लिश राष्ट्र सर्वांवर ताण करीत यशस्वी होअून हिंदूराष्ट्राच्या मस्तकावर विभूषित होअूं घातलेला स्वातंत्र्यमुकुट हिरावून या आपल्या परमप्रिय हिंदुस्थान राष्ट्राला पारतंत्र्यांत ढकलतें झालें. या नव्या पारतंत्र्य चा पाया रोवला गेला नाहीं तोंच १८५७ मध्यें तो अुखडून टाकावा व हें हिंदूराष्ट्र पुन्हां स्वतंत्र व्हावें म्हणून श्रीमंत नानासाहेब पेशवे, सेनापति तात्या टोपे, रणपडिता महाराणी लक्ष्मीबाअी, वीरवर हुतात्मा कुमारसिंह आदिक हिंदुराष्ट्रभक्तांनीं, समान संकटग्रस्त दिल्लीच्या नामधारी बादशहानें बादशाहीच्या पुनरुज्जीवनाच्या आशेनें दिलेल्या साथीसह, घनघोर युद्ध मांडलें. पण हिंदूराष्ट्राच्या दुर्दैवानें तो प्रयत्न अयशस्वी होअून हिंदूराष्ट्र-स्वातंत्र्याच्या गळ्याभोवतीं अिंग्लिश सत्तापाश करकचून आवळला गेला आणि हिंदूराष्ट्र पुन्हां पारतंत्र्याच्या खाअींत ढकललें गेलें. येथपर्यंत हिंदूजातीच्या कुसव्यांत जन्म घेणाऱ्या राष्ट्र-भक्तांच्या मनांत या हिंदूराष्ट्राच्या स्वातंत्र्याचें व हिंदूपदसाम्राज्याच्या आकांक्षेचें वारें वाहणें थांबलें नव्हतें. 'हा हिंदुस्थान आपला हिंदूंचा देश आहे. आपण हिंदू या देशाचे धनी आहोंत व हिंदुधर्म-संस्कृती याची सुरक्षिति ठेवीत आपणांला हिंदुराष्ट्र या नात्यानें या जगांत स्वातंत्र्यानें विभूषित रहावयाचें आहे' ही जाणीव कधीं अस्फुट व कधीं प्रस्फुट रीतीनें पण जिवंत होती; परंतु

## यापुढें

हिंदूमहाच्या मनाची भूमिका बदलली. हिंदूंचा बुद्धिभेद केला गेला. हिंदूंच्या मनांतील स्वामित्वकल्पना मावळेल अशा शिक्षणाचे घोट हिंदूंतील बुद्धिमान वर्गाच्या घशांत ओतले जाअूं लागले. आत्मसन्मान व आत्मविश्वास नष्ट झाला आणि स्वतःचें अस्तित्व टिकविणें तर सतत दुसऱ्याच्या कृपेनें व दुसऱ्याच्या साह्यावर टिकेल अशी भ्रामक समजूत अुत्पन्न करून हिंदूमधील हिंदुत्वाभिमान धुळीला मिळविला गेला. हिंदू म्हणवून घेण्यांत लज्जा वाटूं लागली. 'आपण हिंदू आहोंत' हें म्हणवून घेतांना जणूं कांहीं आपण अेखाद्या कांहीं माननीय तत्त्वाचा अपमान करीत आहोंत असें

बाढून 'हिंदू' नांवाव्यतिरिक्त वाटेल त्या नांवानें संबोधलें जाण्यांत हिंदूनाम-करणापेक्षां अधिक श्रेष्ठता व धन्यता वाटूं लागली. याप्रमाणें मनोभ्रष्टता प्राप्त झाल्यावर "हा हिंदुस्थान देश आपला हिंदूंचा, आपली जाति–आपला धर्म–आपली संस्कृती व अद्वितीय आणि दिव्य अशा संस्कृतभाषेच्या अधिष्ठानावर अुभा असलेला अेककौटुंबिक असा आपला भाषासमूह मिळून आपण अेक–राष्ट्र आहोंत व या राष्ट्राचे अुद्धारार्थ आपण कटिबद्ध होअून स्वतःचे पायावर अुभें झालें पाहिजे" या वृत्ती आपोआपच लुप्त होअून दिसेनाशा झाल्या आहेत यांत आश्चर्य नाहीं. हिंदूराष्ट्र म्हणतांक्षणींच स्वार्थसाधू परकीयांच्या मनांत–" अरे ! आपण गिळंकृत करीत आणलेल्या मत्तेचा धनी जागा झाला कीं काय !" या प्रश्नानें धस्स होणें साहजिक आहे. पण आमच्या हिंदु मनांस देखील 'अेखादा महान अपराध करीत आहोंत कीं काय !' या भ्रमिष्ट कल्पनेनें कसेंसेंच होतें. 'आपण हिंदु या हिंदुस्थानचे धनी' हें विधान अैकतांच अेखादी अत्यंत अनिष्ट व अप्रिय गोष्ट अैकल्यासारखें होअून या वाक्यानें अुत्पन्न झालेला हिंदुस्थानचे स्वामित्वाचा भाव मनःपटलावरून पुसून टाकण्याची हिंदूंना अनिवार घाअी होते. हें विधान करणाऱ्याचा निंदा–निषेधादिकांनीं समाचार घेत त्या विधानश्रवणापासून झालेल्या पापाचें क्षालन करून टाकून हिंदूमन पुन्हां स्वतःला निष्पाप समजूं लागतें, अितका हिंदूंचा बुद्धिभेद झालेला आहे. राष्ट्रीयसभेचें खूळ म्हणून काढून हिंदूंचे हातीं द्यावें व त्या काळीं सर्व हिंदुस्थानभर असणाऱ्या असंतोषामुळें व हिंदूमधील नैसर्गिक स्वातंत्र्यप्रेमामुळें जें कांहीं क्रांतीचे प्रयत्न होत असतील वा होणें शक्य असतील त्या असंतोषाचा व तज्जन्य क्रांतिप्रयत्नेच्छेच्या अुष्णतेचा पारा किती चढला आहे हें हिंदुस्थानमधील अिंग्लिश राज्यकर्त्यांना समजावें म्हणून त्या वेळीं सर हेनरी कॉटन–वेडरबर्न आदिकांनीं हिंदुस्थानमधील कांहीं शिक्षित हिंदू हातीं धरून 'सेफ्टीव्हाल्व्ह' (कोंडल्या वाफेनें आवरण फोडून निघूं नये म्हणून तिचा वाढता जोर कमी करण्याकरतां बाहेर जाण्यासाठीं ठेवलेला लहानसा मार्ग) नात्यानें राष्ट्रीयसभा स्थापन केली. राष्ट्र म्हणजे काय असतें हें त्या धूर्त अिंग्लिशद्वयांना निश्चित ठाअूक होतें. तरीहि राष्ट्रीयसभा स्थापतेवेळीं हिंदुस्थान राष्ट्राचें

यथार्थस्वरूपानुरूप व्याख्या करून त्या दृष्टीनें राष्ट्रीयसभेची प्राणप्रतिष्ठा त्यांनीं केली नाहीं. अुलट 'राष्ट्र' कल्पना जितकी विपर्यस्त स्वरूपांत हिंदूलोक धारण करतील तितकी त्यांना हितकर व अुपकारक आहे हें जाणून (अिंग्लिश राज्यकारण्यांनीं) चुकूनसुद्धां त्या कल्पनेचा अुदय होअील अशी अुक्ति वा कृति होअूं दिली नाहीं. हिंदुस्थान स्वतंत्र करून पारतंत्र्याचा नाश करावा अेतदर्थ हिंदू सतत प्रयत्नशील राहणार हें त्यांच्या धूर्त राजकारणदृष्टीला निश्चित दिसत होतें. अशा स्थितींत हिंदुस्थानांतील अिंग्लिशवर्चस्वाला हिंदु जातींचें संघटन व समर्थीकरण हें केव्हांहि अिष्ट वाटणें शक्य नाहीं. हिंदुस्थानचे आम्हीं धनी आहोंत, हिंदुस्थान हें आमचें राष्ट्र आहे, हें हिंदू-राष्ट्र आज परतंत्र झालेलें आहे, व तें आम्हा हिंदूंनाच स्वतंत्र स्थितीला पोचवावयाचें आहे हें सूत्रचतुष्टय हिंदूमनांत प्रामुख्यानें घोळत राहिलें असतें तर हिंदुस्थानवर दिवसेंदिवस ज्या आपत्ति कोसळून पडत आहेत त्याचा वाराहि हिंदुस्थानला लागला नसता. अेक लेखक म्हणतो, (The English has always discouraged nationality......to lull the national feeling of the Celtic Irish...... also abroad for example in their Indian Empire, as it might be endangering by the too strong an insistance on nationality.) "अिंग्लिश लोकांनीं राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेला खची करून आयर्लंडमधील सेल्टिक राष्ट्रीयत्वाला निजवून ठेवण्याची खटपट केली. त्याचप्रमाणें दुसरीकडे सुद्धां केले. अुदाहरणार्थ ब्रिटिशांच्या हिंदुस्थानमधील साम्राज्यांत या राष्ट्रीय कल्पनेच्या प्राबल्यामुळें तेथील ब्रिटिश साम्राज्य धोक्यांत येअील म्हणून राष्ट्रकल्पना वाढूं दिली नाहीं." अितकेंच करून ते थांबले नाहींत. आज हिंदूपदसाम्राज्याचा अंत झाल्यापासून आतांपर्यंत अिंग्लिश राज्यांत शाळाविद्यालयांतून हिंदुस्थानमधील तरुण पिढीच्या विद्यार्थ्यांना शिकण्याकरितां म्हणून जीं अितिहासपुस्तकें दिलीं त्यांत हिंदुस्थानच्या प्राचीन कालाची ५।७ पानांत रुक्षशी व लक्ष वेधण्यास असमर्थ अशी माहिती देत हिंदुस्थानच्या अितिहासलेखनाला मुसलमानी आक्रमणें व बादशाही स्थापनापासून आरंभ करून मध्यतरींच्या हिंदू-अुत्थानाचा सामान्यतेनें, तुच्छतेनें, दोषारोपात्मक अुल्लेख करीत ब्रिटिश

साम्राज्यविस्ताराच्या परिपूर्णतेपर्यंत तें आणून भिडवलेलें आहे. आतां आतांपर्यंत हिंदूंच्या स्वातंत्र्योत्थानाच्या प्रयत्नांला हात घालून भगीरथ प्रयत्न करणाऱ्या स्वातंत्र्यपूजक व हिंदूराष्ट्रोद्धारक श्रीशिवरायाचा अुल्लेख 'चोर' 'लुटारू' अशा विशेषणांनीं केलेला अद्याप बऱ्याच गृहस्थांना लहानपणीं वाचलेला आठवण असेल. राज्यावर आल्यापासून हिंदूराष्ट्रार्थ मरेपर्यंत लढणाऱ्या व शेवटीं दिव्य हौतात्म्य प्रकट केलेल्या संभाजी महाराजांना व्यसनी, व्यभिचारी अित्यादि गालिप्रदान दिलेलें आहे. जणूं कांहीं या अितिहासलेखी काकचंचूला संभाजी महाराजांच्या दिव्य व पराक्रमी आयुःक्रमाची माहितीच नव्हती. भाग्यशाली शाहूमहाराज व अखिलभारतीय हिंदूपदसाम्राज्याची श्रीशिवरायांची महदाकांक्षा पुरी करूं पहाणारा नानासाहेब पेशवा हे विलासी व भोगी दाखवणें, श्रीशिवरायांची महदाकांक्षा पुरी करण्याची नानासाहेबांची महदेच्छा, कार्यपरिणत करूं धांवणारा व ७०० वर्षांचे भारतीय पारतंत्र्याचा सूड घेण्यास्तव त्या जीवघेण्या पारतंत्र्याचें मुळावर–दिल्लीच्या मुसलमानी सिंहासनावर–घणाघात करीत तें शतशः विदीर्ण करणारा भाअू–पानपतची भाअूगर्दी करीत या हिंदुराष्ट्राच्या पूर्ण स्वातंत्र्यार्थ मारीत मारीत स्वर्गाची पायरी चढणारा भाअू–'गर्विष्ठ' 'हेकेखोर' म्हणून वर्णन करणें अित्यादि गोष्टींची व्यवस्था हिंदूंच्या मनांत हिंदूराष्ट्रस्वातंत्र्याची ज्योति पेटूं नये व हिंदुस्थान हें हिंदूराष्ट्र आहे ही कल्पनाहि त्यांचे मनाला शिवूं नये म्हणून शिक्षणांतून, भाषणांतून, अवांतरपणें प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयांतून मोठ्या काळजीपूर्वक रीतीनें अिंग्लिश राजकारणी लोकांनीं व्यवस्था करून टेवलेली आहे. या सर्व गोष्टींचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. हिंदुस्थानला दिव्य अितिहास असल्याचें माहीत नाहीं. हिंदूंना त्यांच्या धर्माची–तत्त्वज्ञानाची–शस्त्र व शास्त्र निपुणतेची जाणीव नाहीं. माहित असलेल्या अितिहासांत सर्वकाल मुसलमानी बादशाहीनें व्याप्त दिसत असलेला; मध्यंतरींच्या हिंदूंच्या राष्ट्रस्वातंत्र्य प्रयत्नांना बंड, फितुरी, चोऱ्या, लुटालूट या विशेषणांच्या मालिकेनें सजविलेलें आणि शेवटीं ब्रिटिशसत्तेच्या आहारीं हें हिंदूराष्ट्र पडतांना अिंग्लिशांच्या पराक्रमापुढें व मुठीमुठीभर लहानग्या सैन्यापुढें ठिकठिकाणीं पत्यांच्या तंबूप्रमाणें हिंदूराष्ट्र कोलमंडत गेल्याची कथा कथन केलेली; हिंदुराष्ट्र ही कल्पना स्वप्नांतहि येअूं न देण्याची धूर्त सावधानता

ठेवलेली अशा प्रकारच्या चोहोंकडील कडेकोट 'बंदोबस्तां'तून हिंदूराष्ट्र-कल्पनेचा प्रकाशकिरण हिंदूशिक्षितांच्या दृष्टीपुढें प्रकाश पाडूं शकला नाहीं, यांत काय आश्चर्य ! अशा या हिंदूंच्या भुलल्या मनापुढून राष्ट्र शब्दाची अचलबांगडी करतां येणें शक्य नव्हतें. हिंदुमनाला राष्ट्र शब्दाची ओळख तर झालेली पण 'हिंदुस्थान हें आपलें हिंदुराष्ट्र आहे' अशी जाणीव नसलेल्या स्थितींत राष्ट्र शब्दाची अयथार्थ कल्पना होणें अत्यंत अपरिहार्य आहे. आणि त्याचप्रमाणें झालें. हिंदूचें मनांत राष्ट्रकल्पनेचें विपर्यस्त स्वरूप प्रादुर्भूत झालें. तेव्हां तें हिंदूमनांतील

## राष्ट्रकल्पनेचें विपर्यस्त स्वरूप

कोणतें हें पाहिलें पाहिजे. सन १८८६ या वर्षी राष्ट्रीयसभा निघाली. 'राष्ट्रीयसभा' म्हणजे 'हिंदुस्थानांत रहाणाऱ्या सर्वजणांची सभा' असा अर्थ राष्ट्रीयसभेच्या परकीय प्रेरकांनीं हिंदूंच्या गळीं ओतला आणि स्वकीय प्रेरितांनीं तो मिटक्या मारीत गिळला. घराचा धनी आणि त्या घरांत भाड्यानें रहाणारे भाडेकरी, हे सर्वजण घराचा उपभोग स्वच्छंदपणें घेत असले तरी स्वामित्व त्या धन्याकडे, आणि घराचें भाडें देत घराची नासधूस न करतां अथवा घरधन्याला कोणताहि उपसर्ग न पोंचवितां जोंपर्यंत घरांतील भाडेकरी वागतो आहे तोंपर्यंत घरांतील भाडेकऱ्यांनीं जवळ जवळ धन्यासारखा मनसोक्त उपभोग घेण्याचा हक्क बिऱ्हाडकऱ्याकडे. ही हक्कांची वाटणी अन्याय्य आहे असें कोणालाहि म्हणतां यावयाचें नाहीं. उलट ही व्यवस्था मोडणारा जर कोणी पुढें आला तर तोच अन्यायी ठरेल त्याचप्रमाणें राष्ट्राचें आहे. राष्ट्राचें स्वामित्व राष्ट्राच्या धनी जातीकडे असणार आणि परकीय जातीच्या–धर्ममताच्या–व संस्कृतीच्या अल्पसंख्याकांनीं देशांत राहून आपला जीवनक्रम सुखाचा व्हावा याकरितां त्या देशाची कोणतीहि हानि होणार नाहीं, देशांतील धर्मसंस्कृति आदींना उपसर्ग लागणार नाहीं, व त्या देशाच्या धनी जातीला कोणताहि त्रास पोंचणार नाहीं अशा प्रकारच्या वर्तनाचें भाडें देऊन ह्यांनीं सुखेनैव आनंदानें त्या राष्ट्रांत राहाण्याचा हक्क उपभोगावा असाच राष्ट्रासंबंधींचा न्याय ठरवला गेला पाहिजे. सर्व जगांत हाच न्याय ठरवला गेला आहे व तदनुरूप

व्यवहार होत असतात. पण हिंदुस्थानच्या अनैसर्गिक स्थितींत नैसर्गिक न्याय कोठून न कसा मिळणार ? परकीय लोकां कडून जो बुद्धिवाद आम्हांशीं व्यवहारतांना केला जातो, परकीयांकडून जें आम्हांला शिकविलें वा सांगितलें जातें त्यांत आपला खरा लाभ आहे किंवा नाहीं ! हा प्रश्नच हिंदूमनापुढें उभा रहात नाहीं. स्वातंत्र्यविनाशक परकीयांच्या हितांत आपलें अनहित निश्चित असल्यामुळें व त्यांनीं आपल्यास आपल्या हिताचें सांगणें हें त्याना निश्चित अपकारक असल्यामुळें त्यांचेकडून आपणांस हितबुद्धि कधींहि सांगितली जाणार नाहीं; ही शुद्धीवर असलेल्याला सुचणारी साधी बुद्धिसुद्धां या विपर्यस्तमनस्क हिंदूजनतेला सुचणें शक्य नव्हतें. तसेंच या राष्ट्रकल्पना दानांतहि घडलें. 'सर्वांचें हिंदुस्थान आहे' हा धडा शिकवण्यांत त्यांचा लाभ होता. हिंदुस्थानस्वातंत्र्यार्थ लढूं धावणाऱ्या हिंदूच्या मनांत हा हिंदुस्थान आमचा; या हिंदुस्थानांवर आमचें स्वामित्व; या राष्ट्राचे हिंदूधनी ही गोष्ट बिंबल्यानें बाकी परकीय बनलेल्या वा असलेल्या लोकांची किंचित्‌हि अपेक्षा न धरतां हे हिंदूलोक स्वजातीय-स्वराष्ट्रीय वृत्तीच्या प्रयत्नानें तत्काळ एकजीव बनतील व तें बळ आम्हाला अनिवार होऊन आमच्या स्वार्थसाधनाच्या मुळावर अुठेल ही गोष्ट त्यांना निश्चित ठाअूक, म्हणून राष्ट्रैक्यतेच्या कल्पनेनें हे हिंदु सर्व परकीयांसह राष्ट्रैक्य घडवून आणण्याच्या प्रयत्नांत वाऱ्याची मोट बांधणारांसारखे फजित व्हावेत, यांच्या विरुद्ध हिंदुस्थानांतील परकीय जाती आम्हांला फोडता याव्यात, राष्ट्रैक्यतेच्या खोट्या कल्पनेच्या मागें लागून परकीय अल्पसंख्याकांची मनधरणी करण्यांत हिंदूंची शक्ति, बल, व हित खर्ची पडावींत, हिंदू–जाती जातीय दृष्टीनें विसंघटित रहावी आणि आपला डाव साधावा अितका खोल हेतू राष्ट्रस्वरूपाची खोटी कल्पना देण्यांत त्या परकीय प्रेरकांच्या पोटीं होता हें अगदीं निश्चित मानावयाला चिंता नाहीं. हिंदूंच्या स्वातंत्र्यार्थ वा स्वराज्यार्थ प्रयत्नांना हाणून पाडण्याकरितां हिंदुस्थानांत सतत राहणाऱ्या अल्पसख्याकाना आपल्या बाजूला वळवून घेअून हिंदूंशीं विरोध करावयास अुभे करतेवेळीं त्यांना हिंदू जातीयांच्या विसंघटनेमुळें हिंदूंची भीति वाटावयाला कारण अुरणार नाहीं व विसंघटित हिंदूंचें स्वातंत्र्य प्रयत्नांना आपण परिणामकारी आणि सबळ असा पायबंद घालूं

शकूं हें धूर्त अिंग्लिश राष्ट्राच्या लक्षांत आल्यावांचून राहणें शक्य नव्हतें. व म्हणून हिंदुस्थान राष्ट्राच्या विपरीत स्वरूपाची कल्पना हिंदू लोकांपुढें धरणें त्या राष्ट्राला आवश्यक वाटणें साहजिकच आहे.

## नामांचा हेतूतः अपभ्रंश वा बदल

अिंग्लिश राजकारणी लोकांच्या धूर्तपणामुळें आणि हिंदूंच्या भोळसट-पणामुळें राष्ट्र या शब्दाची कल्पना गढूळ व विपर्यस्त झाली. या विपरीत कल्पनेमुळें राष्ट्रीयसभेच्या कार्यकर्त्यांनीं पारशी, खिश्चन, व विशेषतः मुसल-मान यांच्या गळ्यांत हात घालून व त्यांची मनधरणी करीत त्या राष्ट्रीय-सभेला चुकल्या 'राष्ट्रीय सभेचें स्वरूप देण्याचा प्रकांड प्रयत्न केला. कित्येक वेळां हिंदू धनिकांकडून पैसे देववून व मूल्यवान वेषानें सजवून शेंकडो मुसलमान 'राष्ट्रीय' सभेंत आणून बसविले गेले. या देशाचें नांव हिंदु-स्थान असें असल्यामुळें नामयोजनेवेळीं 'हिंदुस्थान' व विशेषण योजतेवेळीं 'हिंदुस्थानी' असे शब्दप्रयोग न करतां अिंग्लिश भाषेंतून व कधीं कधीं आपल्याहि भाषेंतून अिंग्लिश लोकांनीं त्या नांवाला तोडून मोडून दिलेल्या 'अिंडिया' व 'अिंडियन' या दुष्ट शब्दद्वयांचा अुप-योग गबाळपणें करण्याचा प्रघात हिंदूंनीं पाडला. हिंदुस्थान व हिंदुस्थानी या शब्दांचा विसर पडून हा देश हिंदूंचा आहे हें स्मरणहि शक्य तर लोपावें अशा 'अिंडिया' व अिंडियन' शब्दांची धोंड आमच्या गळयांत बांधली गेली. हिंदू नांवाचें वेडेंविद्रें स्वरूप करण्याचा सहतुक प्रयत्न केला जात असावा अशी शंका-अशा निश्चित हेतूची शंका-यावयाला सबळ कारणें आहेत. कांहीं अुदाहरणें देण्यापूर्वीं अेक गोष्ट सांगणें भाग आहे. अिंग्लिश मूळा-क्षरें अपूर्ण, अशास्त्र व ओंगळ आहेत. त्यामुळें बोलल्या शब्दाचा निश्चित-पणें पूर्ण व शुद्ध अुच्चार करतां येअीलच अशी स्थिति नाहीं. व त्यासाठीं अेखाद्या नांवाचें स्वरूप बिघडलें तर कांहीं कांहीं अुदाहरणांत दोष होअूं शकणार नाहीं. जसें 'त' वर्ग अिंग्रजींत नाहींच. व त्यासाठीं 'ट' वर्गाची नेमणूक त्यांना करावी लागतें. अशाच दुसऱ्याहि बऱ्याच अुच्चा-रांची स्थिति आहे. पण आम्ही पुढें अुदाहरणें देणार आहोंत त्या नांवांत वा हिंदुस्थान-हिंदुस्थानी या नांवांत 'द' कार स्थलीं 'ड'कार येण्या-

व्यतिरिक्त कांहींहि फरक करणें अवश्यक नाहीं. त्या नांवाची वर्णरचना योग्य प्रकारें होऊं शकते पण तशी केली गेली नाहीं. कांहीं बऱ्याच वर्षां-मागें मुंबअीचे स्पेलिंग 'Mumbai' किंवा अशाच सारखें मुंबअी अुच्चार करतां येण्यासारखें होतें. पण त्याचें पूर्वीचें 'स्पेलिंग' बदलून 'बांबे' अशा अुच्चाराचें 'स्पेलिंग' केलेलें आहे. पवित्र क्षेत्र 'मथुरा' या नांवाचें स्पेलिंग 'मथुरा' असें पूर्णरूपानें करतां येत असूनहि 'Mutra' 'मुत्रा' असें हिडिस स्वरूप त्या नांवाला दिलेलें आहे! श्रीकाशी क्षेत्र, श्री-प्रयाग क्षेत्र हीं हिंदूधर्मभावनांची अत्यंत जिव्हाळ्याचीं केंद्रें, पण तीं जितकीं विस्मृतींत जातील तितकीं चांगलीं व अिष्ट त्यांना वाटणार! या दोन महाक्षेत्रांचीं मुख्य रेल्वे स्टेशनें श्रीकाशी व प्रयाग हीं नसून बनारस व अलाहाबाद हीं आहेत. अनुभवाची मंडळी असें सांगतात कीं, अेकाच गल्लींतील घराच्या पत्त्याचें पत्र श्रीकाशी म्हटलें तर १।२ दिवस अुशिरा मिळून बनारस नांवानें लवकर मिळतें. कारण मुख्य 'पोस्ट' कार्यालय बनारस व श्रीकाशीचें दुय्यम ठेवलेलें आहे. प्रयाग येथें यावयाचें तर सर्व-प्रसिद्ध, सर्वसोयीचें, सर्व गाड्या अुभें राहणारें असें स्टेशन अलाहाबाद! या श्रीक्षेत्राला येणाऱ्या भाविक यात्रेकरूला पुण्यमय प्रयागच्या नांवाचा अुच्चार करून टिकिट घेतां येत नाहीं. त्याला सर्वप्रकारें सोयीचें, सुरक्षित व वाटेल त्या गाडीला अुतरण्याला अडचण न पडणारे स्टेशन हवें असलें तर 'अलाहाबाद'चेंच स्टेशन—ध्यान करावें लागतें. श्रीक्षेत्र प्रयागयात्रा करीत असतां परकीय साधनांच्या अुपयोगकालीं प्रयागध्यान न होतां त्या भ्रष्ट व व्यंगपूर्ण 'अलाहाबाद' नांवाचा ध्यास करीत क्षेत्रापर्यंत यावें लागतें. प्रयागला व श्रीकाशी क्षेत्राला मुख्य तारघरें बनारस व अलाहाबाद हीं आहेत, अयोध्या हें श्रीरामाचें जन्मस्थान—वैभवस्थान आहे. भारतीय आदर्श अशा त्या अवतारी महापुरुषाच्या अयोध्या नगरीचें महत्त्व कमी करण्याकरितां त्या नगराचे जवळच असलेले फैजाबाद नांवाच्या अेक्या खेड्याला महत्त्व देअून न्यायालयें, सरकारी कार्यालयें आदिक तेथें बन-विलीं. अयोद्धा हा जिल्हा न करतां ५।६ मैलावरील फैजाबाद खेड्याचें नांवें जिल्हा बनविला. अयोध्या नगरीचें फैजाबाद अुपनगर शोभेल अशी महत्त्वाचे दृष्टीनें वस्तुस्थिति असतां फैजाबादला नगरीचें वैभव देण्याचा

प्रयत्न करून फैजाबाद हें मोठें स्टेशन बनविलें आणि अशाप्रकारें अयोध्येचें महत्त्व कमी करण्याचा प्रयत्न झालेला आहे.

अशीच स्थिति शेकडों जागीं असूं शकेल. हीं अुदाहरणें देण्याचें मुख्य कारण हें कीं, हिंदूंच्या मनांत हिंदुत्व भावनांची जळती ज्योत ज्या ज्या योगें अधिक प्रज्वलित होअील, अधिक चमकून अुठेल, हिंदुत्वभावना सबल व प्रबल होतील तें तें टाळीत शक्य तेवढें वैधावैध मार्ग अवलंबून त्या हिंदुभावनेला हिंदूंच्या मनांतून अुच्चाटन मिळावें हा सदैव जणूं कांहीं अभ्यासपूर्वक प्रयत्न परकीय वर्चस्व करीत आलेलें आहे. हें ध्यानात यावें.

हा अितका नवीन नामकरणाचा व पुराण नामनाशनाच्या प्रक्रियेचा प्रपंच नामकरणाचा काय परिणाम होअूं शकतो व त्यामागें काय हेतू असण्याचा संभव असूं शकतो हें स्पष्ट कळावें म्हणून करावा लागला. हिंदुत्व भावनांची तीव्रता मोडावी व ती भावना हिंदुमनांत राहिलीच तर अगदीं अंधुक व म्हणून कार्यशक्तिहीन राहावी यासाठीं केलेल्या अनेकशः प्रयत्नांपैकीं अेकदोन प्रयत्नांचा अधिक अुल्लेख केल्यावांचून रहावत नाहीं. हिंदुमात्रांच्या मनांत गोमातेविषयीं असामान्यपूज्यभाव असल्यानें त्यांना गोहत्येची अत्यंत चीड आहे. तो पूज्यभाव नाहींसा व्हावा व तद्वारा गोहत्येची चीड नष्ट करून हिंदूमनाच्या अुद्दीपनाची अेक मुख्य 'स्प्रिंग' काढून टाकावी म्हणून केलेल्या अनेक अुपायांपैकीं हिंदु अर्भकांना 'काअू हाज नो सोल '–गाअीला आत्मा नाहीं–ही शिकवण पुस्तकांतून घालून ठेवली. आणखी अेक गोष्ट याहून महत्वाची आहे. जपानमध्यें मानासाठीं, तत्वासाठीं वा असामान्यव्यक्तीनिष्ठेसाठीं प्रसंगीं देहबलीदान–हाराकिरी–करण्याची प्रथा आहे. तो स्वतंत्र व युरोपियनांना रणांगणांत धूळ चारूं शकणारा देश आहे म्हणून ही बलीदानाची प्रथा रानटी प्रथा म्हणण्याला युरोपीय जिव्हा सरसावत नाहीं. अुलट कित्येकांनीं त्यांतील आत्मसमर्पणाच्या तत्वाची प्रशंसा केली आहे. परंतु या परतंत्र हिंदुस्थान देशांत आपल्या प्रेमनिधान पतीसाठीं आत्मसमर्पण करणारी सती रानटी ठरली !! ही प्रथा असलेली हिंदुजाति रानटी आणि या रानटीपणाच्या तावडींतून हिंदुजातीयांना सोडविण्यासाठीं हीं जगदुध्दारक अिंग्लश मनें पुढें सरसावलीं !! हिंदुजातीला स्वतःच्या कल्याणाची

काळजी नाहीं अितकी या महात्म्यांना काळजी ! रात्रंदिवस जणूं दुसरें कांहीं कामच नाहीं बिचाऱ्यांना ! प्रचंड अिच्छाशक्तीच्या प्रकटनाचें सामर्थ्यानें शरीराला तुच्छ लेखण्याची ही सामर्थ्यदानी व आत्मसन्मानदायी प्रथा मोडीत हिंदूंच्या जवळील आत्मसन्मानवर्धक व अिच्छासामर्थ्यदानी ही आत्मसमर्पणाची अमृतवल्ली छिनावून घेअून हिंदूंची अेक शक्तिदानी केंद्रभावना जणूं मारून टाकली. या व अितर अशाच गोष्टींचें लक्षपूर्वक निरिक्षण केलें असतां हिंदुस्थानांत हिंदुत्वभावना प्रभावान् असूं नये–प्रबल होअूं नये व शक्य तर नष्ट व्हावी हेंच परकीयवर्चस्वाला केव्हांहि अिष्ट वाटणार, हें लक्षांत यावयास जड जाणार नाहीं. त्याच प्रकारचे प्रयत्न मुसलमानराज्यकर्त्यांनीं पूर्वीं हिंदूंच्या विरुद्ध केले आहेत. पण त्यानंतरच्या अिंग्लिश राजकारण्यांनीं तीच गोष्ट करण्याची पद्धति मात्र वदलली अितकेंच.

या गोष्टी लक्षांत घेतल्या गेल्या तर राष्ट्र व राष्ट्रीय शब्दांच्या खोट्या कल्पना आमच्या गळ्यांला बांधण्यांत परकीय लोकांचा काय हेतू असला पाहिजे हें सहज ध्यानांत येअील. आणि मागें जें विधान त्यासंबंधीं केलेलें आहे त्याविषयीं शंका राहणार नाहीं. राष्ट्र शब्दाची भ्रष्ट कल्पना देणारे जितके धूर्त तितकेच ती कल्पना विचार न करतां भोळसरपणानें स्वीकार करणारे हिंदू भोळे होते व आहेत हेंहि मान्य केलें पाहिजे. हिंदुस्थानच्या सांप्रतच्या पारतंत्र्याचे अितिहासारंभापासून–मुसलमानी आक्रमण कालापासून–तों सांप्रतच्या भारतीय स्थितीपर्यंत अेक गोष्ट जर प्रामुख्यानें, अखंडपणें, व सातत्यानें अनुभवाला येत असेल तर ती म्हणजे परकीयांच्या कपटीपणाला, भोंदूपणाला, फसवाफसवीला भोळसटपणानें, मूर्खपणानें व सत्यनिष्ठेच्या फाजील बावळट कल्पनेनें हिंदू फसतच गेलेले आहेत, हीच होय. त्याचीच पुनरावृत्ति राष्ट्र व राष्ट्रीय कल्पनेच्या संबंधांतहि झाली. सगळ्या जगांत राष्ट्र शब्दाची व्याख्या अेक प्रकारची आणि या आपल्या हिंदुस्थानांत व्याख्या दुसऱ्या प्रकारची, अशी स्थिति आहे. हिंदुस्थानांत " 'राष्ट्र' म्हणजे राष्ट्रांत रहाणाऱ्या व राहूं अिच्छिणाऱ्या सर्वांचें राष्ट्र " अशी कल्पना हिंदूंच्या डोक्यांत घर करून बसलेली आहे. सन १९०५।६

या सुमारास महाराष्ट्रांतील अेका प्रख्यात देशभक्तानें अेक 'राष्ट्रगीत' म्हणून गीत बनविलें होतें. त्या गीताचे ध्रुवपदांत ते म्हणतात—

**" हमारा स्वदेश हिंदुस्थान-हमारा प्यारा हिंदुस्थान**
**हिंदु-मुसलमान-पारशी-ख्रिश्चन अिनका हिंदुस्थान**
**यहुदी अिनका हिंदुस्थान ॥ धृ० ॥**

अेखाद्या घरधन्यानें अुठून अगदीं खऱ्या अर्थानें " हें घर माझें, यांतील बिऱ्हाडकरूंचें–पाहुण्यांचे–भिक्षेकऱ्यांचें–चोरांचें–असें सर्वांचें आहे " हें म्हणणें जितकें खरें वा खोटें, मूर्खांचे वा बुद्धिवंताचें, हानीचें वा लाभाचें होअूं शकेल तसेंच वरीलप्रमाणें म्हणणें आहे. जपान–जपान्यांचा, अफगाणिस्थान–आफगाणांचा, रशिया–रशियनांचा, तुर्कस्थान–तुर्कांचा, अिराण–अिराण्यांचा हा स्वत्वस्वामित्वभाव अैकण्याबरोबर यथार्थ, सुयुक्त, न्याय्य व योग्य असा वाटतो व वाटला पाहिजे, तसाच 'हिंदुस्थान हिंदूंचा' हाहि स्वत्वस्वामित्वभाव वाटला पाहिजे. पण जो अितर स्थलीं न्याय ठरतो तो हिंदुस्थानच्या संबंधांत अन्यायच समजला जावा व तो विशेषतः हिंदूंकडून समजला जावा हा दैवदुर्विपाकच झालेला येथें दिसून येतो. हिंदुस्थान कोणाचा हा प्रश्न हिंदूंच्या मनापुढें अुभा राहतांच

**' हा हिंदुस्थान सर्वांचा !!! '**

असें जगद्विपरीत अुत्तर हिंदूमनांत अुभें राहतें. हिंदूंनीं हिंदुस्थानला धर्मशाळा बनवून ठेवली आहे. आणि याच अर्थानें राष्ट्रीयसभेनें हिंदुस्थानमधील हिंदुस्थानियांशीं अेकरूप न होतां प्रतारणा करून वागणाऱ्या अल्पसंख्याकांच्या गळ्यांत हात घालीत व त्यांच्या विनवण्या करीत राष्ट्रीयसभेशीं त्यांना संयुक्त करण्याचा प्रयत्न चालू ठेवला. राष्ट्रीयसभेचा हा त्या अल्पसंख्याक परकीयांना–विशेषतः मुसलमानांना–प्रसन्न करून घेण्याचा प्रयत्न जितका जितका अधिक होत गेला तितका तितका त्या परकीय लोकांच्या स्वार्थी वृत्तीला अधिकाधिक अूत येअूं लागला. अिकडे राष्ट्रीयसभेनें जसजसा मुसलमानांच्या सहकार्यार्थ अधिकाधिक प्रयत्न वाढवीत ठेवला तसतसें मुसलमानांना अवसान चढत व जोर येत ते अिंग्लिश

पक्षाचे कच्छपीं लागत गेले; आणि अिंग्लिश राजनीतिकुशलांनीं आपल्या स्वार्थाची पूर्ति करून घेण्यांत यश मिळविण्याचा अुपक्रम यशस्वी करीत आणला.

राष्ट्र जसें बहुसंख्याक धन्याचें त्याचप्रमाणें अल्पसंख्याक परकीयांचेंहि आहे ही भावना परिपुष्ट झालेल्या हिंदुस्थानांतील अल्पसंख्याकांच्या हित संरक्षणाचा बहाणा करीत अिंग्लिश राजकारण्यांनीं राष्ट्रीयसभेला निर्बली करण्याकरितां मुसलमानांबरोबरच ख्रिस्ती, अंग्लोअिंडियन, युरोपियन-आदिक अल्पसंख्याकांचे गट निर्माण करून हिंदुस्थानच्या बहुसंख्याकांना शह दिला आहे. आज ना अुद्यां हिंदूमध्यें खऱ्या राष्ट्रकल्पनेचा अुदय होअून या हिंदुस्थानचे आम्हीं धनी व म्हणून अल्पसंख्याकांनीं सर्व जागतिक न्यायानुसार आमच्याच तंत्रानें वागलें पाहिजे असें म्हणत आव्हान द्यावयासाठीं अेकमुखानें जर त्यानीं अुद्घोषित केलें तर त्या प्रचंड शक्तीपुढें आपलें कांहीं चालणार नाहीं, हें जाणल्यानें हिंदूंच्या अंतर्गत विभिन्नतेचा बाअू करीत हिंदूंचेहि तुकडे अुडवण्याचा प्रयत्न अिंग्लिश धूर्ततेनें चालू केला. हिंदू वा आर्य बाहेरून आलें या भ्रमोत्पादक व बुद्धिभेदी शिकवणीनें आर्य-अनार्य वा हिंदू-आदिहिंदू हा भेद निर्माण केला आणि त्या कृत्रिम भेदाच्या विषवृक्षाला पालवी फुटूं लागली आहे. हिंदू-धर्मात अनंत पंथांचा समावेश झालेला असल्यामुळें धर्मसंबंधांत निर्माण होअूं शकणाऱ्या सर्व प्रकारच्या मतांचा प्रादुर्भाव या सर्व पंथांतून दिसून येतो. हिंदुधर्मावर व समाजावर ज्या ज्या वेळीं ज्या ज्या प्रकारची आक्रमणें येत गेलीं त्या त्या वेळीं त्या त्या प्रसंगाला तोंड देण्याला समर्थ असे मार्ग व मार्गी निघत गेले. महाराष्ट्रांतील संत निर्मिति, युक्त प्रांतातील तुलसीदास आदीक साधु, बंगाल्यांत वैष्णव-पंथ जसे निर्माण झाले त्याचप्रमाणें हिंदू-धर्मीयांवरील अत्याचारीयांचे छलांच्या वेळीं हिंदु-समाजामधून शीखपंथ निर्माण झाला. त्या पंथीयांना क्षात्र कर्तव्य शिकवून व 'तुम्ही धर्माचे कुंपण म्हणजे रक्षणकर्ते आहांत' हें समजावून देअून त्यांचे करवीं आततायी व छलक अशा मोंगल सत्तेला आव्हान दिलें व तद्वारा पंजाबमधील हिंदुत्व-नाशनाला गुरुगोविंदसिंहानीं आळा घातला. हिंदू-समाजांतर्गत शीखवर्ग हा हिंदू जातींयांचे (राजपूत्र, क्षत्रिय, मराठी

आदिकांप्रमाणेंच ) क्षात्रबल आहे. ते हिंदूशीं अेकरूप असणें हें हिंदूंच्या शक्तीला वर्धक आहे व तें फोडून वेगळे केले असतां स्वतंत्रपणें ते अल्प-संख्याकत्वामुळें फारसें प्रबळ राहणार नाहींत आणि ते फुटून वेगळे झाले असतां पंजाबच्या बाजूकडील हिंदूशक्तीहि त्या मानानें निर्बल होअील, यासाठीं " गुरुनानकांनीं मुसलमान व हिंदु यांच्यांतील चांगलें चांगलें भाग निवडून अेक केलें आणि अेक स्वतंत्र धर्म स्थापन केला, " ही खोटी शिकवणूक हितशत्रुत्वानें शीखांच्या गळीं परकीयांनीं अुतरविलीं. त्यामुळें शीखांतील अुदासी व अकाली या दोन भेदांपैकीं अकाली शीखांना हिंदूतून फोडून वेगळे करण्यांत पुष्कळसें यश मिळविलें. महाराष्ट्रांत धर्मभेद दाखवतां येत नाहीं म्हणून निरनिराळ्या प्रकारें बुद्धिभेद व तदनुसार विमनस्कता अुत्पन्न करून व करवून ब्राह्मण ब्राह्मणेतर भेद निर्माण करविला आणि हिंदुशक्ती लंगडी करून ठेवली गेली. मद्रासच्या बाजूला हिंदूंत स्पृश्यास्पृश्य भेद फार तीव्र प्रमाणांत असल्यानें त्याचा लाभ घेत स्पृश्यविरूद्ध अस्पृश्य हा भेद ब्राह्मण ब्राह्मणेतर भेदाबरोबरच आणखी निर्माण करवून तेथेंहि हिंदूंची अेकमूठ फोडून टाकली. हिंदूंच्या आपसांतील फुटीचा हा प्रकार झाला. हिंदूंना हिंदुस्थानांत निर्बली करण्याच्या दुसऱ्या प्रकाराकडे आतां वळूं. जगामध्यें सामर्थ्य संघटनांत आहे हे ठाअूक नाहीं असा व्यवहारांत वागणाऱ्यामध्यें कोणी असणें शक्य नाहीं. पण या संघटनसामर्थ्याला सुद्धां संख्येचें अधिष्ठान असावें लागतें. अिंग्लिशांचें संख्याबल ४।५ कोटी. पण संघटनासामर्थ्याच्या जोरावर ते जगांतील महत्तम साम्राज्याचे धनी झाले आहेत. जर्मनीची लोकसंख्या ६।७ कोटीचीं. या अिंग्लंडहून थोड्याश्या अधिक संख्येनें असलेल्या जर्मनीनें प्रबलतर संघटना--साह्यानें निर्माण केलेल्या सामर्थ्याच्या अवश्यंभावी प्रभावाच्या भयानें जगांतील लहान मोठ्या सर्व देशांनीं अेकत्र होअून—सर्व जगच्छक्ति अेकवटून—तें जर्मनीचें जगज्जेतें सामर्थ्य तोडण्यासाठीं सतत चार वर्षें घनघोर युद्ध केलें. तेव्हां कोठें जर्मनीचें तें सामर्थ्य कांहीं कालासाठीं खची करतां आलें. अशासारखीं अुदाहरणें जगांत अुघड्या डोळ्यांपुढें घडत आहेत. तेव्हां असंख्य जनसमुदायानें समृद्ध हिंदूजाती जर कदाचित् डोळे अुघडील तर आपल्या अगणित बाहूंकडे

पाहून तिला अवसान चढेल, तिच्यांत महदाकांक्षा प्रस्फुरित होअील, आणि ती महदाकांक्षा तृप्त करून घेण्याकरितां संघटन सामर्थ्याचें ती आवाहन करील ही शक्यता हिंदुस्थानवर आपले वर्चस्व चिरकाल टिकवूं पहाणाऱ्या वा स्थापूं पाहणाऱ्या प्रतिपक्षियांना ठाअूक आहे, ही शक्यता शक्य तितकी अशक्यतेच्या खाअींत ढकलण्याची त्यांची प्रयत्न–मालिका सुरू असणें यांत कांहींच आश्चर्य नाहीं. हिंदू राष्ट्रावर आपला पंजा पक्का आवळून धरावा; हिंदू राष्ट्रांत राहणाऱ्या अल्पसंख्याकांनीं क्षणोक्षणीं हिंदूंचा तेजोवध करून साधेल त्या त्या प्रकारानें त्यांचें स्वत्व छिनावण्याचा प्रयत्न करावा; हिंदूंमधील आपसांतील भिन्न वर्गीयांना या ना त्या प्रकारें कृत्रिम वैरभावप्रेरित करून त्यांच्या जातींचे शतशः तुकडे अुडवावेत आणि या विविध प्रयत्नांबरोबरच त्यांची प्रचंड संख्या जर ठिकठिकाणीं कमी करतां आली तर करून त्या मानानें तिचें संख्यावलहि घटवावें असा दीर्घ रावणी प्रयत्न परकीय संस्कृतींकडून सुरू आहे. मागें सुरतेला हिंदुमहासभेचें अधिवेशन झालें त्यावेळीं हिंदुसंघटनकर्त्यांनीं अेक “Eye opener” आय ओपनर (मराठींत ‘कान अुघाडणी’ म्हणतां येअील.) नांवाचें अेक लहानसें पत्रक प्रसिद्ध केलें होतें. मुंबअीच्या हिंदु-मुसलमानांच्या दंग्याचे जे अेक “परिशोधक-मंडळ” बसलें होतें त्या मंडळापुढें मुंबअीचे प्रख्यात बॅ. जयकर, यांनीं साक्ष देते वेळीं अुल्लेख करून तें पत्रक पुढें ठेवलें होतें. त्या पत्रकांत बंगाल्यांत आज असणारी हिंदू जनसंख्या निरनिराळ्या पाताळयंत्री अुपायानें नाहींशीं (“anihilete”) करून मुसलमानांची आज शेंकडा ५६ असणारी संख्या शेंकडा ९० पर्यंत नेण्याचा प्रयत्न कसा करावा याचें हिंदुस्थानांतील निवडक मुसलमान पुढाऱ्यांच्या गुप्तसभेंत बेत ठरलेले दिले आहेत. हसन निझामी, पीर मोटामिया, अित्यादि कुख्यात मुसलमानांचे पाताळयंत्री कावे व कट कसें रचले गेले आहेत व त्या गोष्टी गुप्त व अुघडपणें कशा सुरू आहेत हें ब्रह्मीभूत स्वामी श्रद्धानंद यांच्या ‘खतरेका घंटा’ या पुस्तकांतून व प्रत्यक्ष घटनांच्या निरीक्षणांतून पहावयास मिळत राहील; कोट्यावधि हिंदूंना धर्मभ्रष्ट करून मुसलमान बनविण्याचा मुसलमानप्रयत्न आटापिटा करीत आहे. अिंग्लिश मिशनें, स्काच मिशनें

अमेरिकन मिशनें, जर्मन-पोर्तुगीज अित्यादि मिशनें सहस्त्रावधि गरीब व अज्ञानी हिंदूंना त्यांच्या गरीबीचा व अज्ञानाचा लाभ घेत फसवून आपल्या कळपांत ओढीत आहेत. आणि या प्रकारें हिंदुसमाजाला गळती लावून ह्या परकीय संस्कृती या हिंदू राष्ट्राचा हा महान् सनातन वटवृक्ष—हा अक्षय्यवट—पोखरून निसत्व, वीर्यहीन, दुर्बल व जीवनशक्ति धारणाला असमर्थ करून टाकण्याचा अट्टहास धरीत आहेत ! !

सर्व जगाला अिहपर—अभ्युदय निश्रेयस—साध्य करून देणारा धर्म ज्यानें दिला; ज्याचे तत्वज्ञानानें जगाच्या अुठाठेवीचा, घडामोडीचा, अुपद्व्यापाचा मार्ग चालून झाल्यावर आत्मिक विश्रांतीचे महाद्वार सर्व मनुष्यमात्राला अुघडें करून दिलेलें आहे; मन व बुद्धि या मनुष्यत्वदात्या मनुष्यतेची अुदात्ततम, अुदारस्वभावी आणि अुत्तमशीलयुक्त दैवीस्थिति प्रत्यक्षतेंत कशी आणावी हें ज्यानें सप्रयोगपणें स्वतःच्या ज्वलन्त अुदाहरणानें सिद्ध केलें; तो हा हिंदू—राष्ट्रपुरुष पारतंत्र्याच्या वणव्यांत भाजला जात असलेला; अंतर्गत विविध वर्गीयांचे मूर्खवैरांच्या वेदनांनीं विकलांग झालेला; विभिन्न धर्ममतवाद्यांच्या गिधाडी चोचींनीं क्षतविक्षत होअून रक्तमांसहीन बनत चाललेला आणि बुद्धिभेदाच्या विषारी धूमांनीं भ्रमिष्टचित्त बनलेला होअून महाआपत्तीग्रस्ततेंत सांपडल्यासारखा झाला आहे.

## याला अुपाय काय ?

येथपर्यंत सध्यां हिंदुस्थानांमध्यें काय स्थिति झाली आहे हें पाहिलें. यापुढें ही स्थिति नाहीशी करून पुन्हां सुस्थिति कशी प्राप्त करून घ्यावी व ही दुःस्थिति नाहीशी कशानें होअील हें पहावयाचें आहे. रोग्याला निरोगी करतेवेळीं रोग मूलतः कां अुत्पन्न झाला हें मुख्यतः पहावयाचें असतें. रोगाचें मूळ राखून वा तसेंच राहूं देअून रोग नाहींसा करण्याचा प्रयत्न करणें म्हणजे विषवृक्षाच्या मुळाशीं खतपाण्यानीं परिपोषण देत वरची पालवी खुडून विषवृक्ष सुकाविण्याचा वा नष्ट करण्याचा प्रयत्न करण्यासारखें हास्यापद आहे. म्हणून वर वर्णन केलेल्या रोगसमूहाचें मूल शोधून काढण्याचें कार्य केलें पाहिजे. अेकदां कां रोगसमुदायाचें मूल सांपडलें कीं, त्या मुळावर घाव घालावयाला बरें पडेल. व रोगमूल अेकदां अुपटून फेकून

दिलें कीं रोगापत्तींनीं फळें लागलेला विषवृक्ष कोलमंड्न पडावयास मुळींच वेळ लागणार नाहीं. याकरितां आज आलेल्या आपत्तींच्या परीक्षणानीं प्रत्येक आपत्तींचें मूल कशांत सांपडतें हें पाहिलें पाहिजे.

१ अंतःकलहः—हिंदूजातींत अनंत भेद आहेत व त्यामुळें त्यांना आपत्ति आली आहे असें सांगण्यांत येतें. भेद केवळ हिंदूजातींतच आहेत व ते जगांतील अितर जातीयांत नाहींत असें नाहीं. मुसलमानांत शिया व सुन्नी हे अहिनकुलवत् भेद आहेत. अहमदिया, बोहरी, आगाखानी, आदिक अितरहि भेद आहेत. प्रत्येक भिन्न पोटमताला आपल्या अनुयायांनाच 'बहिस्त' (स्वर्गासारखी कांहींतरी कल्पना) आणि अितर मतवाल्यास 'दोजख (नरक) मिळणार आहे असें वाटतें. सुफी पंथाच्या अुत्पादनाला हिंदुतत्वज्ञानाचा संसर्ग कारणीभूत झाला व तदनुसार वेदांतमती मुसलमानाचा अेक भाग निर्माण झाला. कुराणाच्या शिकवणीच्या विरुद्ध तें मत जातें म्हणून त्याच्या अनुयायांचा अनन्वित छल त्या वेळच्या मुसलमानानीं केला व म्हणून त्यांना सुफीमताच्या साधनसाधनेच्या अनुष्ठानाला गुप्तस्वरूप द्यावें लागलें. त्याचप्रमाणें त्यांच्यांत देशभेदानें, राष्ट्रभेदानें, अनेक भिन्नता मानली जात आहे. पण जेव्हां अखिल मुसलमान दृष्टीचा जातीय प्रश्न अुभा राहतो त्यावेळीं ते सर्व अेक होण्याची प्रवृत्ति त्यांच्यांत कमी अधिक मानानें दिसून येत असतें. खिस्त्यांचेंहि तेंच. आज खिस्तीजगाला आव्हान देअील अशी समर्थशाक्ति अस्तित्वांत नसल्यामुळें त्यांच्यातील आपापसांमधील भेद दिसून येत आहेत. पण समजा अुद्यां बोद्ध जगत् —ज्याला जर्मनीच्या भूतपूर्व केसरनें (यलोपेरिल) 'पीतभय' म्हटलें होतें तसें तें बौद्धजगत्—जर जगावरील अखिल युरोपीय वर्चस्वाला आव्हान देण्यास अुभे राहिलें तर सर्व खिस्ती जगत् निश्चयानें अेक होअील. पूर्वींहि अखिल मुसलमान आक्रमणकाळीं अेकत्र झालें होतें. खिस्ती जगांत आज असलेल्या निरनिराळ्या राष्ट्रांच्या राष्ट्रीयांत धर्ममतभेद, राजकीय मतभेद, अितरहि अवांतर मतभेद पुष्कळ आहेत. आपआपसांत ते डोके फोडाफोडीहि करतात. पण जातीय व राष्ट्रीय प्रश्न येतांच ते मतभेद पार मावळून जाअून परकीय विरोधकांच्या कपाळीं लगुडप्रहार करण्यासाठीं ते अेकजुटीनें व अेकमुठीनें तत्काल सिद्ध होतात. तेव्हां भेदाचें अस्तित्व व

भेदवशतः आपसांतील भांडणें या गोष्टी मानवी समाजाच्या पांचवीला पुजलेल्या असतात. **परंतु "अन्यशत्रुघातीं आम्ही १०५ आहोंत— भांडणारे १०० आणि ५ नव्हत" ही जी जातीय व राष्ट्रीय अेकतेची प्रबलतर भावना अितर देशांत, राष्ट्रांत वा जातींत दिसून येते त्या राष्ट्रीय अेकतेच्या भावनेचा अभाव हे हिंदू राष्ट्राच्या आपत्तीचें अकमेव मुख्य कारण आहे.** आपसांतील केवळ भेदभाव राष्ट्राच्या वा जातीच्या पतनाचें कारण होअूं शकत नाहींत. यापुढें दुसरी आपत्ति म्हणजे—

**२ भिन्नमतवाल्यांची बकासुरी वृत्तिः**—परकीय धर्ममताच्या आक्रमणांनीं जर हिंदुसमाज क्षतविक्षत झाला नसता तर आजच्या ३५ कोटी लोकसंख्येच्या शिरोगणतींत स्वसंरक्षणार्थ म्हणून हिंदुराष्ट्राच्या दयाशील आश्रयासाठीं आलेल्या पारशी यहुदी लोकांव्यतिरिक्त बाकी सर्वजण केवळ हिंदूंच असलेले दिसले असते. ९ कोटी मुसलमान व सुमारें २।२। कोटी ख्रिस्ती यांचेपैकीं येथें बियाणालाहि कोणी दिसला नसता. परधर्ममतवाल्यांच्या राजकीय व धार्मिक आक्रमणांनीं हिंदूराष्ट्र छिन्नविच्छिन्न होण्यालाहि ही हिंदुमधील राष्ट्रीय भावनेची अुणीवच कारणीभूत झाली. हिंदुस्थान देशावरील मुसलमानांच्या किंवा ख्रिस्त्यांच्या राजकीय आक्रमणकालीं अखिल हिंदू—राष्ट्र म्हणून आक्रमणाला तोंड द्यावयाला हिंदुस्थान केव्हांहि अुभें राहूं शकलें नाहीं. कनोजच्या जयचंदांनीं घरभेदीपणा करून "परेषु मैत्री स्वजनेषु वैरं" चें राष्ट्रघाती विषबीज पेरून ठेवलें आहे. त्याचा वृक्ष होअून अद्यापपर्यंत आपल्या विषमय फुलानीं हिंदू—राष्ट्राचा तो जीव घेत राहिला आहे. हिंदू जातीमधून नित्यशः शेकडो लोक धर्मभ्रष्ट होत असतांहि हिंदू समाजाकडून त्यांकडे अक्षम्य दुर्लक्ष होत आलें आहे; अितकेंच नव्हे तर कधीं कधीं हिंदू जातीयांच्या विक्षिप्त मनस्कतेच्या कृतींनीं शेकडोवेळां हिंदू जातीघात अितका झाला आहे कीं त्यापुढें प्रतिपक्षियांनीं केलेला घात अेखादेवेळीं फिका वाटतो. या स्थळीं परकीयांनीं केलेल्या धर्मघाताचें वर्णन द्यावयाचें नसून हिंदूंच्या आत्मघाती वर्तनपरंपरेमधील शतशः गोष्टींपैकीं केवळ कल्पना यावी म्हणून वानगी या नात्यानें तीन चार अुदाहरणें द्यावयाची अिच्छा आहे.

## ( अ ) काळापहाडानिर्मीति

बंगालमध्यें ढाक्यांत अेक सुवृत्त, व्यायामप्रिय, स्नानसंध्यानिष्ठ व असीम धर्मप्रेमी ब्राह्मणयुवक राहात असे. नित्याप्रमाणें ब्रह्मपुत्रानदावरून स्नान करून पवित्र वस्त्र परिधान केलेला, अंगाला भस्म चर्चिलेला, व तोडानें मंत्र म्हणत असलेला असा तो तरुण घराकडे चालला होता. त्याच्या घराचा मार्ग त्या वेळच्या ढाक्याच्या नबाबाच्या वाड्यावरून जाणारा होता. तो वाड्यापुढून मार्गानें जात असतां नबाबाच्या मुलीनें आपल्या वाड्याच्या खिडकींतून त्या तरुण ब्राह्मणाची ती सुडौल, सुगठित, सुंदर व तरुण अशी अुघडी तनू पहातांच तिचे तारुण्यसुलभ भावनावश परंतु अेकनिष्ठ अशा मनानें त्याला पतिरूपानें स्वीकारलें. व त्याच भावनावेशांत आपल्या पित्याकडे येअून तिनें आपला निश्चय कळविला. नबाबाची ती लाडकी मुलगी होती. नबाबानें लागलीच तो तरुण कोण याचा निश्चयपूर्वक शोध आतांच लागूं शकेल या कल्पनेनें त्याचे मागें आपला दूत पाठवून दिला. त्या नबाबदूतानें त्या तरुणाला गांठलें व त्याला नबाबाकडे चलण्याला सांगितलें. तो तरुण त्या दूताच्या आग्रही व निग्रही आमंत्रणावरून मागें परतला. व त्या नबाबाकडे येअून ‘ कां बोलावलें ’ म्हणून पृच्छा करता झाला. नबाबानें थोडक्यांत झालेलें वृत्त कळवून ‘ तूं माझ्या मुलीशीं लग्न लावलें पाहिजेस ’ असें सांगितलें. तो नबाब मुसलमान—हा तरुण धर्मनिष्ठ हिंदू ब्राह्मण. नबाबाची ती सूचना अैकतांच तो तरुण निश्चयानें व क्षणाचाहि विलंब न लावतां निग्रहपूर्वक म्हणाला “ अशक्य ! मी ब्राह्मण—मुसलमान मुलीशीं विवाह कसा करीन—केव्हांहि हें होणें शक्य नाहीं. ” नबाबाचें मन पूर्ण मुसलमानीमय नव्हतें. हिंदूंची सुजनता त्यांत थोडी होती. तो म्हणाला “ ती मुसलमान म्हणून तूं लग्न करीत नसलास तर तिला हिंदू करून घेअून मग तिच्याशीं लग्न लाव. ” अर्थात् ही गोष्ट तर सर्वथा अशक्य. कोणीहि हिंदू मुसलमान होअूं शकतो, किंबहुना सर्व हिंदू हळूहळूं ग्रासले जात जात मुसलमान होअूं शकतील. त्यानें धर्म नष्ट होतो याची जाणीव जणूं हिंदूमनाला नाहीं ! पण मुसलमान वा खिस्ती वा कोणीहि हिंद्वेतर हिंदू होणें ही कल्पनाहि आमच्या ‘सनातन’ हिंदुत्वाला असह्यनीयशी

आहे. त्यानें केवढा 'धर्मघात' होणार (!) म्हणून सर्व हिंदूजाति चमकून अुठणारी. हिंदूंचा मुसलमान झाला. त्या मानानें हिंदूंची संख्या घटली किंबहुना सर्व हिंदूसंख्या नष्टही झाली तरी त्यांत अितकी धर्मभ्रष्टता व धर्महानि नाहीं. पण हिंद्वेतरांचा हिंदू होणें–हिंदूंची संख्या वाढणें–हिंदुत्वाचा प्रसार होणें–छट्! तो धर्मघात, ती धर्मभ्रष्टता, तो धर्मभंग! ज्या कोणी ही कल्पना कल्पून त्या हिंदुत्वविघातक कल्पनेचा प्रचार व प्रसार करून हिंदूमनाला मूढ बनविलें तो हिंदुत्वाच्या आजवरच्या सर्व शत्रुसमूहांतील अेक महाभयंकर व जात्यांगार असा विनाशक शत्रू समजला पाहिजे. सुदैव कीं आद्य श्रीमज्जगद्गुरू श्रीशंकराचार्यापर्यंत ही समजूत हिंदूंच्या गळीं पडली नव्हती. नाहींतर त्याचवेळीं बौद्धमय हिंदुस्थान होअून हिंदुत्वाचा ठिकाणाहि राहिला नसता. बौद्धमय झालेला अफगाणिस्थान जसा सहज सुलभतेनें विधर्मी बनला. मुसलमानमय झाला, तीच पाळी सर्व हिंदुस्थानावर आली असती.

त्या मुसलमान कुमारीला तो ब्राह्मण युवक हिंदू करून घेण्याला असंमत, लग्न लावण्याला विरुद्ध. नबाबानें तो आपला, आपल्या मुलीचा, आपल्या नबाबपणाचा अपमान समजूत त्या तरुणाला बंदींत टाकलें. तरीहि तो नबाब अद्याप पूर्ण क्रूर बनला नव्हता. त्या तरुणाच्या बापाला बोलावून आणून आपल्यापरी त्याला समजावून देण्याचा प्रयत्न त्यानें केला. त्याच रूढिप्रिय तरुणाचा तो रूढिप्रिय पिता. त्यानेंहि मुलीला हिंदू करण्याला व त्या मुलीशीं कोणत्याहि अटीवर लग्न लावण्याला नकार दिला. आतां मात्र नबाबीचा पारा पूर्णांशावर गेला. त्याच्यांतील सुजनता आटून गेली व तेथें पूर्ण क्रूरतेचा अुदय झाला. त्या तरुणाला आपल्या आज्ञाभंगासाठीं व मुलीच्या प्रेमाच्या भंगास्तव त्यानें ठार मारण्याची आज्ञा दिली.

नबाबाची ठार मारण्याची आज्ञा झाली. ठरल्या वेळीं चांडाळ त्या तरुणाला आपल्या तरवारीनें मृत्युमुखीं पाठवण्याला अुद्युक्त झाला, आणि हा निर्भय–निग्रही तरुण धर्मनिष्ठेस्तव राजवैभव व सौंदर्यसंपन्न नबाबकुमारी यांना तुच्छ समजत–कामिनी व कांचन या जागतिक महाबंधनांना लीलेनें तोडून टाकून धर्मवीरांच्या महनीय मरणाला–आपल्या परमपवित्र धर्म कल्पनांसाठीं आत्मबलीदानाला–सहज सिद्ध झाला. त्या

चांडाळाची ती प्राणघेती तरवार नबाबाज्ञेनें जणूं काय मदांध होऊन त्या निरपराधी धर्मनिष्ठ तरुणाचा अन्यायानें बळी घेणार—धर्माच्या पायांवर प्राणांचीं फुलें उधळण्यास सिद्ध झालेल्या त्या ब्राह्मणकुमाराचें शिर तुटून धरणीवर पडणार तोंच—

दिव्य प्रेमनिष्ठेनें प्रेरित पण निराशाग्रस्ततेनें देहभानावर नसलेली ती नबाबकन्या धांपा टाकीत धांवत धांवत त्या मरत्या तरुणावरील त्या मारत्या चांडाळाच्या उगारल्या गेल्या तरवारीपुढें उभी राहून शोकाकुलतेनें म्हणते " त्यांना नव्हे मला—जिच्यासाठीं माझ्या प्रेमदेवाचा प्राण बळी घेतला जात आहे—त्या मला मारा." तिला वाटलें आतां माझ्या प्रेमदेवाच्या प्राणावरचें माझ्या शेपटीवर जाओील आणि माझा पति—माझे खरे प्राण वांचतील. या करुणामय दिव्य दृश्यानें काय केलें ! त्या दिव्य व ओकनिष्ठ प्रेमानें त्या तरुणाच्या मनांतील मुसलमानी तरुणीच्या मूर्तीच्या कल्पनेचें ओक दैवी पतिव्रतेच्या मूर्तींत परिवर्तन केलें. मुसलमानी कुमारीचें चित्र त्याच्या मनोदृष्टीपुढून पुसटून जाऊन दिव्य पातिव्रत्यव्रताची उपासिका भक्तिनी त्याला तेथें दिसली आणि त्यानें तिला मनानें हिंदू करून घेऊन तो मरण्यास सिद्ध झालेला तरुण म्हणतो " मी तुझ्याशीं लग्न करण्यास सिद्ध आहे."

चांडाळ मागें सरला. तो धर्मनिष्ठ ब्राह्मण कुमार व पतिनिष्ठ नबाबकुमारी नबाबानें कुरवाळली व ब्राह्मणकुमारानें त्या कुमारीला सुखेनैव हिंदू करून घेऊन लग्न करण्याला त्या नबाबानें त्या तरुणाला पूर्ण संमति दिली. पण हा विपर्यस्त धर्मकल्पनाधारी हिंदुसमाज त्या मुसलमान कुमारीला हिंदू कसा करणार ! उलट त्या ब्राह्मणकुमाराला मुसलमानींत ढकलण्यास हिंदू समाज सिद्ध झाला. आपणांला त्या दिव्यकन्येसह हिंदुसमाजांत थारा देण्यास कोणीहि सिद्ध नाहीं हें पाहून त्यानें श्रीजगन्नाथाच्या चरणीं आपली कागाळी नेण्याचा व त्याचें पायाशीं धरणें धरण्याचा निश्चय करून तो जगन्नाथपुरीस गेला. हा ब्राह्मणकुमार यवनसंसर्गी झालेला. त्याला देवालयांत प्रवेश कुठला ! पण कमींत कमी जेथून श्रीजगन्नाथमूर्ती दर्शन होओील अशा महाद्वाराजवळील स्थानावर या विवाह निबद्ध होऊं पहाणाऱ्या युगुलानें धरणें दिलें. देव केवळ भक्तिप्रिय, यावर

त्यांचा विश्वास. व त्या विश्वासाच्या बळावर त्यांनीं आपलें भवितव्य अवलंबून ठेवून तेथें ठाण मांडलें. पण हे धर्मनिष्ठ (?) हिंदूंना कसें मान्य व्हावयाचें ? त्या देवालयांतील देवधर्म रक्षक (?) ×× नीं त्या खऱ्या देवधर्मनिष्ठेच्या ब्राह्मणकुमाराला त्या यवनकुमारीसह बसणें अशक्य करून टाकलें. त्याची निंदा, धिःकार होऊन माराच्या व बलात्कारानें उठवून लावण्याच्या धमक्या सुरू झाल्या व तेथपर्यंत पाळीही आली.

तो ब्राह्मणकुमार तरी मनुष्यच. मनुष्याच्या निष्ठेची तार खेचली जाण्यालासुद्धां मर्यादा असणारच. त्याचें मन विरक्त व विषण्ण झालें. हिंदुसमाज लाथा मारणार ! देव उपेक्षा करणार ! भक्तांची उपेक्षा देव करीत नाहीं असा चिरंतन अनुभव, पण कदाचित् हिंदूंच्या धर्मघातक कल्पनांच्या दोषासाठीं त्यांना चांगले कोरडे बसावेत म्हणूनच कीं काय कोण जाणे, देव पावला नाहीं व त्या ब्राह्मणकुमाराच्या मनोवृत्तीनें उलट खाल्ली. त्याच्या अकांतिक धर्मनिष्ठेचें कट्टर धर्मद्वेषांत रूपांतर झालें. आणि श्रीजगन्नाथाचे चरणापाशीं अवश्य तर प्राण ठेवण्यासाठीं आलेला तो कुमार हिंदुसमाजनाशनाची व देवमूर्तिभंजनाची प्रतिज्ञा करीत उठणारा महाभयंकर काळ—यवन बनून तेथून उठला. नबाबकन्येचें पाणिग्रहण तर त्यानें केलेंच पण तिला हिंदू करण्याचें कार्यीं हिंदूजातीनें अनन्वित छलपूर्वक अपयश दिल्यानें चिडून स्वतःच तो तरुण मुसलमान झाला. तो कट्टर हिंदू हिंदूंच्या अकांतिक मूर्खतेनें कट्टर मुसलमान झाला. त्यानें पुढें बंगालमध्यें हजारों हिंदूंना भ्रष्ट करून त्यांचे मुसलमानीकरण व शेकडो देवालयें व देवमूर्ती तोडून व फोडून हिंदुत्वनाशनाचा प्रयत्न हीं अितक्या भयंकरपणें केली, तो पुढें बंगालमध्यें "काला पहाड" म्हणून कुख्यात झाला. बंगालमधील मुसलमानी संख्या वाढण्याला हाच मुख्यत्वें कारणीभूत झाला ! असल्या काळ्या पहाडांना निर्माण करणारा हिंदू समाज जाति व राष्ट्रविघातक ठरला ! !

## (आ) अकबरविजयाची संधि गमावली !

दिल्लीचा मोंगल सम्राट अकबर सर्वांना ठाऊक आहेच. हा कट्टर मुसलमान नव्हता—निदानीं पुढें तरी राहिला नाहीं. 'आपण पूर्वी ब्राह्मणवर्णीय असून ब्रह्मचर्याश्रमीं राहून तपस्या करणारे होतो' अशी

स्मृति त्याच्या मनांत ठाण धरून होती. त्याची श्रीगंगेवरील भक्ति अितकी दृढ होती कीं, सज्ञान झाल्यापासून आजन्म श्रीगंगोत्रीचें पाणी कावडीनें आणवून तेंच तो पीत असे-दुसरें पाणी कधींहि प्याला नाहीं असें अुल्लेखिलेलें आहे. त्याच्या या स्मृतीमुळें आपण ब्राह्मण व्हावें अशी त्याला तीव्र अिच्छा झाली. या अिच्छेच्या अनुरोधें अकबरनें आपलें दुसरें नांव 'महाबली' ठेवलें होतें, त्यानें गोहत्त्येची निषेधाज्ञा प्रसिद्ध केली, मुसलमानीपणाची खूण जी दाढी ती काढून टाकली, यज्ञोपवित धारण करूं लागला, कपाळावर चंदनाचा टिळा लावूं लागला, हिंदुवरील झिझिया ( मुसलमानेतरांवर मुसलमान न होण्याकरतां लादला जाणारा कर ) काढून टाकला, बाटून मुसलमान झालेल्या हिंदूंची परत स्वधर्मस्वीकृतीची मनाअी नाहीशीं केली. व हिंदू पंडितांनीं आपणाला ब्राह्मण करून घ्यावें यासाठीं त्यानीं पुष्कळ प्रकारें प्रयत्न केले. अर्थात् ते त्याचे प्रयत्न सर्व विफल झाले हें निराळें सांगावयाला नको. जर ही त्याची विनंती हिंदू पंडितांनीं मान्य केली असती-हिंदू समाजाकडून या विनंतीला पाठपुरावा मिळाला असता-तर या अेका गोष्टीनें हिंदु समाजाचा-हिंदु संस्कृतीचा-हिंदु धर्माचा-थोडक्यांत म्हणावयाचें तर हिंदुस्थान राष्ट्राचाच अितिहास नव्हे तर त्या योगें सर्व जगाचा अितिहासहि बहुतांश प्रमाणांत पालटून गेला असता. अकबरासारख्या समर्थ, व महत्त्वाकांक्षी सम्राटाला जर हिंदु संस्कृतीनें पचविला असता तर कदाचित्-कदाचित् कां म्हणावयाचें...बहुधा...आशियाखंडाचें व त्यामुळें युरोपादि खंडद्वारा जगाचें भवितव्य किती दिव्य स्वरूपाचें झालें असतें याचें दृश्य कल्पनेच्या अुडवत्या पंखावर बसून अुंच मान करून पाहिलें तरीहि कल्पनादृष्टीला यथार्थत्वानें दिसूं शकणार नाहीं अितकें महनीय ठरलें असतें असें वाटतें. कारण अकबराला हिंदूसंस्कृतीनें पचविणें म्हणजे पुरातन ' विश्वमार्यंकुर्वन् ' या महत्तम वेदाज्ञाप्रेरित आकांक्षेचा हिंदु राष्ट्रानें केलेला पुनश्च हरिः ॐ झाला असता ! पण— ! ! विपर्यस्त कल्पनाग्रस्ततेनें हिंदू-राष्ट्राचा भविष्य कालांतील संभवनीय दिव्य विजय हिंदुस्थानांतील राष्ट्रीयभावनाविहीन हिंदु दृष्टीला दिसूं शकला नाहीं.

## ( अि ) काश्मिरांत हिंदूत्वहत्या.

काश्मीरच्या सांप्रतच्या दुर्दैवी महाराजांच्या पूर्वी तेथील सिंहासनावर सत्ताधिष्ठित असलेले हरिसिंहाचे चुलते यांनीं काश्मिरांत मुसलमानसंख्या फार आहे, ते सर्व मुसलमान हाडामांसाचे हिंदू आहेत, अितकेंच नव्हे तर वृत्तीनेहि हिंदूंच आहेत हें पाहिलें. कदाचित् मुसलमानी जगतांत निर्माण झालेल्या 'प्यानअिस्लामी' महत्त्वाकांक्षेचा खैस हिंदुस्थान भूमीवरहि थैमान घालील, आपल्या या मृत्युलोकांतील नंदनवन असलेल्या काश्मिरांत नारकीय दृश्य अुत्पन्न करील ही भावी भीति दूरदर्शित्वानें त्यांना दिसली असावी काय? कदाचित् असेंहि असेल. त्यांनीं मुसलमानांना हिंदू करून घेण्यासाठीं अेक हिंदूकरण योजना–अेक शुद्धीकरण योजना काढली; आणि ती योजना त्या वेळच्या तत्रस्थ निवडक अशा काश्मीरी पंडितापुढें मांडली. हिंदुस्थानच्या 'सनातनी' यांच्या बुद्धींत "हिंदूहित म्हणून होअूंच द्यावयाचें नाहीं" अशी राक्षसी प्रतिज्ञा करून विपर्यास–ग्रस्ततारूपी त्राटिकाच ठाण मांडून बसली आहे कीं काय कोण जाणें! त्या सनातन पंडितांनीं राजाला स्पष्ट सांगितलें कीं "अशा प्रकारें–मुसलमानांचे हिंदू करून घेण्याच्या योजनेनें हिंदुधर्म भ्रष्ट (?) करीत असलांत तर आम्हीं ही गोष्ट होण्यापूर्वींच येथील नदींत प्राण देअूं आणि आमची ब्रह्महत्त्या तुमच्या डोक्यावर बसेल!!" त्या राजानें या ब्रह्महत्त्येच्या भ्रमाला भिअून शुद्धीची योजना रद्दीच्या कोंपऱ्यांत टाकून दिली. हिंदूवृत्तीच्या मुसलमानांचें हिंदुकरण झालें नाहीं. पण त्या काश्मीरांतील मुसलमानांच्या हिंदूवृत्तीचें प्यानअिस्लामीकरण व्हावयाचें मात्र थांबलें नाहीं. तें या ब्रह्महात्येच्या भुतानें घडवून आणलें. काश्मीरच्या मुसलमानांत प्यान अिस्लामी वृत्ति पूर्णपणें बाणून बव्हांशीं मुसलमान असलेल्या काश्मीरावर हिंदू राजा राज्य करतो याची त्यांना खंति वाटूं लागली. सांप्रतच्या महाराजांविरुद्ध व तत्रस्थ हिंदूविरुद्ध त्या मुसलमानांनीं बंडाळा अुभारून तेथील हिंदूंना दे माय धरणी ठाय करावयाला लावलें आहे. पूर्व महाराजांची योजना जर चालूं दिली असती तर सर्व काश्मीर निर्यवन झाला असता. पण ब्रह्महत्येची अवदशा मध्यें आडवी पडून आतां

काश्मीर–सबंध काश्मीर–अहिंदू होण्याची वेळ आली आहे. काश्मीरांतील मुसलमानांनीं हिंदू होऊं नये म्हणून सनातनी पंडित नदींत बुडून प्राण देऊं म्हणत होते. आतां तेथील मुसलमानी मतांध गुंडाकडून "तुम्हीं मुसलमान झाला नाहींत–हिंदूच राहिलात तर नदीमध्यें बुडवून प्राण घेऊं" म्हणून त्यांना धमक्या मिळत आहेत. पूर्वमहाराजांच्या वेळच्या मुसलमानांतील हिंदूता या सनातनी मूर्खपणामुळें "आपण हिंदूराष्ट्रीयत्वाला मुकलो" असें म्हणत चिडून जाऊन या आम्हां बुद्धिभ्र॰ हिंदूंचा हा सूड तर घेत नसेल ना? कोणी सागावें?

## (ऑ) मलबारांत मुसलमान निर्मिति

आतां मलबारचें उदाहरण आठवूं:–मलबारची राजसत्ता पूर्वी सामुद्रीन (झामोरिन हा अपभ्रंश झालेला आहे) या वंशाकडे होती. अरबलोक समुद्रांत चांचेपणा करीत असत व हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर येऊन कांहीं स्थळीं व्यापारहि चालवित असत. मलबारचा सामुद्रिक व्यापार आरबांनीं आक्रमला होता. ही गोष्ट हिंदूंना समुद्रगमन निषिद्ध झाल्यावरची आहे. राजाला आपला देश समृद्ध असावा; आपली प्रजा संपन्न व्हावी; आपल्या राज्यांतील धन आपल्याच देशांत राहून उलट अितर देशांतून व्यापारादिकद्वारा धन आपल्या देशांत यावें; असें वाटणें साहजिक आहे. तसेंच सामुद्रीन राजालाहि वाटलें. आपल्या राज्याचा व्यापार आरबांच्या हातीं आहे. व त्यामुळें सामुद्रिन व्यापारद्वारा धन परक्यांचे हातीं जातें हें ठीक नाहीं. तें आपल्या राज्यांतच रहावयाला पाहिजे आहे. आणि यासाठीं सामुद्रिक व्यापार आपले प्रजेच्या हातीं असला पाहिजे अशी बुद्धि त्याला अुत्पन्न झाली. पण सामुद्रिन राजाची प्रजा सर्व हिंदू व हिंदूंना समुद्रयान निषिद्ध ही अडचण त्याच्यापुढें येऊन ठेपली अर्थात् या धार्मिक पेचांतून मार्ग काढावयाकरितां त्यांनीं आपल्या राज्यांतील सनातनी पंडित बोलावून त्यांचेपुढें हा प्रश्न टाकला. सनातनी पंडितांची बुद्धिमत्ता अचाट व तर्कशक्ति विलक्षण असावयाची हें ठरलेलेंच; सर्व पंडित गोळा झाले. व विचार चालूं लागला. 'पंडित' आलें कीं विचार चालला. पंडितांची व विचाराची अेकत्र गांठ पडावयाचीच नाहीं असें जणूं आकाशांतल्या ग्रहांनीं व

हिंदुस्थानच्या दुर्दैवानें आतांशा ठरवूनच टाकलेलें. पंडितांनीं पाहिलें कीं हिंदूंना समुद्रयान निषिद्ध, मुसलमानांना निषिद्ध नाहीं, सनातन दोन विधेयें सांपडलीं, आणि या अविच्छेद्य अशा दोन सनातन तत्त्वाच्या आधारावर राजापुढें पडलेल्या प्रश्नाचें अुत्तर शोधावयाचें त्यांनीं ठरविलें. त्यांची तर्कशक्ति अुत्तर शोधूं लागली. 'सनातन' बुद्धीच्या तर्कशक्तीला अगम्य असें काय आहे! या प्रश्नाची त्यांनीं तेव्हांच रेवडी अुडवली! त्यांनीं पाहिलें.

१ हिंदूंना समुद्रयान निषिद्ध—२ मुसलमानांना निषिद्ध नाहीं.

३ मलबारांत हिंदूच हिंदू— ४ म्हणून सामुद्रिक व्यापार आपल्या हातीं नाहीं—परकीय मुसलमानी हातांत आहे.

५ आपल्याला तो व्यापार पाहिजे—६ म्हणून आपल्या राज्यांत स्वकीय मुसलमान पाहिजेत.

७ यांकरितां प्रत्येक घरांतून अेक अेक मुसलमान होअूं द्यावा. म्हणजे सामुद्रिक व्यापार आपल्या प्रजेकडे राहील!!

या सात पायऱ्यांची सप्तपदी करून राजाच्या मनांत अुत्पन्न झालेल्या प्रश्नाचिंतेचे सनातनी बुद्धीच्या तर्कशक्तींतून जन्म पावलेल्या अुत्तराशीं त्यांनीं लग्न लावून दिलें. आणि पंडितांनीं मलबारांतील परकीय व्यापारद्वारा बाहेर जाण्याऱ्या धनाला मोठ्या कुशलतेनें (!) बांध घातला. झालें—प्रश्न सुटला!

त्या वेळच्या हिंदू मतांत व आत्तांच्या हिंदु मतांत आकाशपाताळाचें अंतर. त्यावेळीं धर्म हा प्राणाहून प्रिय व जिवाहून महत्त्वाचा वाटत होता. बुद्धिविपर्यासानें धर्महानि अतोनात झाली हें खरें पण त्या धर्मप्राण पिढ्यांच्या वेळीं यथार्थ बुद्धिदातावर्ग अस्तित्वांत असता तर या राष्ट्राचें महत्व दिगंताला पोंचलें असतें—वैभव जगद्व्यापी झालें असतें. धर्म म्हणजे कःपदार्थ आहे, संस्कृतींत कांहींच अर्थ नाहीं—आम्हांला धर्मादिक ढोंग-धत्तुरे कांहीं नकोत—केवळ खायला प्यायला यथास्थित व अुपभोगाकरितां भोगसामुग्री विपुल असली म्हणजे संपलें. अशा पशुधर्मवृत्तीचे वर्चस्व हिंदू मनावर त्यावेळीं नव्हतें. अितकेंच नव्हे तर या वृत्तीचा वासहि हिंदू मनाला त्या वेळीं शिवला नव्हता व म्हणूनच असल्या बुद्धिभ्रष्टतेचें

प्राण घेणें धक्के बसत गेले तरीहि हिंदू समाज अद्याप तगून राहिला आहे. मुसलमान होण्याकरितां दवडल्या जाणाऱ्या प्रत्येक घरांतील तरुणाच्या मनाला काय वेदना होत असतील याची कल्पनाच केलेली बरी. आओी-बाप, अिष्टमित्र, आप्त गणगोत सोडावयाचे म्हणजे केवढें संकट. हेंही धर्माकरितां सोडावयाचें ठरलें तर तें सोडूनही ज्या धर्मासाठीं जगांतील सर्व भाग्यावर—स्वतःच्या प्राणावर सुद्धां—अंगार ठेवून धर्महानि न होअूं देणाऱ्या त्या काळच्या हिंदू तरुणांना धर्म सोडून मुसलमान व्हावयाचेंवेळीं काय वेदना सहन कराव्या लागल्या असतील त्या अेक त्यांच्या मनाला वा देवालाच ठाअूक असणार !

अशा त्या धर्मनिष्ठ तरुण मनांना प्रत्येक घरांतून अेक याप्रमाणें मुसलमान होण्याला त्यावेळच्या वडील पिढीनें आज्ञापिलें: आणि मोठ्या कष्टानें —अनिच्छेनें—व निरुपायानें राजाची अिच्छा व वडिलांची आज्ञा म्हणूनच केवळ अेकअेकानें मुसलमान होण्याला सुरवात केली. गणगोत, अिष्टमित्र, घरदार, आओीबाप आणि सर्वांहून प्रियतम पवित्र धर्म सोडून जाणाऱ्याच्या मनाला थोडीतरी समाधानाला जागा असावी म्हणून अेवढा मोठा स्वार्थत्याग करून जाणाऱ्याला 'मोपला' (बडा मुलगा—धन्य तरुण) अशी पदवी राजांनीं समर्पण केली. सांप्रतचे मलबारचे सर्वश्रुत असलेले मोपले हें हिंदूंनीं आपल्या आतड्याकातड्याचे अंश तोडून काढून मुसलमान बनविलेल्या हिंदुतरुणांचे वंशज आहेत. त्या धर्मनिष्ठ हिंदू तरुणांच्या मनांतील हिंदूतेजें, हिंदूकडूनच मारली जाण्याच्या नृशंस हत्येनें, पिशाचें बनून सांप्रतच्या मोपल्यांचे रूपानें त्याच मलबारांतील हिंदूंच्या छातीवर बसण्याचें त्यांनीं ठरविलें असावें आणि त्याच पिशाच्चांच्या स्मशाननृत्याचे देखावे मोपला-बंडाच्या रूपानें दिसले असावेत असें कोणाला वाटणार नाहीं बरें !

असो; कोळसा अुगाळावा तितका काळाच निघणार! हिंदुसमाजाची व समाजधुरींणाची मति कशी भ्रष्ट झाली होती आणि अखिल हिंदुत्वाची व हिंदुराष्ट्रीयत्वाची यथार्थ जाणीव नसल्यामुळें विभिन्न धर्ममतांच्या भक्षस्थानीं हिंदु समाज कसा पडत गेला हें दिलेल्या अुदाहरणांवरून कळणें अत्यंत सुलभ होअील यांत शंका नाहीं.

३. **पारतंत्र्य**—राहतां राहिलें पारतंत्र्य. याविषयींचा विचार केला असतां असें दिसून येतें कीं पारतंत्र्य ही सर्व संकटाची व आपत्तींची खाणी आहे. पारतंत्र्यांत राष्ट्रांतील सद्गुणांना दुर्गुणाचें स्वरूप येतें. दुर्गुणांनीं व वैगुण्यांनीं राष्ट्राची अपरिमित हानि होतें हें त्रिवार सत्य आहे. पण हें पारतंत्र्य हिंदुस्थानवर आलें कां? याचा विचार करतां त्या पारतंत्र्य दावाग्नींत हिंदुस्थान भाजून निघण्याला काय कारण आपल्याला दिसून येतें हें पाहिलें पाहिजे. शौर्य, वीरता, पराक्रम, निर्भयता, बुद्धिकौशल्य, रणनैपुण्य व असीम स्वार्थत्याग अित्यादि ज्या गुणांच्या समवायानें राष्ट्र परचक्रांशीं झगडून स्वातंत्र्य मुगुट सुरक्षित राखूं शकतें ते सर्व गुण हिंदुस्थानांत भरपूर किंबहुना अितर कोणत्याहि जागतिक जातीपेक्षां अधिकत्वानें आपणां हिंदूंत निवसत होते, अशी अितिहास मुक्तकंठानें साक्षी देत आहे. मुसलमानी साम्राज्य भरतखंडांत वर्धिष्णु करून सर्व देश मुसलमानी पारतंत्र्याच्या खाअींत ढकलणारे मोठाले मुसलमान बादशहा म्हटले म्हणजे अकबर व अवरंगजेब हे होत. महाराणा हिंदूसूर्य प्रताप त्रिकालध्रुव प्रयत्नानें अकबराशीं विषम लढा लढवीत असतांना त्याच्या राष्ट्राभिमानाला पददलित करूं धावणारा राष्ट्रांगार मानसिंह—राजपुत—हिंदूच होता. अकबराच्या बादशाहीच्या विस्ताराचें सर्व श्रेय—यथार्थत्वानें पाप—याच नीच मानसिंहाच्या माथीं आहे. अवरंगजेबाचा समर्थ सेनापती राजा जयसिंह हाहि हिंदूच. मुसलमानी आक्रमणापासूनच्या अितिहासांत अेक तर मुसलमानी कपटाला व विश्वासघाताला बळी पडलेले हिंदू अथवा हिंदूंच्याच तरवारीनें मुसलमानी साम्राज्यतृष्णेला बळी दिलेलें हिंदू असा देखावा सर्वत्र दिसून येतो. मुसलमानी बादशाहीच्या भक्षस्थानीं हें हिंदू राष्ट्र बळी पडण्याचीं मुख्य कारणें म्हणजे मुसलमानी कपटाला बळी पडणारा हिंदूंचा खुळसट सत्यनिष्ठेचा भोळसटपणा अथवा अखिल हिंदू दृष्टि वा हिंदू राष्ट्रदृष्टि अुघडलेली नसल्यामुळें स्वजनघाती वतणूक हीं दोन सर्व अितिहासभर पसरलेलीं दिसून येतात.

अखिल हिंदूदृष्टि व हिंदू महा—राष्ट्रभावना या दोन गुणांच्या समवायाची दिव्य ज्योति श्रीसमर्थ व छत्रपति श्रीशिवराय या दोन महाराष्ट्रीय पुरुषांनीं महाराष्ट्री हिंदूंच्या मनांत अुत्पन्न करतांच हिंदूंमधील प्रज्वलनशील

सद्गुणांना दिव्यता येऊन भारताचा गळा घोटूं निघालेल्या मुसलमानी पारतंत्र्याचा चक्काचूर करण्याचा डाव मांडला गेला होता. पण ती "स्वजनेषुवैरा" ची डाकिण जागृत होऊन तिनें पुन्हां हिंदू मनाला पछाडलें आणि अेका पारतंत्र्यांतून सुटून अुभा होअूं पहाणारा हिंदुस्थान दुसऱ्या अधिक भयंकर अशा पारतंत्र्यपाशांत सांपडला. हिंदूपदपातशाहीच्या प्रधानाचें महत्त्व व सामर्थ्य नाहींसें करण्यासाठीं सातारच्या भोळ्या प्रतापसिंहाला हातीं धरून अिंग्लिश कंपनीसरकारनें हिंदुपदपातशाहीची सत्ता अुधळून लावली. शिंदे खाल्ले तेव्हां होळकर स्वस्थ. होळकराला मार दिला तेव्हां शिंदे स्तब्ध. पेशव्यांविरुद्ध अिंग्लिशांचा हात स्वीकारणारा सातारचा राजा गिळला गेला त्याची शिंदे–होळकर–गायकवाड आदिक हिंदुपदपातशाहीच्या स्तंभांना खंति नाहीं. आपल्या सरदारकीला राज्यपदाचें स्वरूप आणण्याची कुबुद्धि त्यांना त्यावेळीं सुचली. ते सरदारांचे राजे झाले पण अिंग्लिश सत्तेच्या तालावर नाचणारे वा नाचविले जाणारे बुद्धिबळी राजे ठरले. पंजाबचा सिंह महाराज रणजितसिंह गेला तेव्हां अुरलेल्या शीख राज्यांतील राजपुरुषांच्या फुटीनें शीखांचें हिंदुराज्य बुडविलें. सगळ्या राजामहाराजांनीं व मोगली बादशाहीच्या अुर्वरित चिंध्या झालेले नामधारी बादशहादिकांनीं अेकत्र होअून १८५७ सालीं हिंदुस्थानस्वातंत्र्याची अुठावणी करून हिंदुराष्ट्र स्वतंत्र करण्याचा प्रचंड प्रयत्न आरंभिला. पण तो प्रयत्न हिंदू जातींतील शीख व गोरखा यांच्याच पलटणींच्या बळावर अिंग्लिशांनीं विफल केला. हीं अैतिहासिक सत्यें पहातां हिंदू संख्येनें कमी म्हणून, शौर्याच्या अभावासाठीं, स्वार्थत्यागाची व आत्मबलिदानाची अुणीव होती त्याकरितां, वा दुसऱ्या कोणत्याही कारणानें हिंदू राष्ट्राचा गळा पारतंत्र्याच्या जीवघेण्या पाशांत अडकला गेल्याचें दिसत नसून हिंदूंत अखिल हिंदुजातीय दृष्टि व हिंदूराष्ट्रभावना ही प्रखरतेनें व सार्वत्रिक दृष्टीनें प्रकट झालीं नाहींत म्हणून पारतंत्र्यानें या हिंदू राष्ट्राला ग्रासण्यांत यश मिळविलें असेंच स्पष्ट दिसून येतें.

आजही याच गुणांच्या अभावानें जेथें तेथें हिंदूंना खालीं पहावें लागत आहे. प्रत्येक अहिंदू समाजानें धमकी देण्याचा अवकाश कीं हिंदू आपला नमलाच. भारतीय राजकारणशास्त्रांत—नीतिशास्त्रांत—प्रयत्नशीलतेचे पर्याय

सांगितले आहेत. आपला अधिकांत अधिक लाभ साधावयाचा व हानि कमींत कमी होऊं द्यावयाची व शक्य तर मुळींच होऊं द्यावयाची नाहीं हा अुत्तम पक्ष. यांत कोणाचाच मतभेद होणें शक्य नाहीं. बुद्धि ठिकाणीं असली तरच योग्य मार्गावलंबनाचा संभव असतो. विपर्यस्त बुद्धीकालीं विपर्यस्त मार्गावलंबन हें निश्चित ठरलेलें असावयाचें असा सर्वत्र अनुभव आहे. सध्यां हिंदूंची राष्ट्रकल्पना विपर्यस्त झाल्याकाळीं जेवढें राष्ट्रहितार्थ म्हणून प्रयत्न होत आहेत तेवढें सर्व या हिंदूराष्ट्राची निश्चित हानि करणारे ठरत गेले. राष्ट्रीय समारंभकालीं जरी राष्ट्रकल्पना विपर्यस्त झाली होती तरी "हिंदूंच्या हानींतून राष्ट्राचें हितसाधन करावयाचें" हें महामूर्खतेचें सूत्र जोंपर्यंत राष्ट्रीय सभेच्या गळ्यांत बांधलें गेलें नव्हतें तोंपर्यंत राष्ट्रहित-साधन जरी यथार्थपणें घडलें नाहीं, तरी पण राष्ट्रहानिकर तरी कांहीं विशेषसें केलें गेलें नाहीं; परंतु लोकमान्य टिळकांच्या मृत्यूनंतर राष्ट्राचे हितेच्छेच्या विपर्यस्ततेनें हिंदूंचे अनहितांत राष्ट्रहित साधेल असें समज-ण्याचा परिपाठ पडला. हिंदुस्थान जर हिंदूंचा असेल, हिंदुस्थान हें हिंदु राष्ट्रच आहे ही गोष्ट जर सत्य ठरेल तर हिंदूंच्या अनहितांत राष्ट्रहित याचा अर्थ हिंदूंच्या म्हणजे हिंदूराष्ट्रांच्या अनहितांत हिंदूराष्ट्रहित; अेखाद्याला लुबाडण्यांत त्याचा लाभ; ठार मारण्यानें जीवदान अशी वदतोव्याघाताचीं म्हणणींहि तितकींच शहाणपणाचीं व बुद्धिमत्तेचीं मानावीं लागतील. अेकच अुदाहरण अशा बुद्धिहीनत्वाचें पहावयाचें असेल तर सांप्रतच्या राजकीय चळवळीमधील राष्ट्रीयसभेचें वा त्या संस्थेच्या मुख्य सूत्रधारांचें वर्तन पाहिलें असतां स्पष्टपणें दिसून येअील. वर अुत्तम प्रतीच्या प्रयत्न-कार्याचें लक्षण आपण पाहिलें आहे. हीन प्रतीच्या प्रयत्नकार्यामध्यें श्रेणी लागतात. कोणीहि मनुष्य म्हणा वा समाज म्हणा तो जी हानि अुठवि-ण्यास सिद्ध होतो तो लाभाच्या आशेनें होय. अशा वेळीं स्वाभाविकपणें हानीपेक्षां लाभ अधिक असेल तेथेंच सुबुद्ध मनुष्य हानि सोसण्यास सिद्ध असावयाचा. पण जेव्हां ज्या लाभाच्या आशेनें हानि सोसावयाची तो लाभ हानीशीं तुलना करतां जर समसमान ठरला तर तो प्रयत्न करण्यांत अर्थ नसतो. पण तसाहि प्रयत्न करणारे 'शहाणे' कांहीं असतात. अशा प्रयत्नकर्त्यांना राजकारणशास्त्रांत

**समायव्ययः कार्यारंभो रासभिकानाम् ॥**

हानिलाभ सारखाच असणाऱ्या कार्याला हात घालणारे म्हणजे केवळ ओझ्याचें वाहक गाढवासारखे आहेत असें म्हटलें आहे. आणि याहि पुढें जाऊन थोड्याशा वा काल्पनिक लाभासाठीं अनिवार हानि–सरतेपर्दी लाभापेक्षां अधिक प्रमाणांत हानि–करून घेणारांना नुसतें मूर्ख न म्हणतां

**बहुक्लेशेनाल्पफलः कार्यारंभो महामूर्खानाम् ॥**

पुष्कळ क्लेशांनीं वा हानि सोसून अल्पशा फलाची, लाभाची आशा राखीत त्यासाठीं कार्यारंभ करणारे महामूर्ख समजले पाहिजेत असें स्पष्ट मत दिलेलें आहे.

राष्ट्राच्या प्रातिनिधिक कार्यसमितीमध्यें राष्ट्राच्या हितावर केवळ लक्ष देऊन व्यक्तिगत वा वर्गभेदार्थ पक्षपात न करतां राष्ट्रसेवाकार्थ करणारे लोकच निवडून येणें आवश्यक आहे हें सामान्य मनुष्यालासुद्धां सहजगत्या कळण्यासारखें आहे. या प्रतिनिधींची निवडणूक करतेवेळीं निवडणुकीच्या पद्धतींत वर्गवारी, वर्णवारी, व्यवसायवारी वा जातवारी तत्वाचा जर शिरकाव केला तर ‘ प्रतिनिधि ’ होऊन आलेले लोक राष्ट्राचे खरे प्रतिनिधि न होतां ते आपापल्या सवत्या सुभ्याचे संकोचित हित पाहणारे व राष्ट्रहिताकडे सतत दुर्लक्षच करूं ठरणारे असल्यामुळें निवडणूकीच्या पद्धतींत पक्षभेदाचें तत्त्व शिरतां कामा नये; हें सूत्र वा हा दंडक अत्यंत श्रेयस्कर आहे याविषयीं कोणाचाहि वाद नाहीं. पण सध्यांच्या राष्ट्रीयसभेच्या चालीकडे अथवा राष्ट्रीयसभेच्या वतीनें प्रयत्न करणाऱ्या ‘ पुढारी ’ वर्गाकडे पाहिलें असतां काय दिसतें ! निवडणुकीची पद्धत संयुक्त–अेकरूप–भेदविरहित ठेवण्यासाठीं ज्या पक्षभेदाच्या वा वर्गवारीच्या भुताला गाडलें पाहिजे, त्या भुताला घरांत आधीं सुरक्षित जागा देऊन मग घराशीं अेखाद्या मांत्रिकाला बसवीत “ घरांत अेखादें भूत शिरूं देऊं नको ” अशी त्याला विनंति करण्यासारखें प्रयत्न राष्ट्रीयसभेचे चालले आहेत. मुसलमान म्हणून तुम्ही अितक्या जागा अडवा, खिस्ती आहांत यासाठीं अितक्या जागा तुम्ही घ्या, युरोपियनांनो ! तुम्ही अितक्या जागा आपल्या हातीं ठेवा, आणि तुम्ही सर्वजण या स्वतंत्र मतदानानें संतुष्ट होऊन मग संयुक्तमतदारसंघाच्या ( प्रेताची ? ) प्रतिष्ठापना करण्यास संमति द्या असा प्रकार राष्ट्रीयसभा

करीत आहे. बैल विकून गोठा बांधण्यासारखें वा अितकें शहाणपणाचें (!) हें कृत्य आहे. अशा या वाटावाटींत सर्व जागा अितरांनीं पटकाविल्यावर अुरलेल्या शितावर हिंदूराष्ट्रहिताच्या भुकेल्या पोटाला तृप्त व्हावयाला सांगावयाचा अुपद्याप पाहिला म्हणजे राष्ट्रीयांच्या हितावर पाणी सोडून राष्ट्रहित करूं धावणाऱ्या या लोकांचें कृत्य वर दिलेल्या संस्कृत सूत्राची आठवण करून देतें. किंबहुना तेंहि विशेषण कमीच वाटतें. कारण त्यांत बहुहानीमध्यें अल्प का होओीना पण लाभ आहे. येथें पहावें तर हानीचा डेरा भरलेला आणि लाभाच्या दृष्टीनें आवळ्याअेवढें पूज्य. संयुक्त मतदारसंघ देशांत असावा हें वर्गवारीचें व जातवारीचें भूत दैशिक राजकारणांत शिरूं नये म्हणूनच ग्राह्य ठरलेलें आहे. राष्ट्रीयसभेचा सांप्रतचा ' संयुक्तमतदारसंघ ' ज्या भूतबाधेचा निवारकमंत्र म्हणून स्वीकारावयाचा त्या भूतबाधेच्या आवाहनाचाच मंत्र ठरत आहे. अितरस्थळीं संयुक्तमतदारसंघ अुत्पन्न करून विभक्ततेचा बळी घेतला जातो—राष्ट्रांतून विभक्ततेला हाकून दिलें जातें. आमच्या हिंदू ' राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं ' मुसलमान, ख्रिस्ती, युरोपियन अित्यादींचे सवते सुभे पहिल्यानें अुभे करून मग त्या पडत्या व पाडत्या पायावर अुभारलेल्या मतदारसंघाला संयुक्तमतदारसंघ म्हणावयाचा घाट घातला आहे. अेक खोटें काम केलें म्हणजे त्याची परंपरा खोट्याचाच अुठाव करीत जात असते, त्याचप्रमाणें राष्ट्र शब्दाची विपर्यस्त कल्पना करून घेअून राष्ट्रकारणांत पाय ठेवणारांची चाल चुकत्या राष्ट्रकल्पनेप्रमाणें सर्व गोष्टींत विपर्यस्त स्वरूपाचीच असावी वा असते यांत काय आश्चर्य ! हिंदुस्थानमधील हिंदूंनीं ज्याप्रमाणें खऱ्या राष्ट्रीयतेकडे पाठ फिरवून ' राष्ट्र ' या नांवाचें अर्थहीन फोलकट हातांत धरीत स्वतःची फसवणूक करून घेतली आहे. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत रहाणाऱ्या सर्वांची—धन्याची व बिऱ्हाडकरूंची—राष्ट्रीयांची व अल्पसंख्याकांची ' संयुक्तमतदारसंघ ' या शब्दाच्या नामधारी स्वरूपाला संमति मिळविण्याकरितां मोल म्हणून जातवारीच्या भुताला राष्ट्रकारणांत हिंदूंनीं सिंहासनाधिष्ठित केलें आहे. राष्ट्राच्या अभंगत्वाचे मुळावर कुऱ्हाड घालून त्या तुटल्या राष्ट्रहिताच्या पडत्या वृक्षाचे बुंधावर ' अभंग वृक्ष ' अशी पाटी लावल्यासारखें त्यांनीं हें कृत्य केलें आहे. काल्पनिक हितसाधनाच्या नांवासाठीं प्रत्यक्ष राष्ट्रहित हिंदू पुढाऱ्यांनीं बळी दिलें आहे. या

कार्यकर्त्यांची कोणती श्रेणी समजावी असा जेव्हां प्रश्न डोळ्यापुढें अुभा राहतो तेव्हां ‘ बहुक्लेशेन...’ या सूत्रांतील विशेषणहि अपुरेंच पडल्याचा भास होतो.

अशी ही दैना आम्हां हिंदूंची कां झाली ? याचें कारण काय ? आतांपर्यंत अंतर्गत विभिन्नता, विधर्मीय मतांचीं आक्रमणें, पारतंत्र्याचा भारत - वरील प्रहार या गोष्टींना ज्या अेकाच कारणांनीं जन्म दिला त्याच कारणानें सध्यांहि हिंदुराष्ट्राचा खेळखंडोबा चालविला आहे. विवेकभ्रष्टाचा विनिपात-अधःपात–शतशः प्रकारें होतो असे अनुभवी महापुरुषांचें अनुभवी म्हणणें आहे तेंच येथें सर्वतोपरी व तंतोतंत लागू पडलेलें दिसतें.

व्यक्तीचा ‘मी’ व राष्ट्राचा ‘मीं’ हा आपल्या यथार्थ व खऱ्या ‘स्वत्वाच्या’ बळावर व त्या स्वत्वाच्या साधनांचा अुपयोग करीत अुन्नतिशील बनूं शकतो. खऱ्या स्वत्वाच्या साधनांचा त्याग करून विपर्यास स्वरूपीं मृगजळाच्या मागें जेव्हां कोणाचाहि ‘मी’ लागतो त्यावेळीं त्याच्या खऱ्या स्वत्वाचा आधार तुटल्यामुळें निरालंब, निराधार, व म्हणून दीन आणि आणि दुबळा असा तो बनतो. भ्रमानें लागलेल्या विपर्यास्त स्वत्वाचा ध्यास खरा नसल्यामुळें तेथेंहि त्यास लाथा खाव्या लागतात. हिंदू समाजाचें तसेंच झालें आहे. हिंदुसमाजाचा ‘मी’ भ्रमशील बनून स्वकीय हिरा टाकीत गारगोटीच्या मागें लागला आहे. अेखाद्या सम्राटाला स्वप्नांत राज्यहरण झाल्याचा भ्रम होअून दीन निराधार व सत्वहरण झाल्यासारखा तो आक्रंदत अुठावा आणि जो येअील त्याला मिठ्या मारीत दीनवाणीनें आत्मरक्षणार्थ करुणा भाकूं लागावा अशी स्थिति या हिंदुसमाजाची सांप्रत झाली आहे. जगांमध्यें श्रेष्ठ नैसर्गिक देणग्यांनीं सुसंपन्न असा हिंदुस्थान देश, कालांशीं स्पर्धा करणारी त्या देशांतील हिंदूजाति, जगच्चालक अीश्वराचें प्रत्यक्ष अीश्वरपदावर तुझा हक्क आहे असें प्रतिपादीत त्या महत्तमपदाचा अधिकार हातांत घेण्याचा मार्ग तुम्हांतील प्रत्येकाला आपापल्या योग्यतेप्रमाणें दाखवणारा समर्थप्रवर धर्म, अुघड्या डोळ्यांनीं बघणाऱ्या प्रत्येक दर्शकाला दिपवणारी दिव्य संस्कृती, आणि सर्व हिंदुभाषांना आधारभूत व त्यांना चिंतामाणिसदृश शब्दभांडार पुरविणारी श्रेष्ठतम संस्कृतभाषा असल्या देवदुर्लभ स्वत्वाचा हा हिंदुसमाज अधिकारी आहे. असें असतांहि अुपरो-

लिखित सम्राटासारखा भ्रमशीलतेनें हिंदुसमाज दीन व दुबल होऊन जो दिसेल त्याची पायधरणी करीत सुटला आहे. त्याला आपल्या स्वत्वाचा विसर पडला आहे. आपले जन्मदत्त अवयवच आपल्याला नाहींत असें कल्पून शेणामातीचे अवयव आपले अंगाला चिकवटून घेत सावयव शरीर बनवण्याचा प्रयत्न करणाऱ्या अखाद्या भ्रमरोगी मूर्खाप्रमाणें स्वतःचें खरें जन्मजात राष्ट्रीयत्व विसरून राष्ट्रविघातक मार्गावलंबनानें चुकल्या राष्ट्रकल्पनेची अुभारणी करण्यांत हा हिंदुसमाज मग्न झाला आहे. ही भ्रमशीलता गेली पाहिजे. चुकल्या मार्गाचा त्याग झाला पाहिजे. तरच या हिंदुसमाजाचा, हिंदूंच्या हिंदुत्वाचा, या आखिल हिंदुराष्ट्राचा तरणोपाय आहे--नान्यः पन्थः विद्यते.

## पर्यालोचन.

हिंदूवाचकगण ! आतां आपणांला येथपर्यंत केलेल्या विचारांचें पर्यालोचन करणें आहे. राष्ट्रमीमांसा नांवानें बघितलेल्या पूर्वार्धांत राष्ट्र शब्दाची व्याख्या काय वा राष्ट्राचे घटक कोणते हें पहाण्यासाठीं पाश्चात्य भाषाकोशकार, पाश्चात्त्य राजकारण शास्त्रकार, पौर्वात्य राजकारण शास्त्री, सर्व जगांतील लोकांची समजूत, राष्ट्रसंघ ( लीग ऑफ नेशन्स ), यांच्या सर्व मतांची, विधानांची-निर्णयांची पहाणी केली. आणि त्या सर्वांच्या निरीक्षणानें व परीक्षणानें राष्ट्राचे घटक काय आहेत हें सर्वांच्या अेकवाक्यतेनें व अेकमुखानें आपणांला कळलें. अमुक अमुक राष्ट्रघटक आहेत हें कळलें तरी जगांतील देशांमध्यें त्या अेकमुखी निर्णयानुसार राष्ट्राचे घटक मानण्याचें कार्य प्रत्यक्ष व्यवहार्यतेंत अुतरलें आहे कीं नाहीं हें पहाण्यासाठीं पुढें निरनिराळ्या प्रमुख देशांच्या राज्यघटना तपासून आणि त्यांतून पूर्वनिर्णित राष्ट्रघटकांचेंच अक्षुण्णघटक कसें निरपवादरीत्या सांपडतात हें पाहून पूर्वार्धाच्या शेवटीं आरंभीं केलेलें विधान म्हणजे

**राष्ट्र–देश, जाति, धर्म, संस्कृति व भाषा**

या घटकांचें मिळून होतें हें विधान सत्य, सर्व जगमान्य व सर्व जगस्वीकृत आहे हें आपणांपुढें निश्चितपणें मांडलें गेलें.

जगाच्या ' स्वत्व ' व ' सत्व 'रूप भ्रमणकेंद्रांचा विचार करून स्वत्व संरक्षणार्थ व तद्द्वारा सत्वसाधनार्थ सर्व विश्वांत व्यक्तिशः व समुदायशः कसा सर्वत्र प्रयत्न होत असलेला दिसून येत आहे, तसा प्रयत्न होणें हें कसें नैसर्गिक व सृष्टिनियमानुकूल आहे हें पाहून या निसर्गनियमाविरुद्ध जाणारा स्वत्वाला गमावून शेवटीं आत्महत्यारी कसा बनतो हें पाहिलें. आपल्या हिंदू समाजाचें स्वत्व किती दिव्य, किती उत्कृष्ट, किती श्रेष्ठ व किती संरक्षणीय आहे हें सांगून सांप्रतच्या स्थितीचे निरीक्षणाला प्रारंभ केला. सध्याचे स्थितीचा विचार करतां हिंदूंच्या हिंदुराष्ट्रावर कसकशा आपत्ति आल्या, त्या आपत्तींत हिंदूंच्या मनांतून ' स्वत्वा 'चा ठाव पुसून टाकण्याचे प्रयत्न प्रतिपक्षियांकडून कसकसे होत गेले व त्यामुळें हिंदू-मतांत विपरीत राष्ट्रभावनेची परिपुष्टी होऊन हिंदू अगतिक होत अधिकाधिक विपन्नावस्थेंत कसें येत गेले हें पाहिलें.

या दुःस्थितीच्या दूरीकरणाचा उपाय धुंडावयाचा म्हणून दुःस्थिती-निवारणार्थ त्या दुःस्थितीच्या मुख्य व एकमेव कारणाचा शोध करणें अवश्य वाटून हिंदुसमाजांतील आपत्ति, बाहेरील धार्मिक भ्रष्टीकरणाचीं आक्रमणें व त्यामुळें हिंदुसमाजाचा होणारा संख्याक्षय, आणि सरतेशेवटीं सर्व आपत्तींचें व संकटांचें परिपोषण–वर्धन–आणि नवनवोत्पादन करणारें महासंकट जें पारतंत्र्य या सर्वांची हिंदुस्थानावर–या हिंदुराष्ट्रावर–जी धाड पडली तिचें मूलकारण शोधतां हिंदूंच्या स्वत्वविस्मरणांत व तदुद्भूत विपर्यस्त राष्ट्रकल्पनेंत तें मूलकारण कसें सांपडतें हें विस्तरतः पाहिलें. अंतीं सांप्रतच्या वर्तमानकालीन राष्ट्रोद्धारप्रयत्नकालीं हिंदू प्रत्येक पदीं अपमानित, पददलित व अपयशी होऊन त्यांच्या दीन दुर्बलासारख्या निराधार झालेल्या स्थितीचेंहि कारण, विपर्यस्त राष्ट्रकल्पनेच्या अतिरेकानें स्वत्वाचा–स्वतःच्या हिंदूराष्ट्रीयत्वाचा–विसर पडून तो आधार नाहींसा झाला हेंच आहे हें स्पष्ट कळून आलें. आपल्यावरील या भयंकर विनाशक महदापत्तींच्या कचाट्यांतून सुटण्यासाठीं

## आपण हिंदूंनीं काय केलें पाहिजे ?

श्रीहनुमान लहानपणीं फार खोडकर असत. त्या खोड्या जरी त्रासदायी

हेतूनें होत नसून खेळाडू स्वभावानुसारच होत असत तरी त्या वनांतील तपीतपस्यांना त्यांपासून अुपसर्ग पोंचत असे. असें बरेंच दिवस चाललें व पुढें त्या अुपसर्गत्रस्त तपस्यांनीं श्रीहनुमानांना "तुला आत्मविस्मृति होअून दुसऱ्या कोणीतरी तुझ्यांतील खऱ्या शक्तीची जाणीव करून दिल्यावांचून तुला तुझी शक्ति कळणार नाहीं." असा शाप दिला. झालें! असामान्य शक्तिशाली हनुमान सामान्यांतील सामान्य बनलें. असामान्यांकडे बघावयाचें तर दूर राहिलें पण सामान्य जन सुद्धां हनुमानाला आपल्यापेक्षां अधिक सामर्थ्यवान वाटत. सर्वांपुढें हा हनुमान दीन व दुर्बलासारखा असावयाचा. पुढें श्रीरामकार्यार्थ सीताशुद्धि करण्याचा प्रसंग येअून पडला. श्रीसीतादेवी लंकेंत कोठें आहेत? त्यांना कशा स्थितींत ठेवलें आहे? मधील अनुल्लंघ्य समुद्र किती विस्तृत आहे! अित्यादि गोष्टींचा शोध लावावयाचा होता. या कार्याकरितां कोणाची नियुक्ति करावी असा मोठा विचार पडला. तेव्हां श्रीरामसेवेंतील अेका वृद्ध व जाणत्या सेनापतीनीं "हें कार्य जर संपन्न व्हावें असें अिच्छित असाल, तर हनुमंताचीच योजना करा. त्यांचें वांचून हें कार्य करण्याला दुसरा कोणीहि समर्थ नाहीं." असें सांगितलें. त्या सर्व सेनेंत नल, जांबुवंत, सुग्रीवादि वीर महावीर अुपस्थित असतां सामान्यांतहि ज्याची गणना नाहीं त्या हनुमंताची योजना करा म्हणतां हें काय? असा आश्चर्यकारक प्रश्न चोहोंकडून केला जात असतां हनुमंताचें शापवृत्त ज्ञात असलेले वृद्ध सेनापति नील म्हणाले "शापामुळें त्याला आत्मविस्मृति झाली आहे. वास्तविक श्रीहनुमान महापराक्रमी आहे." श्रीरामानें श्रीसीताशुध्यार्थ हनुमंताची योजना केली. नीलानें त्यांची आत्मविस्मृति विलयाला नेली आणि सामान्यांपुढेंहि दीनभावानें असणारा हनुमान, रावणासारख्या त्रिलोकदुरात्म्याला आव्हान देअून गर्भगळित करणारे भगवान श्रीहनुमान बनले!

आत्मविस्मृतीमुळें प्रचंड पराक्रमी हनुमान दीन दुर्बल व सर्वांकडून क्षुल्लक समजला जाणारा हनुमान बनला; आणि आत्मप्रतीतीचें अमृत प्यावयास मिळतांच दीन-दुबळ्या व धिक्कृत हनुमानाचें रूपांतर प्रचंड प्रतापान्वित वीर हनुमंतांत झालें. अितका आत्मविस्मृतीचा भयंकर तडाखा

आहे—असें आत्मप्रतीतीचें प्रखर तेज आहे. पंजाबसिंह रणजितसिंहाच्या अेक्या हरिसिंग नलुवा नांवाच्या पराक्रमी सेनापतीनीं आपल्या तरवारीचें तिखट पाणी अफगाणिस्थानांतील पठाणांना अशाप्रकारें चाखविलें होतें कीं पठाणी बाया आपल्या मुलांना ती रडत असलीं अथवा निजत नसलीं तर "हरिया आया" म्हणून धाक दाखवित असण्याअितकीं आठवण अद्यापपर्यंत त्यांच्यांत ताजी आहे. हिंदूंचा दरारा पूर्वी परकीयांना असाच होता. परकीय देशांतील विधर्मीयांत पूर्वी कोणाची कोणी खोडी काढल्यास धमकीसाठीं म्हणून "काय, हिंदू अुत्तर पाहिजे वाटतें?" असें विचारीत धमकी देण्याची प्रथा असे. पूर्वी हिंदूंची कोणी खोडी काढली कीं त्याला देहान्त प्रायश्चित्त मिळालेंच म्हणून समजावें अशी तेजस्विता हिंदूंत होती. सर्व परकीयांना हें निरपवाद सत्य माहित होतें. आणि म्हणून वरील म्हण प्रचारांत आली होती. ती वेळ आत्मप्रतीतीची होती. आज हिंदूंना आत्मविस्मृती झालेली आहे. आज तें दुर्बलाहून दुर्बल, दीनापुढेंहि दीन झालेले व होणारे ठरले आहेत. त्यांना कोणीहि धमकी द्यावी कीं ते नमलेच. त्यांच्या 'स्वत्वा'ला लोकांनीं सुखनैव 'आपलें' म्हणत गिळंकृत करावें. धमकी दाखवितांच हिंदू आपल्या स्वत्वाचें गाठोडें आपल्याच डोक्यावर घेअून आपल्या पायानें चालत जात आपल्याच हातानें दुसऱ्याचे पदरीं अर्पावयास सिद्ध!! असें हें हृदयविदारक दृश्य या हिंदुस्थानांत आज दिसत आहे. हें कशाचें फल? आज जर परकीय देशांतील कोणालाहि "काय तुला हिंदू अुत्तर पाहिजे कां?" असा कोणी प्रश्न विचारला तर तो काय म्हणेल? पूर्वीसारखा भयाकुल होअील कीं हर्षभरित होअील? यापूर्वीचा हिंदू, आक्रमकाला आक्रमणाचा हेतू धरून तो हालचाल करूं लागतो आहे नाहीं तोंच नामशेष करूं धावणारा होता. आतांचा हिंदू आततायांकडून मारला–पिटला जात असतांसुद्धां आपल्या दुबळ्या स्थितींत त्या आततायांच्याच हनुवटीला हात लावीत विश्वबंधुत्वाच्या पोकळ गप्पा मारणारा झाला आहे. अशी ही दीनदुबळी हनुमानी स्थिति कां झाली आहे? हा प्रश्न अेकच अुत्तर देतो कीं ज्याप्रमाणें त्या हनुमानाला आपल्या पराक्रम, सामर्थ्य, शक्ति, कर्तृत्व, व प्रचंड प्रताप या स्वत्वाची विस्मृति झाली होती, त्याचप्रमाणें या हिंदूसमाजाला स्वतः रहात असलेल्या देशावर

आपलें स्वामित्व आहे; या देशांत हिंदूधर्म–हिंदूसंस्कृती व हिंदूभाषारूप पूर्णांगीन हिंदुत्वासह आपण राहिलें पाहिजे; व हा देश–आपली जाति–आपला धर्म–आपली संस्कृती व आपली भाषा मिळून उभा असलेला हा हिंदूराष्ट्रपुरुष आपला आहे या गोष्टींची विस्मृती झाली आहे. ज्या क्षणीं व ज्या क्षणापासून या विस्मृतीचा नाश होऊन आपल्या स्वत्वाची खरी जाणीव होईल तोंच क्षण या महान हिंदूराष्ट्राचा भाग्यारंभ क्षण ठरेल. हें संकटग्रस्त हिंदुसमाजा ! तू हें आपलें स्वत्व ओळख. स्वत्वविस्मृतीच्या अंधारांत धडपडण्यांत कालक्षेप न करत

---

### हिंदुस्थान देश-हिंदुजाति-हिंदुधर्म-हिंदुसंस्कृति व हिंदूभाषा मिळून बनलेलें

# हिंदूराष्ट्र हें तुझें राष्ट्रस्वरूप आहे.

### हें ध्यानांत घे आणि भाग्याच्या मार्गाचा विजयी पथिक हो !

### दोन पावलें पुढें

कीं आपला प्रवास संपेल. विस्मृति म्हटली कीं मग त्यांत ज्या वस्तूची विस्मृति असेल त्या वस्तूच्या स्वरूपाची यथार्थत्वानें कल्पना नसणें हेंच स्वाभाविक. हिंदू मनाची जेवढें आपलें म्हणून असेल त्याची यथार्थ स्मृति नष्ट झालेली आहे. खिस्ती 'धर्म,' खिस्ती संस्कृति, खिस्ती भाषा, खिस्ती देश, खिस्ती जाती म्हटलें कीं हिंदूंच्या मनांत कांहीं तरी पण स्पष्ट व निश्चित रूपरेखा यावयाला अडचण पडत नाहीं. मुसलमान जाति–मुसलमान 'धर्म', मुसलमान संस्कृति म्हटली कीं यांना स्वप्नांतसुद्धां त्या-संबंधीच्या स्पष्ट कल्पनेला पालवी फुटेल. यहुद्यांविषयीं म्हटलें तरी यथार्थ कल्पनेची मान डोलवायला सिद्ध. जगांमधील स्वतःव्यतिरिक्त–हिंदू व्यतिरिक्त–कोणत्याहि देशा-जाति-धर्मांविषयीं बोला यांच्या डोक्यांत लख्ख उजेड पडलेला यांना वाटावयाचा. पण स्वतःसंबंधींची पाळी कीं यांची

मति कुंठित झालीच समजावी. " हिंदुस्थान कोणाचा ? " प्रश्न विचारतांच " अहो ! हें काय विचारतां ? हिंदुस्थान सर्वांचा ! ! " हें अुत्तर चटदिशी सिद्ध. हिंदू जातीचें नांव काढलें कीं " काय हो ? हिंदूजाती कशाला म्हणावयाचें ? अठरा धान्यांचा बाजार ! हिंदू जाति कुठली काढली आहांत ?" म्हणून अुद्गार ठेवलेले ! हिंदु-संस्कृतीचा अुल्लेख होतांच मुस्लीम संस्कृति, अिंग्लिश संस्कृति, जर्मन संस्कृति, अमेरिकन संस्कृति अित्यादि शब्दप्रयोग करतांच शंकाशत्रू बनणारे हे ज्ञानी पुरुष विचारतात, " हिंदू-संस्कृति कोणत्या झाडपाल्याचें नांव ? " हिंदूभाषा म्हटली कीं " अहो ! ती संस्कृत भाषाच कीं नाहीं. ती तर डेडल्यांग्वेज ( मृतभाषा ) " असें म्हणून हें मूर्खभ्रुव मोकळे व्हावयाचे ! आणि हिंदूधर्म शब्द अुच्चारला कीं मग यांच्या विक्षिप्त मनस्कतेला पारावारच नाहीं. मुस्लीम 'धर्म,' खिस्ती 'धर्म,' पारशी 'धर्म' आदिक शब्दप्रयोग गटगटा गिळणारा हा आधुनिक हिंदू ' हिंदूधर्म ' अैकतांच चमकून अुठतो. त्याला या अर्थाची कल्पनाच करतां येत नाहीं. यासाठीं या भ्रमितचित्त हिंदू मनाला अमूक अमूक गोष्टी तुझें स्वत्व आहे हें समजावून सांगतेवेळीं त्या स्वत्वाच्या यथार्थ स्वरूपाची पूर्ण विवरणात्मक नव्हे पण रूपारेखात्मक यथाशक्य कल्पना देणें हेंहि अेक अनिवारणीय कार्य ठरतें. तेवढें केलें कीं आपलें कार्य झालें !

## हिंदु राष्ट्राच्या अवयव पंचकाचा विचार.

पूर्वार्धांत ज्या अवयवपंचकांना अेका रूपकाचे स्वरूपांत वर्णिलें आहे, तें वाचकांचे ध्यानांत असेलच. त्यांत हिंदुराष्ट्र पुरुषाशीं यावरील राष्ट्रघटक पंचकाचा पुढीलप्रमाणें संबंध दर्शविला होता. हिंदुस्थान देश हें या हिंदू-राष्ट्रपुरुषाचें निवासस्थान आहे. हिंदूजाती हा त्या राष्ट्रपुरुषाचा देह, आणि धर्म-संस्कृति-भाषा ही जीव वा आत्मा, मन व वाचा आहेत असें म्हटलें होतें. या हिंदूजातीची जातीयता, संस्कृतीची हिंदुता व या हिंदूमयतेच्या निवासाचें स्थानाची हिंदुस्थानता हीं सर्व या पंचकांतील जो मध्य आहे त्या मध्यावर म्हणजे हिंदू-धर्मावर अवलंबून आहेत. या हिंदु धर्माच्या

स्वरूपाची यथार्थ रूपरेखा जर देतां आली व तिची यथार्थता पटली तर पुढील काम जवळ जवळ अुरकलें असेंच म्हणावें लागेल.

## हिंदुधर्म

हिंदुधर्माची यथार्थ कल्पना यावी अेतदर्थ त्याची रूपरेखा देण्याच्या प्रयत्नाला आरंभ करणें हें मोठें साहस—अेक शक्तिहीनाचें धाष्टर्य—आहे असें मनाला वाटतें. तरीहि तसें केल्यावांचून गत्यंतर नाहीं असें वाटून मुंगीनें हत्ती गिळण्याचा हा प्रयत्न निरुपायानें करावा लागत आहे. आमचे अेक परमस्नेही दंडित होअून काळया पाण्यावर पाठविले गेले होते. त्यांच्याकडून तेथील वृत्तांत अैकतांना त्यांचा अेका मुसलमानी मुल्लांशीं झालेला संवाद अैकला होता. तो प्रसंग व संवाद शक्य तितका जसासा तसा त्यांचेंच शब्दांत देणें युक्त वाटतें. ते म्हणाले "मी अंदमानमध्यें (काळया पाण्यावर) असतां हिंदू मुलांना त्रासवून, फसवून, भुलवून मुसलमान करणाऱ्या मुसलमानांपैकीं अेका मुल्लाची ओळख तुरुंगांत झाली होती. तेथील अजाण हिंदू कैद्यांशीं तो सतत कुराणाची व मुसलमान धर्ममताची स्तुति करीत, व हिंदू धर्माची थट्टा अुडवीत बोलत असे. अेके दिवशीं त्यानें माझ्याशींहि तोच अुपक्रम सुरू केला. तो म्हणाला "आमचा जसा धर्मग्रंथ कुराण, खिरस्त्यांचे बायबल तसें तुमचें धर्मपुस्तक कोणतें ! तुम्हाला निश्चितपणें हाच आमचा धर्मग्रंथ म्हणून सांगावयास अेकहि नाहीं. हजारो पुस्तकांचा बाजार" अर्थात् मला अुत्तर दिल्यावांचून राहवेना. मी त्याला म्हटलें "हें पहा ! तें तुमच्या विचारलेल्या प्रश्नाचें अुत्तर मग केव्हां तरी देअीन. पण मला अेक अडचण पडली आहे तेवढी विचारावयाची आहे. आपण सर्वजण सामान्य गरीब लोक, कोणाला मोठें घर, कोणाला लहान घर, तर कोणाला झोपडीपण अेकच रहावयाला ठिकाण असतें. नाहीं कां ! आपण दरिद्री, आपणांला अढळ निवासस्थानें कोठून लाभणार ! खरें ना ! पण अेखादा मोठा सार्वभौम सम्राट असला—समजा तुमचा तुर्कस्थानचा खलिफा आहे—त्याला किती निवास—स्थानें असतील बरें ! तुम्ही सांगूं शकाल कां !" माझा प्रश्न त्याच्या प्रश्नाशीं संबंध ठेवित आहे अशी थोडीबहुत असलेली शंका माझ्या प्रश्नांतील

खलीफाच्या अुल्लेखानें पार मावळून गेली आणि मुल्लाजी रंगांत येअून म्हणतात " वाः ! वाः !! ते काय विचारावें अहो तुर्कस्थानचा खलिफा म्हणजे काय चेष्टा आहे ? तुमची आमची त्यांच्याशी काय तुलना ? अहो मोठमोठे राजे नबाबसुद्धां त्याची बरोबरी करूं शकणार नाहींत. त्याचीं निवासस्थानें काय मोजतां येणार ? त्याच्या प्रत्येक गोष्टीसाठीं मोठमोठे टोलेजंग वाडे असतात वाडे, अनेकरंगीं अनेक प्रकारच्या विलासांचे अनेक प्रकारें शोभिवंत केलेले शयनासाठीं, खाण्यासाठीं, खेळण्यासाठीं, निमाजासाठीं, कामकाजासाठीं अनेकशः अिमारतीच अिमारती !!" त्याचें वर्णन थांबवून मी म्हटलें कीं "मुल्लाजी ! जसें आमचें रहातें घर आम्हाला चटकन दाखवितां येतें तसें कांहीं तुमच्या खलिफांना दाखवितां येत नसेल ! होय नां ?" तो म्हणतो कीं, "अहो तुम्ही दारिद्री म्हणून तुमचे अेकुलतें अेक घर तुम्ही आपलें चटकन दाखवतां, पण खलिफा तो खलिफाच. तो हेंच माझें घर म्हणून कसें दाखवूं शकणार ? अहो सर्वभर पसरलेली सर्व त्यांचीच घरें. 'माझी अनेकशः सर्वत्र पसरलेली घरेंच घरें ! हेंच म्हणून कोणतें सांगावें ?' असेंच तो खलिफा म्हणणार ! " झालें, माझें अुत्तर त्याच्यावर लागलींच अुलटलें. मी म्हटलें " मुल्लाजी ! अहो तुमचे जे धर्म–धर्म म्हणून म्हणतां त्या सर्व गरीबांच्या गोष्टी. तुम्हांला अेखादे चोपडें धर्माचें म्हणून दाखवतां येतें. पण हा हिंदूधर्म महान्सम्राट आहे ! तो अेकच हा माझा ग्रंथ म्हणून कसा म्हणूं शकणार ? त्याच्या अनंत सामर्थ्यानुरूप त्याची ग्रंथसंपत्तीहि अनंतच असणार ! असेंच कीं नाहीं ?" हें अुत्तर अैकतांच मुल्लाजींची मुद्रा अगदीं छायाचित्र घेण्यासारखी झाली होती !! हा संवाद येथें देण्यांत विशेष हेतू आहे. अशा या विश्वव्यापी व विश्वोपदेशक हिंदूधर्माची रूपरेखा देणें किती कठिण कार्य लेखकाला वाटत आहे याची हा संवाद थोडी कल्पना देअील; व तरीहि तें कर्तव्य आहे म्हणून पुढील प्रयत्न केला आहे. धर्माचें प्रयोजन सांगतेवेळीं हिंदुधर्माचार्यांनीं 'अभ्युदयनिःश्रेयस सिद्धि देणारा तो धर्म ' अशी सर्वग्राही–सार्वभौम परंतु अत्यंत व्यवस्थित व सुटसुटीत व्याख्या दिलेली आहे. ज्या धर्मानुष्ठानानें, धर्माचरणानें, धर्मपालनानें अैहिक अभ्युदय मिळतो आणि तद्धर्मप्रोक्त अभ्युदय मार्गावलंबनांतच निःश्रेय-

साची वाट चालली जाते तो धर्म. प्रत्येक समाजाचे अेक विशिष्ट तत्वज्ञान असतें. आणि त्या त्या समाजाची रचना त्या त्या समाजाच्या विशिष्ट तत्व-ज्ञानानुरूप व जगाकडे त्या त्या समाजाच्या असलेल्या दृष्टयनुसार झालेली असते. येथील विधानें रूपरेखनाकरितां केलेली असल्यामुळें दिलेल्या विधानांच्या विवरणाला येथें स्थल नाहीं. परंतु दिलेल्या विधानांची सत्यता वाचकांनीं विविध समाजदृश्यें व त्यांचीं तत्वज्ञानें दृष्टीसमोर आणून बघून घ्यावींत. जगाचीं मति गुंग करणारीं अनेक कोडीं अुलगडत्या बुद्धीच्या बुद्धिवादाला अेकमेक अुत्तरस्वरूपानें पटणारीं व मानसशास्त्राला पटलेली पुनर्जन्मवाद ही गोष्ट सिद्धांतवत् असलेली पाहून त्यावर आर्य–हिंदू–तत्त्व-ज्ञानाचा पाया घातलेला आहे. अभ्युदयार्थ जगांतील प्रत्येक देश धडपडत आहे. कांहींचे अभ्युदय अुदयाला येतांच मालवले, कांहींचे कांहीं थोडा-काल चमकून विझून गेले. पण हजारो वर्षांचा काल ज्या जातीच्या अभ्यु-दयानें आपल्या पुढून निघून जातांना पाहिला, त्या जातीच्या अभ्युदयाचे अनुष्ठानमार्ग अधिक वैज्ञानिक व म्हणून अधिक टिकाअू असले पाहिजेत असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं. अशा सुदीर्घ कालव्यापी व दिव्य अभ्युदयाची शक्यता निर्माण करण्याचेंच जरी अेकटें कार्य कोणती जाति करूं शकली असती तरी तें महत्तर कृत्य समजलें पाहिजे आणि तशा अभ्युदयाचा मार्ग दाखवणारा धर्म धन्यतर मानला पाहिजे. पण या हिंदू-जातीच्या अभ्युदय कल्पवृक्षाला अक्षय्य–असीम–अनंत असें अिंद्रियातीत, आनंददायी, निःश्रेयसाचें अमर फल लागलेलें आहे. सुखदुःखादि सांसारिक द्वंद्व प्रदेशाच्या सीमेपलीकडील द्वंद्वातीत फलदायी अशा हिंदू तत्त्वज्ञानाची सर्व जगत्–तत्त्वज्ञ मुक्तकंठानें स्तुति करीत आहेत. हजारो संतसजीव अक्षय्यसुखाचा घोट पिअून नित्य तृप्त झाले आहेत. अशा परममंगलदायी निःश्रेयस फलांनीं सुशोभित व सार्थक्यताधारी अभ्युदय आणि हजारोहजार वर्षें अभंग व अतूटपणें राहणाऱ्या समर्थ, तेजस्वी, व ओजस्वी अभ्यु-दयानें संरक्षित निःश्रेयस अशी जोड घालून देणारा हा धर्मपुरुष हिंदू-जातीची मत्ता आहे. हा धर्म संकोचित, अेकदेशी, व पक्षपाती नाहीं. अैहिक अभ्युदय व पारमार्थिक निःश्रेयस देण्याचा हेतू धरून त्याप्रमाणें मार्गदर्शन करणारा अखिल मानवी प्राण्यांना अिष्टफलदायी असा हा कल्प-

स्वच आहे. अनंत कालव्यापी संसृतिपसाऱ्यांतील मनुष्यसमाजाच्या अनंतशः पिढ्यांना अभ्युदयाची हमी भरणारा आणि कालातीत अनंताशीं समरस करून अिच्छुकांना अनंतत्व प्रदान करणारा असा हा अनंतकलामय धर्म आहे. ज्या धर्माचा अिकडे अनंत कालांशीं–तिकडे कालातीत अनंताशीं संबंध आहे तो धर्म त्या अनंतपद प्राप्तीचे सान्त, संख्य ( संख्या करतां येतील असे ) व मोजके असे मार्ग कसे सांगेल. अनंताला पोचण्यासाठीं अनंत मार्ग असूं शकतील व म्हणून अनंत जीवांना त्यांचे त्यांचे अधिकारानुसार शक्तीला झेपतील वा पुरतील असे अनंत मार्ग दाखवणारा असा हा अनंतसंबद्ध धर्म आहे. हा त्याचा स्वभावच आहे.

अंदमानमध्यें अर्रा नांवाची अेक जाति आहे. या जातीच्या शरीरबांध्याची, मुद्रेची, कपाळाची, पुष्कळशी ठेवण पंजाबी लोकांशीं जुळते. अर्रा नावाचें आर्य शब्दांशी बव्हांशीं वर्णसाम्य आहे. त्यांच्या शरीराच्या बांध्यादिकांची ठेवण पंजाबच्या आर्यवंशीयांशीं जुळती आहे. अंदमान हें बेट हिंदुस्थानच्या अितकें निकट आहे कीं, त्याखालीं सुमात्रादि स्थलीं जाणाऱ्या हिंदूवसाहतवाल्यांपैकीं कांहींनीं येथें ठाण मांडलें असलें पाहिजे यांत कांहीं शंका नाहीं. अनेकशः कारणांनीं हिंदुस्थानशीं संबंधविच्छेद झाल्यामुळें ते हळूंहळूं अज्ञानांधःकालांत डुबत जात रानटी स्थितीला जाअून पोचले. त्यांच्यांत अंदमानचे बंदी पूर्वी पळून गेल्यास त्यांना ते आश्रय देत असत. परंतु बंदीवानांच्या कपटी व विश्वासघाती वर्तनाला बळी पडण्याचें दुरानुभव त्यांना आल्यामुळें ते पुढें कोणी बंदी त्यांचे बाजूला फिरकतांच आपल्या अमोघ बाणांनीं त्याला यमसदनीं पाठवूं लागले. तरीहि त्यांतून जर कोणी तत्काल साष्टांग प्रणिपात करून दातीं तृण धरून अुभा राहिला तर त्याला न मारतां पक्क्या प्रबंधांत पण आश्रयाला ठेवीत असत.

शत्रुत्वाचा संभव असला तरीहि शरणागताला आश्रय देण्याचा आर्यगुण–हिंदुगुण–परंपरेनें त्यांच्यांत अुरलेला दिसून येत होता. ( हा व पुढील वृत्तांत अंदमानमध्यें सरकारी बंदीतून पळून गेलेल्या व पुढें शिक्षा भोगून सुटून आलेल्या कांहीं बंदीवानांकडून जसा मिळाला त्याप्रमाणें दिला आहे.) त्यांना 'देव कोठें'! म्हणून जर कोणी प्रश्न केला तर तत्व-

ज्ञान प्रस्फुटित करणाऱ्या विपुल शब्दज्ञानाचा त्यांचेजवळ दुष्काळ असावयाचा. तरीहि आर्यांचे परंपरागत तत्वज्ञानाचा अभाव त्यांच्यांत झाला नव्हता. मोठमोठ्या विचारकांना जगनियंत्याच्या अनंतत्वाची कल्पना कल्पितां येणें कठिण जातें. पण हे आर्यांचे-पूर्व हिंदूंचे-वंशज आज जरी वन्य स्थितीला पोचलेले दिसत असले तरी, अनंतत्वाची कल्पना फार मोहकपणें अेक प्रकारच्या खुणेच्या भाषेंत पटवितात. वर दिलेल्या प्रश्नाला क्षणाचाहि विलंब न लावतां वा न गोंधळतां आपल्या तर्जनीनें खालीं-वर चोहोंबाजूला वर्तुलाकार अंगुलीनिर्देश करून प्रश्नाचें अुत्तर प्रश्नकर्त्यापुढें मांडतात. जणूं कांहीं ' अधोर्ध्व-आसमंतात् सर्वत्र ही अनंतता ही त्याचीच व्यक्ति आहे ' असेंच ते सांगत आहेत ! आकाशांतला बाप त्यांना ठाअूक नाहीं; सात बहिस्तापलीकडल्या ( वरच्या ) स्थानाचें नांव त्यांनीं अैकलें नाहीं; क्रोधी सम्राटासारखा हातांत भयदंड घेअून स्वतःची म्हणून मानल्या जातीला कवटाळीत तदितरांना नरकांत ढकलणारा माथे-फिरू देव त्यांच्या स्वप्नींहि नाहीं. ही अनंतत्वाची कल्पना रानटी स्थितीला पोंचलेल्या आर्यवंशियांनाहि सोडूं शकली नाहीं. हिंदुधर्माच्या सार्थकतेची पोंच या अनंतत्वाशीं आहे. अभ्युदयाची जोड जोडून देअून त्याची परिसीमा दाखवीत त्यांतून अनंताकडे अनंत प्रकारें अनंतपथें जाण्याकरितां अनंतशः मार्ग मोकळे करून देअून सनातन, सर्व-गामी, सार्वभौम व अनंत पर्यवसायी निःश्रेयस देणारा आणि दिव्य अशा अैहिक अभ्युदयाची हमी भरणारा असा हिंदुधर्म आहे. अभ्युदयाशीं पूर्ण वा अपूर्ण संबंध ठेवीत निःश्रेयसार्थ अंगुली निर्देशानें अेखाद दुसरा मार्ग दाखवणारा तो पंथ. आणि ज्याला अभ्युदयाची लालसा आहे पण चिरकालव्यापी आनंदमयतेच्या स्थितीची कल्पना देणारें तत्वज्ञान नाहीं व म्हणून निःश्रेयस कशाशीं खावें हें ठाअूक नाहीं असें असूनहि रूढ जुन्या पुराण्या कथांचा संग्रह करीत अीश्वरविषयक पण तत्वज्ञानशून्य असें कांहीं तरी ' धर्म ' नांवानें पुढें आलेलें तें मत वा धर्ममत ठरेल.

हिंदुधर्मातील दिव्य तत्वज्ञान सुबुद्धि-प्रतिष्ठित व म्हणून जगमान्य असल्यामुळें तें धर्ममत तर नाहींच नाहीं. त्याचप्रमाणें पंथहि नाहीं. सर्व

पंथाची सार्थकता वा निरर्थकता ज्या धर्माचें तत्वज्ञानाच्या निकषावर लागावयाची तो पंथ होऊं शकणार नाहीं. ज्याप्रमाणें मनुष्यसमाज म्हटला कीं सर्व मनुष्यें त्यांत येतात. पण प्रत्येक मनुष्याकडे बोट दाखवून हा मनुष्यसमाज आहे कां ?' असें विचारतां 'समाजांतला हा अेक घटक आहे. हा समाज होऊं शकत नाहीं' असेंच सांगावें लागेल; त्याचप्रमाणें सर्व पंथांचा ज्यांत समावेश आहे, सर्व पंथाची सार्थकता जो दाखवूं शकतो तो पंथ नसून अनंत धर्मपंथांची सार्थकता देणारी ती समष्टि आहे—पण पंथाला मात्र ती समष्टि—तो पूर्णांगीन धर्म—म्हणतां येणार नाहीं, असेंच सांगावें लागेल. 'अभ्युदय—निःश्रेयसार्थ' ज्याचा अवतार आहे, अखिल मनुष्यसमाज हें ज्याचें त्रिकाळव्यापी क्षेत्र आहे आणि अनंताशी जो सदासर्वदा संलग्न आहे असा हा सनातनधर्म हिंदूंचा धर्म आहे. व म्हणून त्यालाहि अुपलक्षणेनें हिंदूधर्म म्हणत असतात. हें या हिंदुधर्माचें रूपरेखात्मक स्वरूप आहे.

## हिंदूसंस्कृति

मनुष्य जन्माचें सार्थक मिळवून देणारें असें महान निःश्रेयस व निःश्रेयसोन्मुख व निःश्रेयससंरक्षक असा समर्थ अभ्युदय यांच्या विविध मार्गदर्शनार्थ आणि विविधकला, विद्या, शास्त्रादिकांच्या ज्ञानदानार्थ व शिक्षणार्थ म्हणून झालेल्या व होत असलेल्या प्रचंड वाङ्मयांनीं आणि अभ्युदय निःश्रेयसी धर्मशासनाखालीं परिपालित होत आलेल्या अनंत पिढ्यांच्या विचारांनीं, आचारांनीं, स्वभावांनीं व शीलगठनांनीं जी अेक महान् 'संस्कारसमष्टि' अुत्पन्न झालेली आहे—होत आहे व होत राहील तिला 'संस्कृति' असें नामाभिधान आहे. या संस्कृतीचें माहात्म्य विषयानुरोधें थोडेंबहुत पूर्वी अनेकवार झालेलें आहे. अशी ही महान् संस्कृती ज्याला पूर्वी नुकत्याच धर्माच्या केलेल्या रूपरेखन-प्रयत्नांत हिंदुधर्म म्हणून म्हटलेलें आहे; त्या अभ्युदय—निःश्रेयसदायी धर्मानें निर्माण केलेली आहे. ज्याकरितां अुपरिनिर्दिष्ट धर्माला हिंदुधर्म म्हटलें त्यापेक्षां अधिक महत्वाच्या कारणांसाठीं हिला हिंदूसंस्कृति म्हणावी लागेल. धर्मस्वीकार कोणीहि आर्त केव्हांहि करूं शकेल, पण संस्कृती ही अेकाअेकी अुचलतां

येण्यासारखी वस्तू नाहीं. या संस्कृतीचा जातीशीं अेकजीव झालेला असतो. अनंत पिढ्यांच्या आनुवंशिक परंपरेंतील अेकस्वरूपी संस्कार-समुच्चयाच्या परिपाकांनीं नवनव्या पिढीच्या मनावर त्या संस्कृतीचे ठसे वठलेले असतात. ते बाहेरील नव्या मनुष्याला चटकन अुचलून घेअून आपल्या मनाला तद्रूपी बनवितां येणें कठिण आहे. व याचसाठीं अनंत पिढ्यांच्या अनंत संस्कारांचे परिपाकांनीं जो अेक जातीय ठसा जातीची प्रत्येक पिढी जन्मापासून आपल्या कवचेंत रहात प्रकट करूं शकते ती संस्कृति त्या जातीचीच स्वायत्तता म्हणतां येते. म्हणून हिंदुधर्मांनीं निर्माण केलेली संस्कृति ही केवळ हिंदूंचीच सत्ता असल्यामुळें ती हिंदूसंस्कृति असें म्हणणें हेंच न्याय्य आहे.

## हिंदूभाषा

हिंदुजातीय भाषांचा वंशवेल जरी पुष्कळ वाढलेला आहे तरी त्या सर्वांतून संस्कृत भाषेचाच जीवनरस खेळत आहे. त्या सर्व हिंदुभाषा अेका हाडारक्तामांसाच्या आहेत. विद्युच्छक्तियंत्र थांबवतांच ज्याप्रमाणें त्यामुळें प्रकाशणारे हजारों हजार विद्युद्दीप मालवले जातात त्याचप्रमाणें संस्कृत भाषा वेगळी करावयाची ठरवतांच सर्व हिंदूभाषा निष्प्रभ, निर्वीर्य व निर्जीव होतील. अेवढी अेकच गोष्ट सर्व हिंदू-भाषांची अेकात्मकता सिद्ध करावयास पुरेशी आहे. भारतांतील विविध भाषारूपी अनेक मुखांची पण संस्कृत भाषारूपी अेकशरीरी ही भाषादेवी अखिल भारतवर्षांत विराजत आहे. आणि ती संस्कृत भाषा कशी आहे! गहनातिगहन तत्त्वज्ञानाच्या सूक्ष्मातिसूक्ष्म कल्पना-भावना-तर्कवादाला, मनुष्यसमाजाच्या सर्व प्रकारच्या व्यवहारांतील निरनिराळ्या कला-विज्ञानशास्त्र व विद्या यांच्या अुत्कर्षदान-प्रयत्नाला पुरून अुरणारी अशी कल्पलता ही गीर्वाण भाषा आहे. या भाषेची वर्णमालाहि विज्ञानशुद्ध व ध्वनिशास्त्रसिद्ध अशी बसलेली आहे. रूपकांतच बोलावयाचें तर मानवी वाचाशक्तीला गहन-वर्ण-व्यक्तीकरणशास्त्रावर अुभी राहत जागतिक मानवीय व्यवहाराच्या सर्व भागाविभागांत बघणाराचे डोळे दिपून जावेत असा शब्दप्रकाश देअून हिंदू-जातीच्या धर्मध्येयांची आशा शिरसावंद्य मानीत परास्वरू-

पांनीं ब्रह्मपदीं विलीन झालेली अशी ही वाचादेवी आहे. आम्हां हिंदूंची ही संस्कृतभाषा सांप्रतच्या आम्हां हिंदूंच्या विविध भाषांची जननी तर आहेच आहे पण जगांतल्या सर्व प्रमुख भाषांच्या मुळांशींहि याच जगन्मातृपदीं शोभणाऱ्या संस्कृत भाषेनीं जीवनाचा झरा ओतलेला आहे.

## हिंदूजाति व हिंदूदेश.

असा हा सार्वभौम जगद्गुरू हिंदूधर्म; त्या अभ्युदयनि:श्रेयसरूपी धर्मानें—अर्धनारी नटेश्वरानें—निर्माण केलेली दिव्य हिंदुसंस्कृति; सर्व जगाला बोलावयाला शिकवणारी व मानवी विचार—विवेकाच्या अैहिक—पारमार्थिक क्षेत्रांतील विस्तृतांतील विस्तृत व अुच्चातिअुच्च क्षेत्र संचाराला शब्द-सामर्थ्य देणारी ही संस्कृत भाषा व तीपासूनच्च अुत्पन्न झाल्यामुळें तेंच सामर्थ्य असण्याचा गर्व वाहूं शकणाऱ्या सर्व हिंदुभाषा या अद्वितीय धर्म-संस्कृति-भाषेच्या दैवीवरांनीं वरान्वित झालेली सनातन देवप्रिय हिंदुजाति आणि या चार अलौकिक चतुष्टयाला शोभणारी निसर्गसुंदर सुजला सुफला असलेली ही आपली मातृभू—हा अुतुलनीय हिंदुस्थान—हे सर्व, हिंदू समाजा! तुझें स्वत्व आहे. या पांच स्वत्वांच्या समष्टिरूपाचें हें हिंदूराष्ट्र तुझें आहे. स्वत्वाला सोडून जाणें हें स्वभावाविरुद्ध आहे. त्यांत आत्मघात आहे. तूं स्वत्वापासून सतत दूर रहाणें शक्य नाहीं. अेक क्षण तुझ्या आयुष्यांत निश्चित येणार आहे कीं, ज्यावेळीं तूं निसर्गप्रेरित अवशतेनें तुझें स्वत्व तूं धुंडाळू लागशील. पण वेळ निघून जाण्यापूर्वी त्याकडे लक्ष दिलेंस तर तूं राष्ट्ररूपानें जसा कालारंभापासून चालत आला आहेस तसाच कालान्तापर्यंत चिरंजीवत्वानें तूं प्रगमनशील राहूं शकशील. पण वेळ निघून जाण्यापूर्वी जर तूं जागा झाला नाहींस तर—देव करो आणि ती जगताचें अकल्याण करणारी व तुला प्राणघाती ठरणारी भवितव्य कल्पना तुझ्या वाऱ्यासहि अुभी न राहो! कारण तसें झालें तर तूं तर नष्ट होशीलच पण जगांतील दिव्यज्ञानदानी भाषा, महनीय संस्कृति व जगत्कल्याणकारी धर्म याला हें दुर्दैवी जग मुकेल. जगताचें फार मोठें अकल्याण होअील. तेव्हां हें हिंदू समाजा! तूं आपली आत्महत्या आणि जगद्वित-

हत्या या महापातकांच्या अधःपातापासून वाचण्यासाठीं व त्याचबरोबर आपलें व आपल्याबरोबर जगताचें कल्याण साधनार्थ शुद्धीवर ये. आणि

**'हिंदुस्थान-हिंदूजाति-हिंदूधर्म-हिंदूसंस्कृति-हिंदूभाषा'**

या पंचकानें बनलेलें हें हिंदुराष्ट्र तुझें आहे हें ओळखून तदनुसार आपली कर्तव्यदिशा आख.

जगामध्यें व्यक्ति वा समाज, जाति आणि राष्ट्र, प्रत्येक प्राणी व प्राणीसमूह थोडक्यांत म्हणावयाचें तर जडातिजड अथवा सूक्ष्मातिसूक्ष्म अणूंपरमाणूंपासून तो श्रेष्ठातिश्रेष्ठ जीवांपर्यंत व्यक्तिशः वा समुदायशः सर्वांचा 'मी' आपल्या कक्षेंतील स्वत्वाला चिकटून आणि त्याला आपल्या 'मी'शीं चिकटवून घेऊन त्या भोंवतीं फिरत असतो. ज्या कांहीं अत्यंत निगूढ आशेच्या वा अिच्छेच्या प्रेरणेनें प्रत्येकाचा 'मी' आपल्या 'स्वत्वा'भोंवतीं फिरत असतो त्या अिच्छेच्या कमीअधिक परिपूर्तीच्या मानानें आपल्या 'स्वत्वा'ची कक्षा तो 'मी' बदलीत जातो. अशा अखंडनीय प्रयत्नांच्या अनंतकालीत तपानें त्याला अेक क्षण असा सांपडतो कीं, ज्या निगूढ अिच्छा परिपूर्तीस्तव तो स्वत्वाच्या कक्षा लहानमोठ्या करीत प्रयत्नशील असतो ती निगूढ अिच्छापूर्ती व्हावी; त्या 'मी'चे समाधान व्हावें आणि त्या क्षणापासून सत्वाचें स्वत्व मिळून समाधान–प्राप्त स्थितीच्या तृप्तीनें सत्वाच्या स्वत्वाभोंवतीं गुंजारव करण्यांत निमग्न व्हावें. हिंदुमन शुद्धीवर असेल तेव्हां स्वभाववशतः सत्वाकर्षित होणारें आहे. त्याला सत्वाचें स्वत्व हवें असतें. नुसतें 'स्वत्व' आहे म्हणून त्यालाच 'स्वत्व' मानणारें मूढ तें नाहीं. हे माझें म्हणून हिंदूमन कशाला चिकटूं धावत नाहीं. अितकें हें चांगलें आहे–हें कल्याणकारी आहे–हें सत्य आहे म्हणून हिंदूमन अेखाद्या गोष्टीला चिकटूं शकेल. यासाठीं हिंदू मनाला हें तुझें 'स्व'त्व आहे—या गोष्टी तुझ्या आहेत व म्हणून तू त्यांना चिकटून रहा–त्यांचें संरक्षण कर त्यांचा त्याग करूं नको असें सांगून भागणार नाहीं. स्वतःची म्हणून जवळ असणारी खापरीसुद्धां हृदयाशीं कवटाळून धरण्याचा साधारण मनुष्य–सुलभ मोह हिंदू–मनाला पडत नाहीं. जवळ असलेला हिरासुद्धां केवळ तें माझें स्वत्व आहे–तो आपला आहे–म्हणून हृदयाशीं चिकटवून

धरण्याचा मोह त्याला अितका पडत नाहीं; जितका तो कल्याणकारी आहे —तें सत्व आहे—हें कळून तो हिंदू त्याला प्रेमानें चिकटूं शकेल; मग त्यापासून त्याला कितीही हानि सोसावी लागो. वास्तविकतः हा हिंदुस्थान त्याचा स्वतःचा देश त्याला वाडवडिलांनीं दिलेला व त्याला स्वतःला प्रिय असलेला हा हिंदूधर्म त्याचा, त्याची संस्कृति, त्याची भाषा हीं सर्व त्याच्या स्वत्वाची असूनसुद्धां भ्रमशीलतेनें भलत्याच चुकत्या कल्पनेकडे— ती कल्पनाच सत्य व सत्व आहे असें वाटल्यामुळें—आपल्या स्वत्वाकडे दुर्लक्ष—अपराधी दुर्लक्ष—करीत तो भलत्या मार्गाला धावत आहे. यासाठीं या हिंदूमनाला हें ‘ स्वत्व ’ आहे, याचें संरक्षणांतच तुझी सुरक्षिति आहे हें सांगतेवेळीं हें तुझें म्हणून असलेलें ‘ स्वत्व ’ नुसतें तुझें ‘ स्वत्व ’ नसून तुझें व जगताचें कल्याण करणारें अेकमेव सत्य म्हणजे सत्—त्व = सत्त्व आहे हेंहि पटवून दिलें पाहिजे.

## हिंदूंच्या ‘स्वत्वा’ चीं

## ‘सत्व’ता

तर्कशक्ति, विज्ञानशास्त्र आणि तत्वज्ञान यांच्या निकषावर योग्य ठरणारी व अनुभवाला पटणारी—अुतरणारी जी वस्तू वा गोष्ट असेल तीच सत्य व म्हणून सत्त्वरूप ठरेल यांत संशय नाहीं. सत्त्व पारखण्याची ही पद्धति खरी असेल तर—आणि हीच पद्धति सत्यसिद्धांत ठरविण्याला लागू शकते, याविषयीं दुमत होणें शक्य नाहीं,—त्या निकषावर हें हिंदूपुढें स्पष्ट केलेलें ‘ स्वत्त्व ’ ‘ सत्त्व ’हि आहे हें पटविणें अत्यंतावश्यक वाटतें. कारण हिंदूमनाचा—हिंदूजातीय मनाचा—स्वभाव हा स्वत्वापेक्षां सत्वाकडे अधिक आकर्षिला जाणारा असल्यामुळें अमूक अेक कल्पना वा भावना सत्य व कल्याणकारी आहे अशा समजुतीनें सर्व जगमान्य न्यायानें ठरलेल्या दृष्टीचें योगें सिद्ध असलेल्या ‘ स्वत्वा ’कडे जणूं तें दिसलेंच नाहीं, अशा प्रकारें दुर्लक्ष करून तें हिंदूमन भ्रमात्मक ‘ सत्त्वा ’ कडे धावत जात आहे. सर्व जगभर सामान्य दृष्टीचाच प्रसार फार. सर्व जगाची दृष्टी साधारण ‘ स्वत्वा ’कडे—प्रेयाकडे धावणारी असते. सद्यःसुखदायी असेल ते जगांतील

लोकांना आकर्षूं शकतें. अमूक अेक 'स्वत्व' आहे म्हणूनच अश-त्स्वभाव त्याला चिकटून राहूं अिच्छितो. जें स्वत्व असेल, जें प्रेय असेल, जें सद्यःसुखाची प्राप्ति करून देअील त्याचेच्चकडे जगाची ओढ असावयाची हा सर्वसाधारण सामान्य नियम असलेला सर्वत्र दिसून येतो. पण हिंदू-मनाची रचनाच वेगळी. हिंदूजातीय मन हें क्षणिकापेक्षां नित्याकडें, प्रेयापेक्षां श्रेयाकडें, स्वत्वापेक्षां सत्वाकडे अधिक स्वाभाविकपणें आकर्षिलें जातें. हिंदूमनाच्या या जगद्विलक्षण स्वभावाचें कारण जगाच्या व हिंदू-जातीच्या धर्मसंस्कृतीच्या महदांतरांतच शोधलें असतां सांपडण्यासारखें आहे. कालाच्या सान्ततेच्या पोटांतच सामावलेली आणि कांहीं मर्यादेपुढें वीट आणणारी—मानवी कल्पनेच्या कक्षेंतच सांपडणारी—अिंद्रियजन्य भोगसुखांचींच ध्येयें गाठण्यापर्यंत जगांतील धर्मनामधारी गोष्टींची धाव पोंचलेली आहे. म्हणून त्यांचे संस्कृतीचीहि पोच क्षणिकापलीकडे—प्रेया-पलीकडे—स्वत्वापलीकडे पोचलेली नाहीं. आणि तदनुसारें लोकस्वभाव बनलेले आहेत. हें अगदीं स्वाभाविक आहे.

परंतु हिंदूमन हिंदूंच्या धर्मतत्वज्ञानानें व संस्कृतीनें तत्वशोधी व सत्त्व-शोधी—सत्यप्रिय बनलेलें आहे. धर्मसंस्कृतीचे अनुसारें जातीय मनें बनत असतात. तदनुरूप जातीय स्वभायांतील संस्कारसमष्टि आकार धारण करते. हिंदूंचें तत्वज्ञान जगांतील सर्व तत्वविवेचकी तत्वज्ञान्यांना विदित आहे. त्यांचेकडून प्रशंसिलें गेलें आहे. अशा तत्वज्ञानाचे पायावर अुभारलेला धर्म असत्त्वदर्शी कसा असूं शकेल! दुसरें असें कीं, सामान्य दृष्टीनें विचार करतां प्रेयापेक्षां श्रेय श्रेष्ठ आहे, क्षणिकापेक्षां नित्य हें भजनीय व स्वीकरणीय आहें, केवळ स्वत्वापेक्षां सत्वाचें स्वत्व मिळविणें नित्य कल्याणदायी आहे हें कळून येतें. अिंद्रियजन्य सुखापेक्षां अिंद्रियातीत आनंद, क्षणिकापेक्षां नित्याचा सहवास, सान्तापेक्षां अनंतत्वाचा लाभ कोणाला नकोसा वाटेल! आणि हें महनीय, लोभनीय, चिंतनीय व स्वीकरणीय ध्येय जर कोणा जातीच्या पूर्वजांनीं आपल्या वंशजांच्या कल्याणार्थ तत्प्राप्तीच्या अनुष्ठान—मार्गासह अुघडें करून ठेवलें असेल तर हिंदूसमाजा! तुझ्याच थोर पूर्वाचार्यांनीं—महापुरुषांनीं अुघडें करून ठेवलें आहे. अशा अतिमानवी ( Super human ) महानुभावी पूर्वजांचा तूं

वंशज आहेस ! असें हें प्रलोभनीय पूर्वार्जित तुझ्या भाग्यानें तुला ‘ स्वत्व ’ म्हणून प्राप्त झालेलें आहे. अशा सत्वरूप स्वत्वाचा तूं कसा त्याग करूं धजावेंस ! हें तुझ्या जातीय स्वभावाविरूद्ध आहे, हें तुझ्या अकल्याणाचें आहे. यांत तुझें श्रेय तू गमावशील–तुला प्रेयहि प्राप्त होणार नाहीं.

आणि तुझे पूर्वज तुला श्रेयच देऊन थांबले नाहींत. त्यांनीं प्रेयाचीहि–सांसारिक सुखाचीहि–अुत्तमांत अुत्तम प्रकारें सुव्यवस्था लावण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. निःश्रेयस हें व्यक्तीचें वा समाजाचें अभिलक्षणीय श्रेय आहे तसाच अभ्युदय हे व्यक्ति–समाजाचे संपादनीय प्रेय आहे असें हा तुझा सत्वदर्शी धर्म सांगत आहे. मनुष्याची धांव श्रेयाआधीं प्रेयाकडे जाणें सहजस्वभावी वृत्ति आहे. हें हिंदू पूर्वाचार्यांना–धर्मप्रणेत्यांना ठाअूक होतें. त्यांनीं अभ्युदयाला पहिलें स्थान दिलें. व अभ्युदयांनीं पोट भरून परितृप्तीची ढेकर दिल्यानंतर तेथेंच न थांबतां आतां तूं निःश्रेयसाकडे चल हें चुचकारीत व गळीं अुतरवीत सांगितलें आहे. धर्माचे मुख्य प्रयोजन म्हणून सांगतेवेळीं सांसारिक सुखापेक्षि व अिंद्रियसुखवेडया मनुष्यमनाला पहिल्यानें अभ्युदय हें प्रयोजन पहिलें प्रयोजन म्हणून सांगितलें आहे व नंतर पुढें जाअून प्रयोजन म्हणून अनुष्ठेय नात्यानें निःश्रेयस हिंदू जातीयांपुढें व त्यांचेद्वारा मनुष्यसमाजापुढें ठेवलेलें आहे. निःश्रयस म्हणून जें हिंदूपुढें धर्माचार्यांनीं ठेवलें आहे तें कसें आहे, किती श्रेष्ठ आहे व अनंतफलदायी असल्यानें सत्य आहे हें पूर्वींच सांगितलें आहे. आतां अभ्युदयाचें मानवी प्रेय म्हणून आपणांपुढें ठेवलेल्या पहिल्या प्रयोजनाचें स्वरूप जाणावयाचें आहे. हिंदुस्थानचा म्हणून असलेला व हिंदुस्थानला लाभलेला असा अभ्युदय कोणत्या प्रतीचा होता हें पहावयाचें असेल तर या हिंदुस्थानला परकीयांनीं पूर्वी काय नांव दिलें होतें हें आठविलें असतां थोडेंसें लक्षांत येअील. या देशाला जगांतील सर्व परकीय लोक ‘ सुवर्णभूमि ’ नांवानें ओळखीत असत. आणि म्हणून जगांतील आधाशी, खादाड, व क्षुधावलेली बुभुक्षित भुतावळ या देशांत घुसण्याच्या संधीसाठीं शेंकडो वर्षे हपापलेली होती. या देशांतील पराक्रम परकीय अपहाऱ्यांना कंप आणणारा होता; येथील संपन्नता जगांतील बुभुक्षित तोंडाला पाणी सुटण्यासारखी होती; येथील कलाकौशल्य जगाला

लुब्ध करणारें होतें; हिंदुस्थानसारखी अुपजाअू भूमि व कृषिकर्मवित् कृषिकार यांच्या संयोगानें हिंदूराष्ट्राला दुर्भिक्ष ठाअूक नव्हतें; सर्व प्रजा सुखी व राज्यकर्ता वर्ग प्रजारंजनशील असे; चोरांच्या भयानें घराला कुलुपें लावण्याची आवश्यकता अनुभवाला येत नव्हती; चौर्यव्यभिचारादि पापकर्में हिंदुसमाजाला अपवाद-रूपानेंच काय ती ठाअूक होती; दीन-दुर्बल-निःसहाय व निराधार असणाऱ्यांना साह्य करणारे दानी व संरक्षक हस्तांचा तुटवडा कोणाला माहित नव्हता; थोड्यांत सांगावयाचें तर हिंदुस्थानांत सुखसमाधान परिपूर्ण होतें या वर्णनापेक्षां दुःख दारिद्र्यादींचा दुष्काळच सतत पडलेला होता असें वर्णन करणेंच अधिक अन्वर्थक व स्पष्ट कल्पना देणारें ठरेल. तत्कालीन हिंदूराष्ट्रांतील ब्राह्मणवर्ग अैहिक अभ्युदयोपयुक्त आणि पारमार्थिक निःश्रेयसदानी ज्ञानसंपादननिष्ठ व ज्ञानदाननिरत असे. हिंदू राष्ट्रांचा संरक्षक क्षत्रियवर्ग हिंदूराष्ट्रहितवर्धनार्थ व संरक्षणनिमित्त सतत प्राणदानसिद्ध राहून दुर्धर्ष पराक्रमशीलतेनें राष्ट्राचें परिपालन-विवर्धन व संगोपन करीत राहणारा होता. राष्ट्रांतील वैश्यवर्ग कृषि, वाणिज्य व गोरक्षादिकर्तव्यें यथायोग्य रीतीनें परिपालन करीत राष्ट्राच्या संपत्तीची अभिवृद्धि करून राष्ट्रकार्याला द्रव्यदान करण्यांत सतत अग्रसर राही. राष्ट्राचा पाया म्हणजे शूद्रवर्ग. हा कलाकौशल्य-निपुणतेनें राष्ट्राला सजवी आणि राष्ट्राच्या सर्व सेवा-कार्यीं तत्पर राही. पूर्वी देशगुण म्हणून जे सांगितलें त्यांतील अत्यंत महत्वाचा असा **अन्योन्यरक्षक भाव** रूप परमावश्यक गुण या हिंदूराष्ट्रांत परमोत्कर्षाला पोचलेला होता. आणि म्हणूनच जगांतील पारशी, यहुदी आदिक अत्याचार त्रस्त, निराधार झालेले व शत्रुपरिपीडित लोक, पीडितांना आश्रय देण्यास सिद्ध व संरक्षणास परिपूर्ण समर्थ असणाऱ्या या धनकनकसंपन्न, सुखी व आनंदी अशा हिंदुस्थानाच्या आश्रयाला निर्भयतेनें, श्रद्धेनें व विश्वस्तपणें येअून आश्रय घेते झाले. हर्बर्ट स्पेन्सर आपल्या अेक्या ग्रंथांत म्हणतात कीं, "समृद्धि, संपन्नता, सुख व आनंद हीं ज्या राष्ट्रांत अुत्कर्षाला पोचतात तेथेंच गहनशास्त्रविचार व मानवीजीविताच्या गूढगहन समस्यांचा अुलगडा लावूं पहाणारे तत्त्वज्ञानी निर्माण होतात" हिंदुस्थानांत अभ्युदयाचें परमोत्कर्षाचें स्वरूप प्रकट झालें होतें. आणि म्हणूनच अशा अद्वितीय

अभ्युदयांत अद्वितीय तत्त्वज्ञानाचा अुदय व अुत्कर्ष झाला. अैहिक समृद्धि आणि सुखसंपन्नता हीं राष्ट्रांतील राष्ट्रीयांना सहजस्वाभाविक व निसर्गदत्त असल्यामुळें सहजसुलभ अशीं वाटावीं अितक्या निरपवादितेनें या भाग्यवान् हिंदू–राष्ट्राला लाभलीं होतीं. या हिंदूधर्मानें राष्ट्राला असा अभ्युदय दिला होता. आज ज्याप्रमाणें धर्म हा शब्द अुच्चारतांच कांहीं तरी पारलौकिक गोष्टीचाच केवळ बोधक शब्द अैकल्यासारखा वाटतो तसें पूर्वी नव्हतें. पारिभाषिक दृष्टीनें व व्यवहारांत अुतरलेला असा धर्म शब्दाचा विशेष अर्थ 'अभ्युदय साधक' असाच होता. हिंदू–धर्मानें प्रत्येक राष्ट्रीयांपुढें चार पुरुषार्थ ठेवले होते. धर्म–अर्थ –काम व मोक्ष हे ते चार पुरुषार्थ होत. प्रत्येक हिंदूधर्मीयांनीं हे चारहि पुरुषार्थ साधावेत–साधण्यासाठीं प्रयत्नशील रहावें हा हिंदूधर्माचा दंडक होता. तशी आज्ञा होती. प्रत्येक व्यक्तीला वैयक्तिक व सामुदायिक अशीं कर्तव्यें सांगितलेलीं होतीं. प्रत्येक व्यक्ती आपला वैयक्तिक अुत्कर्ष साधन करीत असतां समाजाच्या संरक्षणाचा, साधनाचा, सहवासाचा, समाज-तत्त्वज्ञानाचा, व कार्यक्षेत्राचा लाभ त्या व्यक्तीला होत असतो व त्या लाभाच्या प्रत्युपकारार्थ त्यानें समाजसेवेसाठीं म्हणून कर्तव्यें करावयाचीं असतात. हीं आत्महितार्थ व समाजसेवार्थ कर्तव्यें योग्य प्रकारें परिपालन करून जी योग्यता संपादावयाची असते त्याला 'धर्म-पुरुषार्थ' असें म्हटलेलें आहे. समाजांतील प्रत्येक व्यक्तीनें धर्मपुरुषार्थाचें अनुष्ठान केलें असतां समाज सुव्यवस्थित, प्रवर्धित, व अुत्कर्षगामी राहतो. हें धर्मपरिपालन, हें धर्मपुरुषार्थ–संपादन यथातथ्यपणें समाजांतील प्रत्येक व्यक्तीकडून योग्यपणें होत असण्याची हमी तत्कालीन राज्यसूत्रधाऱ्यांवर राही. या धर्म–पुरुषार्थ संपादनाबरोबरच प्रत्येकानें तद्वारा अर्थ संपादनाचा पुरुषार्थ साधावयाचा असे आणि या अर्थसाधनसंपन्नतेच्या बलावर काम पुरुषार्थ तृप्ति मिळवा-वयाला सामर्थ्य येअी; अितकी अभ्युदयाची व्याप्ति आहे. या अभ्युद-याच्या श्रीगणेशाला 'धर्म' हें पारिभाषिक व विशेषार्थी नांव आहे. धर्माच्या पहिल्या अभ्युदय नामक प्रयोजनाकडे धर्माचें मुख्य लक्ष. याच पहिल्या कार्याशीं धर्म हें नांव संलग्न झालेलें आहे. व यानंतर आणि हें साधल्यावर मग मोक्ष पुरुषार्थाकडे वळावयाचा आदेश धर्म देत

आहे. मोक्ष पुरुषार्थाशीं धर्म शब्द संलग्न न करतां अभ्युदयकार्यारंभीं व अभ्युदयदानासाठीं म्हणून धर्म शब्द संलग्न ठेवलेला आहे. हें विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे. हिंदुस्थान राष्ट्राच्या राष्ट्रीयांसाठीं या आपल्या हिंदूधर्मानीं निःश्रेयसाची परिपूर्ण व्यवस्था करून ठेवली आहे हें न सांगतांहि कळण्यासारखें आहे. पण ज्या श्रेणीच्या अभ्युदयाचें शब्दचित्र रेखाटलें असतां आधुनिक कालांत सुखसंपन्नतेचा डौल मिरविणाऱ्या राष्ट्रांच्याहि तोंडाला पाणी सुटावें अितका मोहक, आकर्षक, लोभनीय व अभिलषणीय अभ्युदय राष्ट्राला या हिंदूधर्मानें लाभवून दिला होता.

कालचक्राच्या भरधांव दौडींतील अुधळल्या धुळीनें कदाचित आरशावर केर बसल्याप्रमाणें हिंदू-धर्माचें सांप्रतचें व्यवहार-प्रतिबिंब मलीन दिसत असेल. आपल्या दृष्टीला मांद्य आल्यामुळें हिंदू संस्कृतीचेंहि दिव्य-स्वरूप आपल्याला स्वच्छ दिसत नसेल. पण जर आपण आपली दृष्टि स्वच्छ केली व अुडालेली धूळ दूर सारली तर जें आपलें ‘ स्वत्व ’ म्हणून आपल्यापाशीं पूर्वपरंपरागत पैत्रिक संपत्ती आहे व जें हें धर्म-संस्कृतीचें अमूल्य व अलभ्य धन आपल्याला लाभलेलें आहे तें नुसतें ‘ स्वत्व ’ नसून ‘ सत्व ’ रूप आहे. हें ध्यानीं आल्यावाचून रहाणार नाहीं हे हिंदू समाजा! हें तुझें ‘स्वत्त्व,’ सत्त्वपूर्ण आहे. परमेश्वराचे कृपेनें मिळालेलें व महापुण्यवान् पूर्वमहदात्म्यांनीं—आपल्या पूर्वजांनीं—कमावून आपल्या-साठीं वत्सलतेनें ठेवलेलें सत्त्व ’ तुला भाग्यवशतेनें ‘ स्वत्व ’ रूपांत प्राप्त झालेलें आहे. ‘सत्वा’कांक्षि असलास वा स्वत्वाकांक्षि असलास तरी हें सदासर्वदा तुझ्यापुढें दोन्हींहि अिच्छा-तृप्त्यर्थ अेकरूपानें अुभें आहे. तुला अभ्युदय पाहिजे असेल तर तूं या हिंदू राष्ट्रीयतेचीच कास धर. तूं निःश्रेयासाठीं हपापला असलास तरीहि या हिंदूराष्ट्ररूपी विराटस्वरूप भगवंताचीच सेवा कर.

**हिंदुस्थान देश-हिंदू-जाति-हिंदूधर्म-हिंदुसंस्कृति-हिंदुभाषा**
**यांनीं बनलेलें**

## हें हिंदूराष्ट्र

हें तुझें 'स्वत्व' आहे. यांत सत्त्व भरलेलें आहे. तुला अैहिक अभ्युदय हवा असला तरी, आणि पारलौकिक निःश्रेयसाची अिच्छा धरलीस तरी तुला या हिंदूराष्ट्रावांचून दुसरी गति नाहीं. हेंच तुझें शरण्य व हेंच तुझें वरेण्य !

याकरितां अूठ ! डोळ्यावरील झांपड अुडवून दे. आणि या जगांत तुझ्या सुखाकरितां व तुझ्या कल्याणाकरितां, तुझ्या प्रेयाकरितां व श्रेयाकरतां, तुझ्या अैहिक अभ्युदयाकरितां आणि पारमार्थिक निःश्रेयसाकरितां गर्जून अूठ ! व बोल ! !

### हिंदूराष्ट्रभगवानकी जय !

ॐस्वास्ति...समुद्रपर्यंताया

अेकराट्

अिति.



# सावरकर वाङ्मय

| | किंमत |
|---|---|
| मराठी भाषेचें शुद्धीकरण ... ... | ०—१०—० |
| मला काय त्याचें ! अथवा मलबारांतील मोपल्यांचें बण्ड ... ... | ०—१०—० |
| कमला ( काव्य ) ... ... | ०—४—— |
| सप्तर्षी ( काव्य ) ... ... | ०—४—० |
| स्फूर्ति ( आगामी काव्यसंग्रह ) | |
| अुःशाप ( नाटक ) ... ... | १—०—० |
| सन्यस्त खड्ग ( नाटक ) ... | १—०—० |
| अुत्तरक्रिया ( नाटक ) ... ... | १—०—० |
| मरण कीं लग्न ( कादंबरी ) | |
| नेपाळी आन्दोलनाचा अितिहास ... | ०—१३—० |
| Hindutva | 1–4–0 |
| An echo from Andamans | 1–0–0 |
| Hindupada Padashahi | 3–0–0 |

सर्व पुस्तक विक्रेत्यांकडे मिळतील.

---